मुंबई इलाखा, मध्यप्रांत व वऱ्हाड येथील
शाळांत चालविण्यास मंजूर झालेली

# वाचनपाठमाला,

## भाग दुसरा.



( इंग्रजी इयत्ता ४ व ५ यांकरितां )

संपादक व प्रकाशक

कृष्णाजी गोविंद किनरे,

मराठी भाषेचे शिक्षक, न्यू इंग्लिश स्कूल, पुणें.



सोल एजंट--वाङ्मय-विहार---मंडळ,
पब्लिशर्स व बुकसेलर्स, पुणें.



आवृत्ति सहावी—प्रती ५०००.
फेब्रुवारी १९२२.



किंमत १। रुपया

## पहिल्या आवृत्तीची
# प्रस्तावना.

मनुष्यानें मनांत आणावें एक व ईश्वरी योजना असते निराळीच. या मालेचा पहिला भाग प्रकाशित होऊन आज दोन वर्षें झालीं, तेव्हा आज दुसरा भाग बाहेर पडत आहे. पहिला भाग प्रकाशित झाल्याबरोबर हाही छापवावा, अशा हेतूनें सर्व तयारी करून ठेविली; पण तसा योगायोग नव्हता. मध्यें अशी कांहीं स्थिति आली कीं, तीमुळें आजपर्यंत वाट पाहणें भाग पडलें. असो. उशिरां कां होईना, पण तो आज प्रकाशित होण्याचा सुयोग येत आहे, ही त्या अनंताची कृपाच होय.

पहिल्या भागाप्रमाणें यांतसुद्धा मराठींतील निरनिराळ्या लेखकांच्या उताऱ्यांचा समावेश केला असून विषयविविधत्व जास्तीं आणण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला आहे, हें पाहण्याचें काम सुज्ञांचें आहे हा भाग इंग्रजी चवथ्या व पांचव्या इयत्तेंतील विद्यार्थ्यांना मराठी वाचनपुस्तक म्हणून तयार केला आहे. पहिल्या भागाप्रमाणें यांत सरसि पाठ न देतां दोन इयत्तांकरितां दोन स्वतंत्र विभाग केले आहेत. संबंध भागाचीं दोन पोटपुस्तकें केलीं असून पहिलें पुस्तक चवथ्या इयत्तेकरितां व दुसरें पांचव्या इयत्तेकरितां आहे. पाठांची मांडणीसुद्धां बरीच व्यवस्थित केली आहे. म्हणजे भाषेच्या दृष्टीनें सोप्या पाठापासून आरंभ करून अधिक अधिक कठिण पाठ क्रमानें घातले आहेत. हा या भागाचा एक विशेष झाला. दुसरा म्हटला म्हणजे पाठांचा आटपसरपणा. पहिल्या भागांतील पाठ 'बरेच लांब झाले आहेत' अशी विशेष कुरकूर कानीं आल्यामुळें तो दोष या भागांत काढून टाकावयाची खटपट केली आहे.

प्रवेशपरीक्षेंत 'स्वभाषा' या विषयाला एकंदर जितके गुण असतात, त्यांतले जवळ जवळ दोन पंचमांश निबंधलेखनाला असतात. शिवाय

कोणत्याही भाषेंत विशिष्ट विषयावरील आपले साधकबाधक विचार व्यवस्थित रीतीनें मांडतां येणें, ही गोष्ट प्रत्येक विद्वान् म्हणविणाऱ्या माणसाला फार अगत्याची आहे. तिसरें, सहाव्या किंवा सातव्या इयत्तेंत निबंध लिहिण्याची पाळी आली, म्हणजे बरींच मुलें गांगरून जातात; व ' सर, निबंध कसा लिहावयाचा तें शिकवा, ' असें शिक्षकाच्या पाठीमागें त्यांचें सारखें टुमणें असतें. तेव्हां हा निबंधलेखनाचा बाऊ नाहींसा व्हावा, कोणत्याही विषयावर आपले विचार संगतवार प्रदर्शित करण्याची संवय मुलांना लागावी, या हेतूनें बऱ्याच निबंधवजा पाठांचा या भागांत समावेश केला आहे. ' एक पंथ दो काज ' साधावे म्हणून ही योजना केली आहे.

आतां काय केलें म्हणजे वरील हेतु चांगला साध्य होईल, हेंही मी आपल्या अल्प अनुभवावरून सांगतों. प्रत्येक पाठ वर्गांत वाचून व समजावून झाल्यानंतर त्यांतील मुख्य मुद्दे शिक्षकानें मुलांकडून काढून घ्यावे. पहिल्यानें कांहीं दिवस आपण त्यांना तसे मुद्दे काढण्याला साहाय्य करावें; किंवा पाठ समजावून देतांना त्यांतील विशेष मुद्दे मुलांच्या मनांवर ठसवावे. नंतर वाचलेल्या पाठाचा सारांश आपल्या शब्दांत घरून लिहून आणण्यास मुलांस सांगावें. व ते पाठ तपासून जे मुळांतील मुद्दे राहिले असतील, ते त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आणावे. असा क्रम दोन वर्षें ठेविल्यास मुलांचा चांगला फायदा होतो, असा अनुभव आहे. खेरीज अशा संवयीनें कोणत्याही व्याख्यान वगैरे द्वारां ऐकलेल्या किंवा कोठेंही वाचलेल्या विषयांतील मुद्दे काढण्याची एक प्रकारची चांगली लकब मुलांना लागून त्यांचा पुष्कळ फ़ायदा होईल, असें माझ्या बुद्धीला वाटतें.

मानवी कृतींत दोष असावयाचेच, व एकाचे विचार दुसऱ्यास नेहमीं सर्वस्वीं ग्राह्य होतील असेंही नाहीं. या दृष्टीनें विचार करितां मीं केलेल्या उताऱ्यांची निवड सर्वांनाच पसंत होईल, अशी आशा करणें व्यर्थ आहे.

तरी ज्यांच्याकरितां हें पुस्तक तयार केलें आहे, त्या विद्यार्थ्यांच्या कोंवळ्या मनांची वाढ जोरानें व्हावी, थोर विचारांचें त्यांत बीजारोपण व्हावें, पुढील आयुष्यांतील खडकाळ मार्ग त्यांना हिंमतीनें क्रमतां यावा, त्यांची जिज्ञासा पुष्ट व्हावी, त्यांच्या ठिकाणीं सदभिमान जागृत व्हावा, असत्याचा तिटकारा बाणावा, तात्पर्य, त्यांचीं मनें सर्व बाजूंनीं सकस व्हावी, हा हेतु प्रत्येक पाठाची निवड करितांना मीं आपल्या नजरेपुढें ठेविला होता. त्याचा उपयोग कसा काय होतो, हें कालानें ठरणार आहे.

कारागीर लोकांनीं आपलें अलौकिक कौशल्य खर्च करून नानातऱ्हेचे मोहक पदार्थ मोठ्या मेहनतीनें तयार करावे, व त्यांचें प्रदर्शन तिसऱ्यानेंच करावें, तसाच थोडासा प्रकार उताऱ्यांचीं पुस्तकें प्रसिद्ध करण्यांत असतो. प्रदर्शनाचे व्यवस्थापक किंवा अशा पुस्तकांचे संपादक केवळ निमित्त-कारण असतात. या बाजूनें विचार केला म्हणजे या पुस्तकाचें सर्व श्रेय त्यांत ज्यांचे लेख समाविष्ट आहेत त्यांच्याकडे आहे. अर्थात् माझें त्यांत कांहींच नाहीं. प्रदर्शनीय वस्तु उठावदार दिसेल अशा रीतीनें प्रदर्शनाचे व्यवस्थापकांना मांडतां आली नाहीं, म्हणजे तिच्या ठिकाणीं येणारें वैगुण्य जसें कारागिराच्या पदरीं बांधणें इष्ट नव्हे, तसेंच या पुस्तकांत जर कांहीं वैगुण्य दिसेल, तर तेंमात्र मजकडे येईल.

“ जें जें कांहीं आपणांस ठावें । तें तें इतरांस शिकवावें । शहाणें करून सोडावें । सकळ जनां ” या समर्थोक्तीप्रमाणें खऱ्या विद्वानांचें वर्तन असतें. ज्या विद्यानंदाचा अनुभव ते घेत असतात, त्याचा वांटा आपल्या अज्ञ बांधवांना मिळावा, याच उदात्त हेतूनें ते निरनिराळ्या विषयांवर लेख लिहीत असतात. त्यांत ते स्वार्थापासून अगदीं अलिप्त असतात असा कांहीं भाग नाहीं; तरी खऱ्या विद्वानांच्या ठिकाणीं तो गौण असतो. आपले लेख जितके ज्यास्त लोकांच्या नजरेपुढें येतील तितका त्यांना आनंद

होतो. त्यांतल्या त्यांत भावी पिढीच्या शिक्षणासारख्या पवित्र व पुण्यप्रद कार्याकडे आपल्या लेखांचा उपयोग झाल्यानें थोरांना आनंदच वाटतो. तेव्हां ज्या कांहीं सन्मान्य लेखकांचे उतारे त्यांची औपचारिक परवानगी न घेतां–औपचारिक म्हणण्याचें कारण, ज्या कांहींची परवानगी मी घेतली, त्यांनी, 'हा आमचा एक प्रकारचा गौरवच आहे' असें स्मितपूर्वक उत्तर देऊन ती मोठ्या खुषीनें दिलेली आहे.–केवळ त्यांच्या सौजन्याबर भार टाकून मीं घेतले, ते मजवर या माझ्या धृष्टतेबद्दल रोष न करितां, ते सत्कारणीं लागत आहेत हें मनांत धरून, सदय मनानें मला क्षमाच करतील, अशी मला दृढ आशा आहे. या सर्व लेखकाचा मी सर्वस्वीं ऋणी आहें.

त्याचप्रमाणें माझे परमपूज्य गुरु **रा. रा. रामचंद्र भिकाजी जोशी** व माझे मित्र **रा. रा. भिकाजी विठ्ठल महाजन** यांनी व दुसऱ्या अनेक सद्गृहस्थांनीं मला वेळोवेळीं या पुस्तकाचे कामी जें साहाय्य केलें, त्याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहें. हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचें सर्व श्रेय चित्र-शाळेच्या म्यानेजरांकडे आहे. त्यांनीं तें काम शक्य तितक्या काळजीनें व थोड्या मुदतींत केलें याबद्दल तेही स्तुतीस पात्र आहेत.

शेवटीं या मालेचा पहिला भाग जसा अल्प काळांत लोकप्रिय झाला, तसाच हाही होवो अशी जगच्चालकाची प्रार्थना करून ही प्रस्तावना मी पुरी करतों.

पुणें, ता. १५–५–०९ **संपादक.**

---

# आवृत्ति सहावी.

ही आवृत्ति पांचवीचें केवळ पुनर्मुद्रण आहे. हींत मजकुरासंबंधीं कांहींही फरक केलेला नाहीं. ज्या शालाधिकाऱ्यानीं हें पुस्तक आपल्या शाळेंत सुरू केलें आहे, त्यांचा मी फार आभारी आहें. त्यानीं आपला आश्रय तसाच चालू ठेवण्याची कृपा करावी, अशी त्यास नम्र विनंती आहे.

पुणें ता. १५–२–१९२१ संपादक.



# अनुक्रमणिका.

## पुस्तक पहिलें.

---

## पुस्तक दुसरें.

---

# वाचनपाठमाला.

## भाग दुसरा.

## पुस्तक पहिलें.

### पाठ पहिला.

### बुद्धि.

मुलांनो, मी आज तुम्हांस बुद्धीविषयीं चार शब्द सांगणार आहे. पण अगोदर बुद्धि म्हणजे काय, ते आपण पाहू. ईश्वराने तुम्हांला नाक, कान, डोळे, जीभ आणि त्वचा अशीं इंद्रिये दिली आहेत; तशी इतर प्राण्यांनाही तीं दिली आहेत. आपण डोळ्यांनी पहातो, कानांनी ऐकतो, नाकाने वास घेतो, जिभेने चव घेतो, व त्वचा अथवा कातडी हिने स्पर्श जाणतो. यांपैकी कोणत्या ना कोणत्या उपायाने आपणांला पदार्थांचे ज्ञान होते, तसें इतर प्राण्यांनाही होते. ज्ञान मिळविण्याची ही जशी बहिरंग साधने आहेत, तसे प्राणिमात्राच्या संरक्षणासाठी एक फार अजब अंतरंग साधन परमेश्वराने दिले आहे. त्याचे नांव बुद्धि. गाई, बैल, म्हशी, घोडे, किडे, मुंग्या, पक्षी वगैरे सगळे प्राणी आपापले भक्ष्य शोधून

काढतात; थकले म्हणजे निजतात अथवा विसांवा घेतात; वाघानें डुरकावणी फोडली, किंवा त्यासारखें दुसरें एखादें संकट उत्पन्न झाले, म्हणजे जीव घेऊन पळतात. हे करण्याला त्यांना कोण शिकवितें? तर ईश्वराने दिलेली बुद्धि. ही बुद्धि उपजतच त्यांचे अंगीं असते. पण ही इतर प्राण्यांच्या आंगची बुद्धि निराळी, आणि मनुष्यांच्या आंगची बुद्धि निराळी. इतर प्राण्यांची बुद्धि खाणेपिणे, विसांवा घेणे व एकेकट्याने किंवा पुष्कळांचा जमाव करून आपल्या जिवाचे रक्षण करणे, एवढ्याच कामापुरती असते. या रोजच्या व्यवहारांपलीकडे त्यांची बुद्धि चाललेली बहुधा दिसत नाही; व त्यापलीकडे आपले काही कर्तव्य आहे. असे त्या प्राण्यांना वाटतही नाही. पण माणसांचे तसे नाही. त्यांची बुद्धि खाण्यापिण्याचे जिन्नस मिळविणे, विसावा घेणे, आपले रक्षण करणे वगैरे गोष्टीत चालतेच. पण याशिवाय आणखी दुसऱ्या पुष्कळ गोष्टीत तिचा उपयोग होतो. इतर प्राणी आपापल्यापुरते पहातात. मनुष्याला वाटतें की, समाज करून रहाणें चांगले; इतकेच नाही, तर समाज चांगल्या रीतीने चालावा व सर्वांचे कल्याण व्हावे. मग त्यासाठी आपणास थोडीबहुत झीज सोसावी लागली किंवा कष्ट पडले, तरी पतकरले. अशा बुद्धीनें जीं माणसे वागतात, त्यांनाच शहाणे लोक मोठीं समजतात.

मुलांनो, तुम्हांला कदाचित् वाटेल कीं, माणसांना बुद्धि ज्यास्ती व इतर प्राण्यांना कमी असते, एवढाच काय तो त्यांच्यांत फरक आहे; पण तसे नाहीं. मनुष्ये अधिक बुद्धिमान् व पशुपक्षी कमी

बुद्धिमान् एवढेंच केवळ नाही; तर माणसांच्या बुद्धीचे स्वरूपच कांही निराळे असते. माणसांच्या बुद्धींत आहे आणि इतर प्राण्यांच्या बुद्धींत नाही, असा मुख्य गुण म्हटला म्हणजे सारासार-विचारशक्ति हा होय. चांगलें कोणतें, वाईट कोणते, कोणतें घ्यावें व कोणते टाकावे, हे ओळखण्याची एक अद्भुत शक्ति ईश्वरानें माणसाला दिली आहे. ही शक्ति इतकी अद्भुत आहे की, मनुष्य-पणाचे लक्षण काय, तर ही सारासारशक्ति. असे पुष्कळ विद्वान् शहाणे लोक म्हणतात. चांगलेवाईट ओळखतां आले, तरी त्यांतले घ्यावयाचे कोणते व टाकावयाचे कोणते ते परमेश्वरानें माणसाच्या इच्छेवर ठेविले आहे. तिलाच इच्छाशक्ति म्हणतात. म्हणजे माण-साच्या अंगीं दोन प्रकारच्या शक्ति असतात. एक बरें—वाईट ओळ-खण्याची व दुसरी त्यांतले हवें तें घेण्याची. या दुसऱ्या शक्तीचा उपयोग जो चांगल्या प्रकारें करील, तो मनुष्य चांगला, व वाईट प्रकारें करील, तो वाईट. आपल्या हिताची गोष्ट कोणती ते कळत असून व ती घेण्याची शक्ति अंगी असून मनुष्य बळेंच वाईट गोष्ट घेऊं लागला, व त्यामुळें आपली सुधारणा करून न घेतां उलट वाईट मार्गाला लागला, तर अर्थात् त्याचा दोष माणसाकडे आहे, ईश्वराकडे नाही. पशुपक्ष्यांच्या अंगी या दोन्ही शक्ति नसतात. त्यामुळें त्यांना आपली स्थिति सुधारतां येत नाहीं; आणि ते आपली स्थिति सुधारण्याची कांहीं खटपट करीत नाहींत, याबद्दल त्यांना दोषही लावतां येत नाही.

चांगल्या गोष्टीचा परिणाम चांगला व वाइटाचा वाईट होतो. तो परिणाम ती गोष्ट करणारानें भोगला पाहिजे, त्यावांचून सुटका

नाहीं. म्हणून मी म्हणतो, बालवाचकांनो, तुम्ही कोणतीही गोष्ट करतांना परिणामाकडे नजर देऊन चांगली गोष्ट तेवढी करावयाची, वाईट गोष्ट करावयाची नाहीं, याविषयीं खबरदारी घ्या.

मुलांनो, मी तुम्हांस आतांच सांगितले की, इतर प्राण्यांना सारासारविचारशक्ति व इच्छाशक्ति या नसतात; या शक्ति केवळ माणसांच्याच ठायी असतात. अर्थात् बाकीचे प्राणी बिचारे यंत्राप्रमाणे कामें करणारे असतात. आपले कर्तव्य कोणते, व आपल्यावर जबाबदारी केवढी आहे, याचे ज्ञान त्यांना नसते. तें केवळ माणसांनाच असते. याच एका गोष्टीवर एकंदर नीतिशास्त्राचीं व कायद्यांची तत्त्वे बसविली आहेत. आपलीं शास्त्रे याच गोष्टीचा नीट विचार करून रचलेलीं आहेत; म्हणून जो शास्त्रांत सांगितल्याप्रमाणे वागणूक ठेवतो, त्याचे कल्याण होते, आणि ' अरेरे, आपण नीट रीतीने वागलो असतो, तर आज आपली अशी दुर्दशा झाली नसती ' असा पश्चात्ताप करण्याचे कारणही त्याला पडत नाहीं. याकरितां मुलांनीं वडील माणसें व गुरु यांचे ऐकावें. आणि शास्त्रांतल्या आज्ञा पाळण्यास झटावें.

**हरि गणेश गोडबोले.** आनंद.

---

# पाठ २ रा.



## ज्ञानाची महती.

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते**--भगवद्गीता.

ज्ञानाचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे सुखाची प्राप्ति व दुःखाचा परिहार करणें हा असून, याचकरितां सर्व मनुष्यप्राणी जगांत एकसारखे खपत असलेले आपण पहातों. मनुष्य सुशिक्षित असो वा अशिक्षित असो, तरुण असो वा वृद्ध असो, त्यास जेवढें सुख अधिक मिळेल तेवढें पाहिजे असतें. सुखाची व्याख्याही निरनिराळ्या मनुष्यांच्या कल्पनेप्रमाणें निरनिराळी असते. एकास अमुक एका गोष्टींत सुख वाटत असतें, तर त्याच गोष्टीविषयी दुसरा अगदीं उदासीन असतो. इतकेंच नाहीं, तर त्याला ती गोष्ट दुःखप्रद होते. कोणास गोड खाण्यापासून, कोणाला मद्यादि अंमली पदार्थांच्या सेवनापासून, कोणास उत्तम वस्त्रांपासून, तर कोणास अलंकारांपासून सुख होत असते. कवडी कवडी संचय करण्यांत कृपणास मोठी धन्यता वाटते! परंतु त्याच्या उलट परोपकारी गृहस्थाची वृत्ति असते. परोपकारार्थ आपल्या द्रव्याचा व्यय करण्यांत त्यास मोठे भूषण वाटते. सारांश, सुखाची कल्पना ही केवळ मानसिक असून त्या त्या मनुष्याच्या बुद्धीप्रमाणे ती आकुंचित अथवा उदात्त असते. मनुष्यास जसजसें अधिक ज्ञान होत जातें, तसतशी त्याची सुखाची कल्पना उदात्त होत जाऊन 'आत्मवत् सर्वभूतानि' या तत्त्वास अनुसरून मनुष्यमात्रास तो आपणाप्रमाणें मानूं लागतो.

मोत्यांची किंमत त्यांच्या पाण्यावर अवलंबून असते. जें मोतीं रुपया दोन रुपयांस मिळते, तेच पाणीदार असले कीं. त्याची किंमत दसपट वाढते ! त्याचप्रमाणे मनुष्याचें आहे. मनुष्याची किंमतही त्याच्या ज्ञानावर आहे. कित्येक विद्यार्जन करून ज्ञान संपादन करीत नाहीत. यामुळे त्यांची किमतही फारशी वाढत नाहीं. परंतु कित्येक अगाध ज्ञान मिळवून श्रेष्ठता पावतात. लोकांस त्यांचा अभिमान वाटून ते त्यांचे एकसारखे गुणानुवाद गातात. पुष्कळ लोक त्यांच्या धोरणाने वागतात, त्यांची भाषणें ऐकण्यास फार आतुर असतात. ते गत झाल्यास सर्व लोक दुःखानें विव्हल होतात! त्यांची स्मारके करितात. परंतु दुसरे कित्येक लोक—अशांची सख्या हजारांनी किंवा लाखांनी असावयाची—केव्हां जन्मतात, कोठें राहतात. केव्हां मरतात. याची कधी कोणी विचारपूससुद्धा करीत नाही! याचे कारण हेच की. नुसत्या मनुष्याची मुळीच किंमत नसून त्याच्या ज्ञानाची किमत असते. पशुकोटीत गोवतां येतील इतके कित्येक लोक ज्ञानशून्य असतात, व कित्येक देवकोटीत शोभतील एवढी त्यांची योग्यता असते. कित्येक ज्ञानपर्वताच्या शिखरी पोहोचतात, व कित्येक अज्ञानांधकारांत तसेच लोळत पडतात.

एका संस्कृत कवीनें मनुष्य व पशु यांची तुलना केली आहे. तो म्हणतो:—

" आहार, निद्रा इत्यादि विकार जसे मनुष्यांस असतात, तसेच पशूंसही असतात. पशूंपेक्षां मनुष्यांस ज्ञानच काय ते अधिक

असतें." पशुपक्ष्यांना परमेश्वराने उपजतबुद्धि दिली आहे. तिच्या योगानें त्यांना आपणांपुरते ज्ञान असते. आहार, निद्रा, भय, इत्यादि विकार त्यांना कळत असून ते तेवढ्यापुरती तरतूद करितात. परंतु त्यापलीकडे त्यांना ज्ञान नसते. जग हे काय आहे, त्यांतील वस्तुसंग्रह किती उपयुक्त आहे, ज्ञानभांडार केवढे प्रचंड आहे, मागल्या काळचे लोक कसे होते, वगैरे गोष्टींचे त्यांना मुळींच ज्ञान होत नाहीं. परंतु परमेश्वराने मनुष्याच्या ठिकाणीं जी बुद्धि ठेवली आहे, तिच्या योगानें त्यास वरील गोष्टी समजतात इतकेच नाहीं, तर याहीपेक्षां अज्ञात अशा अनेक गोष्टींचे ज्ञान त्यास करून घेतां येते. परमेश्वराच्या खालोखाल मनुष्याची योग्यता मानली जात आहे, त्याचे कारण फक्त त्याची बुद्धिच होय.

ज्ञान हे विद्याध्ययनापासून मिळते, व विद्याध्ययनापासून जे अनेक फायदे होतात, ते लॉर्ड बेकन याने फार उत्तम रीतीनें सांगितले आहेत. तो म्हणतो, "विद्याध्ययनापासून मनाला आनंद होतो, भाषणाला शोभा येते व बुद्धिही वाढते." एकान्त-वासांत व निवांतस्थळी असतां मनाची करमणूक करण्याला विद्या हेच मुख्य साधन होय. आपले सभाषण खुलवून देण्याला विद्या ही फार उपयोगी पडते. तसेच, एकाद्या कामाचा विचार करून त्याची जेथल्या तेथें व्यवस्था करतां येण्याला तिचा फार उपयोग होतो.

विद्याध्ययनानें स्वाभाविक गुण पक्क होतात, आणि अनुभवानें विद्याध्ययन पक्क होतें. कारण आंगची बुद्धि ही आपोआप उगव-

लेल्या झाडाप्रमाणें आहे. त्या झाडाची खच्ची केल्यानें ते जसें जोमदार होतें, तसे आंगच्या बुद्धीवर विद्येचें कलम केल्यानें तीही बळकट होते. कावेबाज लोक विद्येचा धिक्कार करितात, साधेभोळे लोक तिचें कौतुक मानितात, व शहाणे लोक तिचा उपयोग करितात.

सोंनें जमिनीत मातींत सांपडतें. परंतु ते शोधून काढण्यास पुष्कळ परिश्रम करावे लागत असून खर्चही बराच येतो. जमीन जरी चांगली सुपीक असली, तरी तींत चांगले पीक येण्यास तिची पुष्कळ मशागत केली पाहिजे, तरच तिचा उपयोग होतो. नुसता छानदार संगमरवरी दगड असून पुतळा बनत नाहीं. तर पुतळा बनविण्यास तो दगड मोठ्या कुशलतेनें कोरून काढिला पाहिजे. त्याचप्रमाणें नुसती बुद्धि उत्तम असली, तरी तिचा काय उपयोग? तिजवर विद्येचा संस्कार झाला तरच ज्ञान प्राप्त होतें. ज्ञान हें एकदम मिळत नाही. मधमाशी ज्याप्रमाणे महत्प्रयासाने मध गोळा करिते, त्याचप्रमाणे ते थोडें थोडे संपादन करीत गेले पाहिजे. ते एकदोन दिवसांत मिळत नसते, तर ते मिळण्यास तपेंच्या तपें घालवावीं लागतात. ज्याचे ज्ञान त्याला, त्याची अदलाबदल करितां येत नाहीं. अशी स्थिति आहे, म्हणूनच ज्ञानाची किंमत विशेष आहे. व त्याकरितां मनुष्यें एवढी खटपट करीत आहेत.

सिंह, व्याघ्र इत्यादि हिंस्त्र पशूंस मनुष्याने अगदीं अंकित करून टाकिले आहे. हत्ती, घोडे, उंट इत्यादि पशूंस तो गुलामांप्रमाणे

राबवून घेत आहे. जमिनीची लागवड करून तींतून आपल्या चरितार्थाकरितां धान्य निर्माण करीत आहे. खाणीतून मौल्यवान् धातु, दगड इत्यादि अनेक पदार्थ काढून तो आपल्या गरजा भागवीत आहे. तसेंच, हिरे, माणकें इत्यादि रत्ने काढून तो आपले शरीर सुशोभित करीत आहे. ग्रंथ लिहून क्षणार्धांत नष्ट होणारे विचार अमर करून टाकीत आहे. वायु, प्रकाश, ध्वनि, या तत्त्वांपासून-सुद्धां तो काम करून घेत आहे. विद्युत्, वाफ इत्यादि शक्ति शोधून काढून त्यांच्या साहाय्यानें अनेक उपयुक्त कामें करून घेत आहे. आकाशाच्या पोकळींत, पृथ्वीच्या पाठीवर किंवा पोटांत काय आहे, याविषयी त्यानें बरीच माहिती मिळविली आहे. या व इतर अनेक गोष्टी त्यास साध्य झाल्या आहेत, याचे मुख्य कारण काय? — तर ज्ञान.

**या. शं. वावीकर.** वाचन–ग्रंथमाला.

---

# पाठ ३ रा.



## अवलोकन.

आपण स्वतांविषयीं, दुसऱ्यांविषयीं किंवा जगांतील कोणत्याही गोष्टीविषयीं जें मनःपूर्वक व बारीक रीतीनें निरीक्षण करितों, त्यास अवलोकन असें म्हणतात. अवलोकन करण्याची संवय सर्वांस असते असे नाहीं. सर्व मनुष्यें रात्रंदिवस एकसारखे कांहीं तरी

व्यवहार करीत असतात. परंतु आपण काय करीत आहो, त्यापासून काय परिणाम होईल, कशाकरितां करीत आहों, हें असेंच कां करावें, किंवा कां करूं नये, असे अनेक प्रश्न मनांत आणून आपल्या डोळ्यांपुढे ज्या गोष्टी घडत आहेत, त्यांकडे विचारपूर्वक व शोधक दृष्टीनें पाहणारे असे फार थोडे लोक असतात. पुष्कळ लोक डोळ्यांनी पाहतात; परंतु पाहण्यापलीकडे ते मुळीच विचार करीत नाहीत. अशा लोकांस अंतर्दृष्टि म्हणजे काय, हें जन्मांतही कळत नाही. बाह्यदृष्टीपेक्षां अंतर्दृष्टीची किंमत विशेष असून ती अवलोकनापासून प्राप्त होते. मोठे मोठे कवि, ग्रंथकार, मुत्सद्दी, तत्त्वज्ञानी, धर्मसंस्थापक यांना अंतर्दृष्टि विशेष असते; आणि म्हणूनच सामान्य जनांवर त्यांचे विशेष तेज पडते.

सृष्टि ही शिक्षणाची मोठी शाळा आहे. या शाळेत मनुष्यास जे शिक्षण मिळते, ते प्रत्यक्ष व अनुभविक असून मोठमोठ्या पाठशाळेंत मिळालेले शिक्षण त्यापुढे रद्द आहे. अवलोकनास आद्यस्थान द्यावयाचें, याचें कारण हे की, प्रत्यक्ष वस्तु पाहून व स्वतः विचार करून मनुष्य येथे ज्ञान संपादन करितो. ते मिळविण्यात स्वतः परिश्रम केल्याने त्याची बुद्धि तीव्र होते, व त्याला विचार करण्याची हळुहळू संवय लागते. दुसऱ्याचे उच्छिष्ट ज्ञान संपादन करण्यांत बुद्धीस फारसे घर्षण घडत नसल्यामुळे ती फारशी विकास पावत नाहीं. अवलोकन हें सर्व काळीं व सर्व स्थळीं करितां येण्यासारखे असल्यामुळें त्यापासून सहज पुष्कळ ज्ञानप्राप्ति करून घेतां येते.

अवलोकनाची संवय लहानपणापासून लाविली, म्हणजे पुढे ती आपोआप वृद्धिंगत होते. मुलें लहानपणी फार जिज्ञासु असतात. कोणतीही गोष्ट पाहिली किंवा ऐकिली, म्हणजे ती तिजविषयी साहजिक अनेक प्रश्न विचारतात. अशा वेळीं त्यांच्या शोधकबुद्धीस योग्य वळण देऊन त्यांस अवलोकनाची संवय लावावी. अवलोकनाची संवय लागली म्हणजे जगांतील सर्व ज्ञानभांडार खुले झाले असे समजावे. कवि किंवा कादंबरीकार हे ज्या गोष्टी पहातात, त्यांपासून ते साधारण मनुष्यापेक्षां अधिक ज्ञान संपादन करून घेतात; आणि त्यामुळें त्यांचे ग्रंथ एवढे हृदयंगम होतात. आंग्लकविवर्य शेक्स्पियर याने एके ठिकाणी म्हटले आहे कीं, " अवलोकनशक्ति ही एक दिव्य दृष्टि आहे. ती ज्याला असेल त्याला दगडधोंड्यांत, झाडपाल्यांत, प्रत्येक वस्तूमध्यें, कांहीं तरी—दुसऱ्याला दिसत नाही, ऐकू येत नाही, किंवा समजत नाहीं, असे—दिसतें." पण ते कोणाला? जो अवलोकन करील त्याला. ज्याला अवलोकन म्हणजे काय, हे जन्मांतही ठाऊक नाहीं. अशाला मोठ्या पदार्थसंग्रहालयांत जरी नेऊन ठेविलें, तरी तो बापडा तेथें काय अधिक शिकणार आहे?

झाडांवरून फळे पडतांना पूर्वी अनेक लोकांनीं पाहिलीं होती. परंतु त्यांत कोणासही विशेषसे वाटलें नाही. परंतु असेच फळ पडतांना न्यूटन याने पाहिलें, तेव्हां त्याने गुरुत्वाकर्षणाचा नियम शोधून काढिला! चुलीवर पदार्थ शिजत असतांना वाफेने भांड्यावरील झांकण हालते, ही गोष्ट दररोज पुष्कळांच्या पाहण्यांत

आली होती; परंतु त्या वाफेच्या यंत्राचा शोध लावून मनुष्याच्या सुखांत भर घालण्याचें श्रेय जेम्स वॅट यानें घेतलें. गाईच्या आंचळांवरील देवी पाहून डॉक्टर ज़ेन्नर यानें गोस्तनदेवींचा शोध लाविला ! अशा रीतीनें लहानसहान गोष्टींवरून मोठमोठे शोध लागले, हें कशाचे फळ ? अर्थात् अवलोकनाचें.

**या. शं. वावीकर.** वाचन-ग्रंथमाला.

---

## पाठ ४ था.



### अनुकरण.

**भाग पहिला.**

अनुकरण म्हणजे काय, हें बहुधा कोणालाही सांगायला नकोच. दुसऱ्याचे पाहून तसे करणे, याचें नांव अनुकरण. हे अनुकरण दोन प्रकारचे आहे, एक शारीरिक व दुसरें मानसिक. शारीरिक अनुकरण म्हणजे दुसऱ्याचा हुबेहूब कित्ता उचलून, त्याच्याप्रमाणें बोलणें, चालणे, पेहराव करणे वगैरे; आणि मानसिक अनुकरण म्हणजे दुसऱ्याची विचारपद्धति उचलणें, त्याच्या मतांचा अनुवाद करणे इत्यादिक होय.

प्रस्तुत काळीं वरील विषयाचा विचार करण्याचें किती अगत्य आहे, हे कोणच्याही सहज लक्षांत येण्यासारखें आहे. तें असें कीं, आमचे राज्यकर्ते आम्हांपासून आचार, विचार, विद्या वगैरे

सर्व गोष्टींत अगदीं भिन्न आहेत; तर त्यांचें अनुकरण आम्हीं करावें कीं नाहीं, करणे झाले तर कोणत्या गोष्टीत, कितपत करावे, वगैरे गोष्टीचा विचार करणें या कालीं अत्यंत महत्त्वाचें आहे.

आतां अनुकरणाविषयीं सामान्य विचार केला असतां, ही गोष्ट कोणासही स्पष्ट दिसणार आहे कीं, ही प्रवृत्ति मनुष्यस्वभावासच खिळलेली आहे. यावरूनच 'मनुष्य हा अनुकरणशील प्राणी आहे.' अशी एका तत्त्ववेत्त्याने 'मनुष्य' या शब्दाची व्याख्या केली आहे. मनुष्य जे बरेवाईट आचरण करितो, त्याच्या अंगी जे गुणावगुण दृष्टीस पडतात, तें सर्व अनुकरणाचें फळ आहे असे सामान्य अनुभवावरूनही कळते. संस्कारविशेषाच्या योगाने पुढे कांहीं वेगळा प्रकार झाला तर न जाणो; पण जोंपर्यंत तो झाला नाही, तोपर्यंत मनुष्याचे धर्म हे सर्व साहजिक अनुकरणानें जसे बनवावे तसेच बनतील, हे उघड आहे.

आतां पाश्चात्त्यांपासून आम्हांस ज्या अनेक गोष्टी घेण्यासारख्या आहेत, व ज्यांपासून वरील प्रवृत्ति आम्हांस हितावह होण्यासारखी आहे, त्या सांगतो.

पाश्चात्त्य लोकांपासून, आणि त्यांतून विशेषतः इंग्रज लोकांपासून कित्ता घेण्यासारखी सर्वांत मोठी गोष्ट म्हटली म्हणजे व्यवस्थितपणा ही होय. कोणत्याही गोष्टीत इंग्रज लोकांचे वर्तन पाहा; राज्यकारभार, व्यापार, सामान्य व्यवहार, चोहोकडे जसा काय घड्याळाचा ठोका ! अमक्या अमक्या वेळेस अमके अमके काम व्हावयाचें म्हणजे त्या वेळेस तें झालेंच म्हणून समजावें; त्यांत

कधीं अंतर पडावयाचें नाहीं ! सृष्टीचे व्यापार जसे आज अनादिसिद्ध सुयंत्रपणे चालले आहेत, तसाच प्रकार आमच्या राज्यकर्त्यांच्या व्यवहारांचा होय, असे म्हणावयास चिंता नाही.

आतां तिकडून आमच्या मंडळीकडे जो वळावें, तों सगळा प्रकार याच्या उलटा. मोठमोठ्या संस्थानांतील कारभारापासून तों साधारण जेवणावळीच्या कामापर्यंत सारा एक प्रकार. तो काय ?–तर सुस्ती, अंदाधुंदी, हलगरजीपणा, कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं ! हा सर्व गैदीपणा आमच्या इतका आंगवळणी पडून गेला आहे की, त्याचे दोषरूपत्वही आम्हांस भासेनासे झाले आहे. जुन्या लोकांच्या तोंडून मराठी दरबाराची किंवा मोगलाईची तारीफ कधी कधी ऐकू येते. ती काय ?–तर ‘ अंदाधुंद कारभार ! ’ ‘ अलीजाही कारखाना ! ’ पण ही अलीजाही आम्हांस पुरती भोवून तिने आम्हांस अगदी अन्नास मोताद करून टाकिले असतांही, अद्याप आमचे डोळे उघडले आहेत असे नाही. आमचा श्रीमंतीचा धूर व बादशाही खाका अजून आहे तो आहेच !

दुसरी गोष्ट जेवणाची घ्या. या संबधाचा अनुभव नेहमी सर्वांस आहेच. बोलावणेकऱ्याला ताकीद की, सर्वांस दहा वाजतांचे आमंत्रण कर. लोक नेहमीचे घटलेलेच. त्यांनी मुळींच घरून बारा वाजतां किंवा एक वाजतां बाहेर पडावयाचे. मग तेथें जाऊन चार घटका भोजनप्रतीक्षा झाल्यावर, उपरान्तिक अन्नाचा लाभ व्हावयाचा ! त्यांतून एखादे बडे गृहस्थ यावयाचे असले, किंवा कांहीं मानपानाची मंडळी यावयाची असली, म्हणजे तर कांहीं विचा-

रूंच नये; मग बुभुक्षु जनांनीं बिछायतीवर एकेक झोप काढून घ्यावी हा उत्तम मार्ग ! आणि या मार्गास कित्येक अनुसरतात-देखील ! कां की, आमच्यांत आढ्यतेचे व श्रीमंताचे विशेष लक्षण म्हटले म्हणजे, हे कीं, निदान दोन बोलावणीं तरी घेतल्याखेरीज जागचें हालूंच नये. आणि त्यांतून बादशाही मिजास म्हटली, म्हणजे ही की, दोन बोलावणी परत जाऊन तिसऱ्या खेपेस सांगावयाचें कीं, कोणी येत नाही हो ! ! खरोखर पाहतां, हा केवढा मूर्खपणा आहे बरें ! ज्या बेट्यांना वेळेची किंमत कळत नाहीं, आपल्या एकट्या-करितां शेकडो मंडळीस ताटकळत ठेवण्याची ज्यांस शरम वाटत नाहीं, व पोरकटपणाची आढ्यता मिरवून आपले हंसे करून घेतल्याची ज्यांस पर्वा नाहीं, त्यांस काय म्हणावे ! असो. परमेश्वर करो, आणि असल्या जडशिरोमणीच्या डोक्यांत थोडी तरी समजूत शिरो ! या प्रार्थनेखेरीज त्यांस सुधारण्याचा दुसरा कांहीं मार्ग आम्हांस दिसत नाहीं !

यासंबंधाने युरोपियन लोकांचे रिवाज किती उत्तम आहेत. निमंत्रण व्हावयाचे, ते नुसत्या एका चिठ्ठीत ! पांच वाजतांचे बोलावणें असेल, तर पावणेपांच वाजता कोणाला कांहीं गडबडसुद्धां दिसावयाची नाहीं; पांचांच्या ठोक्याला पहावे तो तमाम मंडळी हजर ! कोणास यावयाचे नसलें, कीं त्याची माफीची चिठ्ठी हजर व्हावयाची ! या उत्तम व्यवस्थेमुळें सर्वांस किती सोईस्कर होते बरें ! हीच गोष्ट सभादिकांची. फार करून पांच मिनिटेंही त्यांचीं कधीं आगेंमागें व्हावयाचीं नाहींत. सारें काम एखाद्या यंत्राप्रमाणें चाला-

वयाचे ! पण आमचें यंत्र एकदां कधीं काळीं बिघडले आहे, तें आजमित्तीपर्यंत ! तें परमेश्वरसत्तेने कधीं ताळ्यावर येईल ते येवो ! येईल तो सुदिन, इतकें बरीक खरें !

इंग्रज लोकांपासून कित्ता घेण्यासारखी दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे साहस होय. हा गुण ज्या मानानें राष्ट्रांत असतो, त्या मानानेंच त्याचा उत्कर्ष किंवा अपकर्ष सामान्यतः आढळतो. शरीराचें चालक जसें मन, त्याप्रमाणेंच मनाचें चालक साहस हें होय. साहसजन्य उत्साह ज्याच्या मनाला नाहीं, तो केवढाही बुद्धिमान् असला, तरी सुस्तींत पडलेल्या अजगराप्रमाणें किंवा मेलेल्या हत्तीप्रमाणेंच तो होय, यांत संशय नाहीं. त्याचा मोठेपणा म्हणजे अवजडपणा; त्यापासून उपयोग म्हणून कांहीं एक नाहीं ! इंग्रज लोक केवढे साहसप्रिय आहेत, हें येथें सविस्तर सांगायला पाहिजे असें नाहीं. त्यांच्या उलाढालींपासून व उपद्व्यापापासून सुटलें, असें या जगांत कांहीं आहे काय ?

---

## पाठ ५ वा.



### अनुकरण.

#### भाग दुसरा.

आतां इंग्रज लोकांच्या जात्यभिमानाकडे वळूं. कोणत्याही राष्ट्रास नीच स्थितींतून उच्च स्थितीस येण्यास जे गुण अवश्य

आहेत, त्यांपैकीं जात्यभिमान हा एक होय. ज्या देशाच्या लोकांत हा गुण चांगलासा वसत नाहीं, त्या देशाच्या हातून मोठीं कामें होण्याचा सशयच आहे. ज्याप्रमाणे कार्पासतंतु निरनिराळ्या मौक्तिक-फलांत प्रवेश करून, त्यांचा एक हार बनवून सोडतो, त्याप्रमाणें जात्यभिमानाचा बंध एका जातीच्या अनेक व्यक्तींस एकत्र करून त्यांस प्रेमबद्ध करून टाकितो. हा अभिमानाग्नि लोकांच्या अंतः-करणांत प्रज्वलित झाला, म्हणजे त्यापुढे कोणाचे कांहीं चालत नाहीं. एखाद्या वेळेस हा विकोपास जाण्याचा संभव आहे हे खरे; व तसा गेला तर त्यापासून फार वाईट परिणाम होतात, हेंही आम्ही कबूल करितो. परंतु बाह्य जगांत अशी कोणती वस्तु आहे, किंवा अंतःकरणांत असा कोणता मनोविकार आहे कीं, त्याचा दुरुपयोग केला असतां तो घातुक होत नाहीं? बचनाग-सोमलादि मी मी म्हणविणारी जालीम विषें, सदुपयोग केला असतां गुणावह होतात. व संजीवनी, सुवर्णमालिनी, किंवा मौक्तिकरस यांसारखीं राजमान्य रामबाण औषधेंसुद्धां अज्ञानामुळे व दुरुपयोगामुळे प्राणहारक होतात, ही गोष्ट चांगली अनुभवसिद्ध आहे. तथापि कोणत्याही मनोवृत्तीस किंवा बाह्य वस्तूस चांगली-वाईट म्हणावयाचें, ते तिच्या सामान्य स्वरूपावरून होय. मदमत्त झालेल्या द्विपेंद्राने एखादे वेळीं क्वचित् प्राणनाश केला, म्हणून ज्याप्रमाणे ऐरावतीलक्ष्मीचा अनादर करणे योग्य नाहीं, त्याप्रमाणेच कांहीं प्रसंगीं प्रकुपित होणाऱ्या जात्यभिमानापासून जरी घोर अनर्थ घडतात हे खरे असले, तरी त्यासाठीं या अनुप-

मेय गुणाचा तिटकारा करणें बरोबर नाहीं. जात्यभिमानापासून वाईट परिणाम होण्याचें कारण, कधीं कधीं धर्माभिमानाशीं त्याची घट्ट गट्टी असते, हे होय. हे दोघे बंधु स्वभावरीत्या एकत्र झाले, म्हणजे सर्व जगास भारी होऊन बसतात. या दोघांपैकीं मागून निर्देशिलेल्या गुणाची प्रकृति विशेष तर्कटवाईक, लहरी आणि जलाल आहे. यामुळें या वडील बंधुराजांनी एखादे वेळेस उग्र-रूप धारण केले, म्हणजे छोटे बंधु त्यांच्यापुढे हूं कीं चूं करीत नाहीत. केवळ ज्येष्ठांच्या तंत्रानें ते आपलें आचरण ठेवितात. ही गोष्ट नीट लक्षांत वागवली असतां व एकाचा दुसऱ्यावर वरचष्मा न होऊं देण्याची खबरदारी घेतली असतां जात्यभिमान हा गुण कांहीं वाईट नाहीं; एवढेंच नाहीं, तर स्वोन्नत्यर्थ व देशोन्नत्यर्थ त्याची आवश्यकता आहे.

आतां हे सर्वांस श्रुतच आहे कीं, हा जात्यभिमानाचा गुण इंग्रज लोकांत पूर्वीपासून पूर्णपणें वसत आहे. पण आमची तऱ्हा पहा! एकाचें तोंड पूर्वेकडे तर दुसऱ्याचें पश्चिमेकडे, आणि कोणाची दाद कोणास नाहीं! आम्ही हिंदुलोक मूळचे चतुर्वर्णा-श्रमी असतां कालांतरानें आम्हांत किती तरी जाति उद्भवल्या आणि पुढे आणखी किती उद्भवणार आहेत, परमेश्वर जाणे! या जात्य-नंतत्वामुळे आमच्या जात्यभिमानाचे तुकडे तुकडे झाले, आणि हीच गोष्ट पुढें हरएक प्रकारें आमच्या नाशास आणि दुर्दैवास कारण झाली हे उघड आहे. याकरितां ही गोष्ट निरंतर लक्षांत ठेवून या जात्यभिमानाच्या बाबतींत इंग्लिश लोकांचें अनुकरण

करणें आपणांस किती योग्य आहे, याचा वाचकांनीं विचार करावा म्हणजे झालें.

पाश्चात्त्य लोकांपासून आमच्या लोकांनीं घेण्यासारखी आणखी एक मोठी गोष्ट एकी होय. एकी म्हणजे अवघ्या राष्ट्राची जूट. ही जूट आमच्या देशांत अनेक कारणांनीं कमी असल्यामुळें, आमच्यांत अवदशा शिरण्यास मार्ग झाला. वरील गोष्ट इतिहासाच्या द्वारें हवी तशी सिद्ध करून देतां येईल, व प्रत्यक्ष अनुभवही तसाच आहे, हे कोणास ठाऊक नाही असे नाहीं. पण हे सर्व आम्हांला काय होय? आमचे अवगुण आम्हांला सुटतील तेव्हां पुढे सर्व गोष्टी! या अवगुणांचा राजा म्हटला म्हणजे ऐक्याभाव हा होय. त्यांतून विशेष लज्जास्पद गोष्ट ही कीं, एक वेळ अज्ञान व गांवढळ लोकांची जूट बऱ्याच प्रकारें बनवितां येईल, पण चार अक्कलवान् व शहाणेसुर्ते जमले कीं, चौघाचीं तोंडें चार दिशांस झालींच! कुणब्यामाळ्यांत पाहिजे तसा कट करितां येईल; पण '**वर्णानां ब्राह्मणो गुरुः**' असें म्हणविणाऱ्यांत एकी करतांना बिचारा ब्रह्मदेवही थकेल असें वाटतें. सारेच बृहस्पति पडले, मग कोणी कोणाचें ऐकावें? इंग्रजींत एक म्हण आहे कीं, "बबर्जी फाजील झाले कीं सैपाक बिघडलाच!" हिचा येथे चांगला अनुभव येतो. खरोखर हाच प्रकार आम्हांस भोंवतो आहे. तर इंग्रज लोकांकडे पाहून त्यांच्या आंगचा हा जुटीचा गुण ज्या दिवशीं आमच्या लोकांच्या हृदयांत बिंबेल तोच सुदिन समजला पाहिजे.

आतां आणखी एकाच गुणाविषयीं विवरण करावयाचें. हा गुण म्हणजे मानसिक धैर्य,—ज्यास इंग्रजीत ‘ मॉरल करेज ’ म्हणतात तो—होय. शारीरधैर्य म्हणजे काय, हे कोणास सांगावयास नकोच. अंगधिटाईन शत्रूवर चालून जाणे, संकटसमयीं न डगमगणें इत्यादि व्यापार ज्या गुणाचे आविर्भाव होत, त्यास शारीरधैर्य नांव आहे. आतां मानसिक धैर्य म्हणजे काय, हें सांगतों. स्वतंत्रतेनें विचार करणे, व तसा विचार करून जे तथ्य वाटेल, ते विनदिक्कत बोलून दाखविणे, आणि बोलण्याप्रमाणें आचरण ठेवणे, या तीन गोष्टीस वरील नांव दिले आहे. खरा शूर आहे, तो जसा शत्रूंच्या संख्येची पर्वा न करितां त्यांच्यावर बेलाशक तुटून पडतो व धारातीर्थी पतन पावण्याचा उत्साह धरतो, त्याचप्रमाणें मानसिक धैर्य ज्याच्या ठायीं खरें वास करतें, तो पुरुषही प्रतिपक्ष्याच्या आक्षेपांस किंवा निर्भर्त्सनेस खुशाल एकीकडे गुंडाळून ठेवितो, आणि आपल्या मतांचे निःशंकपणें प्रतिपादन करून त्यांप्रमाणे आचरणही करावयास चुकत नाही.

हा विषय बराच लांबला आहे, व याहूनही तो लांबण्यासारखा आहे, यांत संशय नाहीं. पण येथवर दाखविलेल्या गुणांच्या संबंधाने आम्हांत व आमच्या पाश्चात्त्य आर्यबंधूंत किती अंतर आहे, हे लक्षांत आणलें असतां आमच्या वाचकांची बहुत करून खात्री होईल कीं, नसत्या वरकांती अनुकरणापेक्षां अंतर्गत सद्गुणांचा कित्ता वळवणे, हेच आपणांस सांप्रत फार श्रेयस्कर आहे. ही गोष्ट त्यांच्या लक्षांत भरवून देण्याकरितां प्रस्तुत विषय आम्हीं

बुद्धया उचलला आहे. या आमच्या लेखानें जर वाचकांच्या मनांत वरील तत्त्व थोडें तरी बिंबलें, तर आमच्या कलमास विनाकारण शीण झाला नाहीं, असें होईल; नाहीं तर आमच्या शूद्र कवीचा 'सुवर्णकारनलिका—' न्याय अनुभवसिद्धच आहे:—

**नळी फुंकिली सोनारें। इकडून तिकडे गेलें वारें॥**

**वि. कृ. चिपळूणकर.** किरकोळ लेखसंग्रह.

---

## पाठ ६ वा.



## चैनीची चट.

मनुष्याला चांगल्या गोष्टीची चट लागली, म्हणजे सौजन्य वाढतें; पण वाईट गोष्टीची चट लागली, म्हणजे मोठा अनर्थ होतो. चैनीची चट ही वाईटांपैकी आहे. चैन एकदां वाढूं लागली, म्हणजे त्या मनुष्यावर नाहीं नाहीं ती संकटें ओढवतात.

उत्तरसमुद्राकडील अत्यंत थंड व बर्फमय असलेला लापलंड देश बहुतेकांस माहीत असेलच. ह्या देशांत ह्याको ह्या नांवाचा एक राजा होऊन गेला. हा उत्तरप्रांतांतील योद्धयांत मोठा नामांकित असे. एका मोठ्या पाषाणस्तंभावर त्याचे गुणानुवाद कोरून ठेविले आहेत. तसेंच त्या देशांतील रात्रींच्या संवत्सरोत्सवांत तद्देशीय लोक हातांत वीणा घेऊन त्याचें भजन करतात, व तालसुरांवर त्याचे पोवाडे गातात.

हा राजा जसा शूर होता, तसाच तो मोठा शहाणा व समजूतदार असे. त्याचा नियमितपणा आणि कडकपणा हे त्याचे गुण तर फारच वर्णनीय असत. त्यानें आपल्या भर ज्वानीत मद्यास स्पर्शसुद्धां केला नाहीं. हें तर काय, पण कोणतेंही पेय पिणें तर तें साध्या पेल्यांतून प्यावयाचें, नकशीच्या किंवा वेलपत्ति काढलेल्या पेल्यास हात लावावयाचा नाही, इतका तो साधेपणानें वागत असे. तो नेहमीं हातांत भाला घेऊन व अंगांत चिलखत घालून निजत असे. ज्याचा दांडा पितळेनें किंवा चांदीनें मढविलेला असेल, तो युद्धपरशु कधीं वापरावयाचा नाहीं, असा त्याचा नेम असे. म्हणजे एकंदरींत त्याला चैन म्हणून कसली ती आवडत नसे. त्यानें डामडौलांत असा एकही दिवस कधीं घालविला नाही.

एके दिवशीं तो रानडुकराच्या पारधीस गेला असतां. त्यास मोठें ओसाड अरण्य लागलें. त्यांतून चालतां चालतां तो अगदीं थकून गेला, आणि क्षुधेनें व तृषेनें त्याचा जीव व्याकुळ झाला. इतक्यांत दैवयोगानें एका मोठ्या वृक्षाच्या ढोलींत एक मोठें मोहोळ लागलें होतें, त्याच्याकडे त्याची दृष्टि गेली. हा कालपर्यंत त्या राजानें मध म्हणून कसला तो चाखलासुद्धां नव्हता. ह्या वेळीं तो खूप दमला होता, आणि त्याच्या पोटांत भूकही कडक लागली होती; म्हणून त्यानें मधावर यथेच्छ ताव मारला. मध जात्याच गोड, त्यांत त्यानें त्याची प्रथमच चव घेतलेली, आणि तीही प्रखर क्षुधेच्या वेळीं ! ह्यामुळें त्यास तो पदार्थ इतका आवडला कीं, तो

तेथून परत आल्यावर त्याने आपल्या स्वयंपाक्यास ताकीद देऊन ठेवली कीं, प्रत्येक दिवशीं माझ्या भोजनांत मध ठेवावा.

पण ह्या योगाने झाले काय? 'मधाचें बोट लागलें' म्हणतात, तसें हें खरोखरच मधाचें बोट लागलें. वाढून आलेल्या ताटांतील पक्कान्नांची उत्तरोत्तर तो अधिक चिकित्सा करूं लागला, आणि त्याचा पूर्वींचा भोजनाचा बेत अगदीं बिघडून गेला. त्याची पहिली रुचि अगदीं पालटून गेली. रोजचें साधें जेवण, जें तो आजपर्यंत मनापासून जेवी, तें त्यास अगदीं दृष्टीपुढेही नको असें वाटूं लागलें. त्याची जिव्हा मोठी चोखाळ बनली. आज हें तर उद्यां तें, अशीं रोज नवीं नवीं पक्वान्नें तयार होऊं लागलीं. ह्याप्रमाणें भोजनांत सुधारणा झाल्यावर अशा भोजनान्तीं मुखशुद्धीकरितां योग्य अशी उत्तमोत्तम फळफळावळ असावी, असें त्याच्या मनांत भरलें. आणि त्यासाठीं त्यानें आपल्या सर्व राजवाड्याभोंवतीं सुंदर सुंदर बागा लावण्याविषयीं हुकूम दिला. जेथें पूर्वीं मल्लयुद्ध वगैरे करण्याचीं प्रसिद्ध स्थळें होतीं, तेथें आतां द्राक्षें, पपनसें, डाळिंबें इत्यादि फळांचे घोस आढळूं लागले. व त्यांस भलत्यानें कोणी हात लावूं नये, किंवा त्यांच्याकडे पाहूंसुद्धां नये, अशी ताकीद फिरली.

ह्याप्रमाणें मुखशुद्धीच्या फळफळावळीवर बस्तान येतांच, मधुर फळांच्या मद्याची चव कशी लागते, याचा एक वेळ अनुभव घेण्याची शक्कल निघाली. किंवा इतक्या थाटास ते अगदीं आवश्यकच झालें, म्हटलें तरी चिंता नाहीं. याप्रमाणें मद्याची एक वेळ चट लागतांच तें व्यसन फैलावलें आणि राजा बेहोष होऊन पडण्यापर्यंत

मजल येऊन पोचली. त्याचा पूर्वीचा साधेपणा अस्तास गेला. त्याच्या बैठकीची जागा नानाप्रकारच्या अत्तरांनीं सुगंधित झाली. त्याच्या शिरस्त्राणावर त्यानें हस्तिदंताचें सुंदर नकासकाम करण्यास आज्ञा दिली. ऐषआराम वाढल्यामुळे त्याचा लष्करी बाणा नाहींसा झाला, त्याच्या शरीरांतील स्नायु ढिले पडले, आणि सुस्ती व भागूबाई-पणा ह्यांनी आपला पगडा वर चढविला. पण ही गोष्ट इतकी हळु-हळू झाली की, त्याच्या ती ध्यानांतसुद्धां आली नाहीं.

ह्याप्रमाणें **ह्याको** हा आपल्या चैनींत गुंग असतां, **नार्वे** देशाचा राजा मोठ्या सैन्यानिशीं त्याजवर चाल करून आला. **ह्याको**ही स्वतः पुढारी होऊन त्याशी सामना करण्यास निघाला. आणि ज्या अरण्यांत पूर्वीं **ह्याको** हा रानडुकराची शिकार करण्यास गेला होता, त्याच अरण्यांत उभय पक्षांकडील सैन्यें एकमेकांस भिडली. **नार्वे**च्या राजानें आपल्या पराक्रमाने **ह्याकोस** मागे सारीत सारीत जेथें वृक्षाच्या ढोलींतला त्यानें प्रथम मध खाल्ला होता, त्या जागेपर्यंत नेऊन भिडविले. **लापलंड**चा राजा अगदीं सुस्त झाला होता. आज किती एक दिवस शस्त्र म्हणून कसले ते त्याने हातांतसुद्धां धरलें नव्हतें. त्यामुळे तो तेव्हांच थकला. इतक्यांत शत्रूने धावून येऊन त्याजवर शस्त्राचा मोठा घाव घालून त्यास चीत केले. आपण ह्यांतून आतां कांहीं वांचत नाहीं, अशी **ह्याको**ची पक्की खात्री झाली. प्राणोत्क्रमणापूर्वीं त्यास मोठा पश्चात्ताप झाला आणि तो म्हणाला, "अरेरे ! मी चैनीला आणि आळसाला बळी पडलों ! **ह्याको**चा

पराभव नार्वेच्या राजाच्या हातानें केला नाहीं, तर ह्या अरण्यांत त्यानें जो मध खाल्ला त्या मधाने केला.''

चैनीची चट किती वाईट आहे, व तिच्यापासून कसे अनर्थ ओढवतात, हें वरील गोष्टीवरून चांगलें कळून येतें.

**कृ. ना. आठल्ये.** केरळकोकिळ.

---

## पाठ ७ वा.



## इच्छी परा, तें येई घरा.

वनवासांत राहून हालअपेष्टा सोशीत पांडव दिवस कंठीत असतां, इकडे हस्तिनापुरांतील दुर्योधनादि चांडाळमंडळ स्वस्थ बसलें नव्हते. पांडवांचें सर्व वैभव नष्ट होऊन आतां ते वनामध्यें द्रौपदीसह वल्कलें नेसून राहिले आहेत, तेव्हां कोणत्या तरी निमित्तानें तिकडे जाऊन व आपलें वैभव दाखवून त्यांना लाजवावें व त्यांचे दुःखावर डागण्या द्याव्या, अशी अजब युक्ति कर्ण व शकुनि यांनीं काढून ती दुर्योधनास कळविली. अन्यायानें सज्जनांना छळून त्यांस नुसतें नागविण्यानेच दुष्टांचें समाधान होत नसतें. सज्जन दुःखांत असतां आपलें वैभव त्यांचे डोळ्यांपुढें नाचवून त्यांस हिणविण्यांतच दुष्टांना मोठा आनंद होत असतो. द्वैतवनामध्यें कौरवांचे घोष ( खिल्लारखाने ) होते, ते पाहण्यासाठीं व मृगया करण्यासाठीं वनांत जावयाचें, असें निमित्त करून त्यांनीं ती गोष्ट

धृतराष्ट्रापाशीं काढिली. परंतु त्यास हा बेत कांहीं निराळ्याच कारणामुळें रुचला नाहीं. कौरवांच्याच अन्यायाचरणामुळें सांप्रत पांडव वनांत दुःख भोगीत आहेत. तेव्हां कौरवांना पाहतांच कदाचित् ते चवताळून येऊन दुर्योधनाचा वध करून सूड उगवतील, अशी धृतराष्ट्रास भीति पडली ! म्हणून प्रथमतः त्यानें या गोष्टीस अनुमोदन दिलें नाहीं. शकुनिमामास पांडवांचा स्वभाव चांगला ठाऊक होता; व तो त्याचा फायदा घेण्याचा नेहमी उपदेश करी. ‘ धर्मराजा सत्य सोडणार नाहीं. तो प्रतिज्ञाभंग कधींही करणार नाहीं. त्याचे बंधुही सदोदित त्याचे आज्ञेंत वागणारे आहेत. तेव्हां आम्हांस भीति बाळगण्याचे कांहीं कारण नाहीं.’ अशा प्रकारें मामांनीं समजूत घातल्यामुळें अखेरीस धृतराष्ट्रानें घोषयात्रेची परवानगी दिली. नंतर दुयाधन आपलें सैन्य, बंधु व स्त्रिया या सर्वांना बरोबर घेऊन द्वैतवनांत आला. प्रथम घोषांत जाऊन त्यांनीं तेथील गाई, बैल, वांसरें वगैरे पाहिलीं; नंतर सर्वांनीं मृगया केली. शेवटी पांडव त्या वनांतील ज्या सरोवराजवळ रहात होते, तेथें जाऊन जलक्रीडा करण्याचा बेत करून दुर्योधनाने आपले सेवक तिकडे पाठविले. तेथें त्याचे आधींच चित्रसेन गंधर्व अप्सरांसह जलक्रीडा करीत होता; म्हणून इतर गंधर्वांनीं कौरवांच्या सेवकांना धिक्कारून परत जाण्यास सांगितलें. दुर्योधनाचा असा अपमान झालेला पाहून कौरवांनीं गंधर्वांशीं युद्ध सुरू केलें. लढाईचे आरंभीं कौरवांनीं बराच पराक्रम केला. परंतु शेवटीं गंधर्वांनीं कर्णाचे घोडे, सारथि व रथ यांचा विध्वंस केल्यामुळें तो खालीं उतरून विकर्णाचे रथांत

बसून पळून गेला. नंतर कांहीं वेळ दुर्योधन, दुःशासन इत्यादिकांनीं युद्ध चालविले. परंतु शेवटी चित्रसेनानें दुर्योधनादि कौरव पराभूत केले; आणि ते व त्यांच्या स्त्रिया यांना कैद करून त्या सर्वांना घेऊन जयघोप करीत तो जाऊं लागला ! इकडे त्या युद्धांतून जीव घेऊन पळून आलेले कौरवांचे अमात्य युधिष्ठिरास शरण आले; आणि दुर्योधनाला व कौरवस्त्रियांना मुक्त करून कुरुवंशाची लाज राखा, अशी त्यांनीं विनंती केली. हे वृत्त ऐकून, ' आम्ही क्षत्रिय असूनही आज येथे वनांत हातपाय जोडून माशा मारीत बसलों असतां, तिऱ्हाइतान आमच्या शत्रूस पराभूत करून आमची लाज राखली म्हणावयाची ! जें काम करावयास आम्हांस मोठें सैन्य तयार करून युद्ध करावे लागलें असतें, तें आयतें परभारें तिसऱ्यानें केलें ही चांगली गोष्ट झाली.' असें भीमसेन आनंदानें म्हणाला. परंतु हे बोलणे अर्थात् धर्मास खपलें नाहीं. ' हे लोक आपणांस शरण आले आहेत; तेव्हां त्यांचे रक्षण करणे हें आम्हां क्षत्रियांचे कर्तव्य आहे. आपल्या जातीमध्यें किंवा कुलामध्यें कितीही कलह होवो, त्यास जेव्हां कोणी बाहेरचा मनुष्य त्रास देईल किंवा अपमान करील, तेव्हां त्याचा प्रतिकार प्रत्येकानें केला पाहिजे. कुरुवंशांतील स्त्रियांना गंधर्वांनीं कैद करून घेऊन जावें व आपण स्वस्थ बसावे, हें आपल्या कुलास व आपल्या क्षत्रियत्वासही लांछन आहे. आपसांत भांडण असेल तेव्हां ते शंभर व आपण पांच आहोंत, पण तिसऱ्याशी तंटा असेल, तेव्हां आपण एकशेंपांच झालें पाहिजे.' याप्रमाणे बोध करून दुर्यो-

धनास मुक्त करून आणण्यासाठीं त्यानें भीमादिकांस पाठविलें. त्यांनीं चित्रसेनाबरोबर पुष्कळ वेळ युद्ध करून त्याच्या मायेसही न जुमानतां आपलें शौर्य व आपला पराक्रम त्यास दाखविला. शेवटीं चित्रसेन स्वतः अर्जुनाकडे येऊन म्हणालाः—"तुम्ही वनवासांत असतां तुम्हांस आपले वैभव दाखवून हिणविण्यासाठीं हा दुर्योधन इकडे आला होता; म्हणून त्याला पकडून आणण्यासाठीं इंद्रानें आम्हांला आज्ञा केल्यावरून आम्हीं त्याला कैद केलें." यानंतर सर्व कैद्यांना घेऊन चित्रसेन धर्माकडे आला. धर्मराजानें तत्काळ सर्वांना बंधमुक्त केलें. चित्रसेन धर्मार्जुनांचा निरोप घेऊन निघून गेल्यावर धर्मराजा दुर्योधनास म्हणालाः—"सुयोधना, असें साहस पुनः करूं नको. साहसी पुरुषांना कधींही सुख होत नाहीं; तुझें व तुझ्या भावांचें कल्याण असो. तूं आनंदाने आपल्या घरी जा, व झाल्या गोष्टीबद्दल किमपिही विषाद मानूं नको." हें ऐकून अतिशय लज्जित झालेला दुर्योधन युधिष्ठिरास नमस्कार करून तेथून मुकाट्यानें चालता झाला. आपलें व आपल्या स्त्रियांचें वैभव दाखवून वल्कलें नेसून वनांत दिवस कंठणाऱ्या भीमार्जुनांस व द्रौपदीस हिणविण्यासाठीं जे आपण आलो, त्यांस उलट त्यांचेसमोर कैदी म्हणून उभे रहावें लागलें, व सुटकाही त्यांचेमुळेंच झाली; आपल्या स्त्रियांसमक्ष आपल्यावर आलेला हा दुर्धर प्रसंग व ही झालेली फजिती दुर्योधनाचे मनास फारच बोचूं लागली.

**ब. गो. लिमये.** भारतीय युद्ध.

---

## पाठ ८ वा.



### घर.

लहान माणसें मोठ्या माणसांच्या आज्ञा पाळितात; मोठीं माणसें लहान माणसांचें कल्याण करितात; सगळी माणसे एकमेकांवर मनापासून प्रेम करितात; सगळी माणसे नेहमी खरे बोलतात; सगळीं माणसे नेहमीं सत्याचरण करितात; सगळी माणसें एकमेकांचा संतोष करण्यास झटतात; सगळी माणसे अंतःकरणपूर्वक देवाची भक्ति करितात; दया, क्षमा आणि शांति ह्यांची वसति पुष्कळ आहे; काम, क्रोध, मद, मत्सर, इत्यादिकांस थारा नाही; हेवा, द्वेष, कुवासना इत्यादिकांची सावलीदेखील पडत नाही; एका माणसास सुख झाले म्हणजे ते सर्वांस होते; एकाऱ्या पायास कांटा लागला की, सगळ्यांचे डोळ्यांस पाणी येते; बोलायचे काय, तर सत्य; वाचायचे काय, तर सच्चरित; गावयाचे काय, तर परमेश्वरगुणानुवर्णन; आणि करायचे काय, तर धर्मशास्त्राने जे काय अत्यंत पवित्र म्हणून सांगितले आहे ते; इतक्या गोष्टी ज्या ठिकाणी घडतात, तेच घर होय; आणि अशा ठिकाणीं राहणारीं जीं माणसे असतात त्यांसच कुटुंब म्हणावे. या गोष्टींचा अभाव झाल्यावर एखाद्या ठिकाणी इतर कितीही चांगल्या आणि सुखदायक गोष्टी असल्या, तरी ते घर नव्हे, ते अरण्य होय; आणि असे सद्गुणांचे राज्य ज्या माणसांत नाही, त्या माणसांस कुटुंब म्हणूं नये, गुरे म्हणावें. जनावरे म्हणावे. याप्रमाणे चांगली माणसे वागत

आली आहेत. दाशरथि राम अयोध्या सोडून निघाले; ते कां? तर कुटुंबामध्यें मत्सराचें प्राबल्य झालें. भरतानें राज्यत्याग केला; तो कां? तर त्यांत प्रेम नाहींसें झालें. धर्मराजांनीं राजधानी सोडली; ती कां? तर राज्यांत सापत्नभाव आणि दुष्टावा अतिशय माजला. म्हणजे रामचंद्रास घर हें अरण्य वाटूं लागलें, तसें धर्म-राजांस आप्तांत राहणें हें अरण्यवासापेक्षां दुःखद वाटूं लागलें. हे दोघेही महात्मे स्वधामें सोडून अरण्यांत गेले. तेथें त्यांजपाशीं राज्यलक्ष्मी नव्हती, दरिद्र होतें; तरी सत्यप्रेम पुष्कळ होतें. त्याच्या योगानें त्यांस अरण्येंही स्वगृहापेक्षां अधिक सुखप्रद वाटलीं. सीतेनें अरण्यांतली स्थिति आपल्या बहिणीस सांगितली आहे:—

## आर्या.

**चालति माझ्यामागें लक्ष्मणजी काननीं पुढें स्वामी ॥**
**धामीं तशीच हर्षें प्रेमी पाहोनि आपुल्या स्वामी ॥ १ ॥**

अभंग.

**लक्ष्मण भावोजी मागें पुढें स्वामी ।**
**मज आहे धामीं ऐसें वाटे ॥ १ ॥**
**न बाधेचि मज उष्ण क्षुधा तृषा ।**
**तुम्हापाशीं मृषा न बोलावें ॥ २ ॥**
**जेव्हां राहीं वाट चालतां मी मागें ।**
**मुरडोनी मागें विलोकिती ॥ ३ ॥**
**बाई काय सांगों स्वामींची ती दृष्टी ।**
**अमृताची वृष्टी मज होय ॥ ४ ॥** —मोरोपंत.

त्याचप्रमाणें पांडव द्वैतवनांत रहात होते, त्याचें वर्णन केलें आहे:—

## आर्या.

**सरला वनवास मग द्वैतवनीं पांडुनंदन वसति तें ।**
**दिवसांत वांकुल्या शत दावित होतेंचि नंदनवसतितें ॥ १ ॥**

—मोरोपंत.

पांडवांस द्वैतवनामध्ये नंदनवनापेक्षांदेखील अधिक सुख होत होतें, असे ह्या म्हणण्याचे तात्पर्य आहे. सारांश असा आहे कीं, सदाचरण हें सगळ्या सुखाच स्थान आहे. म्हणून, घर हें जर सुखावह करावयाचें आहे,—आपल्या घरांत आपणांस सुख व्हावें अशी जर इच्छा आहे,—तर ते घर सदाचरणाचें वसतिस्थान करावें.

मनुष्यास घरासारखें दुसरें सुस्थळ नाहीं. घर हे मोठें पुण्यक्षेत्र आहे. त्यांत मातापितरे ह्या देवता होत. त्या देवता सुप्रसन्न असल्या, म्हणजे मनुष्यास कांही उणे पडत नाहीं. त्याचे सगळे मनोरथ पूर्ण होतात.

मनुष्याच्या आंगच्या सद्गुणांस आरभ होण्याचे आदिस्थान घर होय. सद्गुण संपादण्यास घरासारखे दुसरे ठिकाण नाहीं. घरांतलीं सगळीं माणसें संबंधी असतात. कोणाचा संबंध जवळचा असतो, कोणाचा दूरचा असतो. कोणी श्रेष्ठ असतात, कोणी बरोबरीची असतात, कोणी कनिष्ठ असतात; कोणी खोल असतात, कोणी उघडया मनाची असतात; कोणी आर्जवी असतात, कोणी उद्धट असतात. अशा सगळ्या प्रकारच्या माणसांशीं वागण्याचा प्रसंग मनुष्यास घरामध्यें येतो. त्यांशीं वेगळ्या वेगळ्या प्रकारें कसें वागावें,

कोणाला संतुष्ट कसें करावें, हें त्याला शिकतां येतें. **आत्मसंयमन** करणे, जगाचे आघात सोसणे, परोपकार करणें, दुसऱ्याच्या अपराधांची क्षमा करणे, दुसऱ्याच्या आंगचे गुण दाखविणें, आत्मस्तुतीची इच्छा दाबणे, इत्यादि सद्गुणांचा आरंभ होण्याचें स्थान घर असतें. कां कीं, इतक्या वेगळ्या वेगळ्या प्रकारच्या माणसांशीं वेगळ्या वेगळ्या पर्यायांनीं वागावें लागते. आणि त्यांत विशेष हें की, त्या शिकण्यामध्यें जरी क्वचित् एखादी चूक झाली, तरी तिचा परिणाम भयंकर होत नाही. ती चूक सुधारतां येते. हीच चूक परक्याशीं वागण्यांत झाली, तर ती सुधारतां येत नाहीं. तिचे परिणाम टाळितां येत नाहीत. आणि ते कदाचित् टाळितां आलेच, तर त्यास मनस्वी प्रयास पडतात. ह्यास्तव आम्ही असे म्हणतों कीं, घर ही सद्गुण शिकण्याची एक अत्युत्तम शाळा आहे. तिची बरोबरी इतर कोणत्याही ठिकाणाच्यानें करवणार नाहीं.

त्याचप्रमाणे, कविश्रेष्ठ मोरोपंत ह्यांनीं जें म्हटलें आहे की, मनुष्यांच्या अपराधांवर इतरांनी कितीही पांघरून घातलें, तरी ते " थिटें " पडते, पण आईच्या कृपेचे पांघरूण पुरून उरतें, तीच गोष्ट घराविषयीं आहे. मनुष्याच्या आंगचे दोष झांकण्यास घरासारखें दुसरें पांघरूण नाहीं. त्या कार्यास एवढें थोरलें आकाश तेंही " थिटें " होते. पण घर पुरते. दुष्ट मनुष्याला घर नकोसें होतें. पण घरास कधीं दुष्ट मनुष्य नकोसें होत नाहीं. दुष्ट माणसांनीं आपलीं घरें जाळिलीं आहेत; पण घरांनीं कधीं दुष्ट माणसांस जाळिलें नाही. घर हे खरोखर पुण्यक्षेत्र आहे. तेथे पाप असे

कधींही होत नाहीं. अथवा उलट पर्यायानें आम्ही असें म्हणतों कीं, पाप होतें तें ठिकाण खरोखर घरच नव्हे, असें होतें.

तर मग मनुष्यास सुख होण्यास पाहिजे तें घर कसें असावें, हें वर सांगितलेंच आहे. तसें तें बांधण्याचा प्रयत्न कुटुंबांतल्या प्रत्येक माणसाने आपापल्या परी केला पाहिजे. म्हणजे आपापलीं कर्तव्यें केलीं पाहिजेत. त्यास संपत्ति लागत नाहीं, तसे मोठे प्रयासही पडत नाहीत. त्याची सामुग्री विधात्यानें माणसाच्या अंतःकरणांत सिद्ध करून ठेविली आहे. ती यथायोग्य रीतीनें बाहेर काढून तिचा उपयोग यथायोग्य रीतीने करणे, एवढेंच काय तें माणसाकडे आहे.

**वि. कों. ओक.** बालबोध.

---

## पाठ ९ वा.



### गृहशिक्षण.

सर्व शिक्षणांत गृहशिक्षण हे मुख्य होय. जसे गृहशिक्षण असतें, तशीं मुलें बरी किंवा वाईट निपजतात. सत्संगतीने, अथवा शाळेंत, किंवा स्वतः अभ्यास करून मुलांस जें शिक्षण मिळतें, त्यायोगानें मुलांचे वर्तनांत बदल होतो; परंतु गृहशिक्षण हें प्रथमपासून बराच वेळ मिळत असल्यामुळें, व हें शिक्षण सर्व शिक्षणाचा पाया आहे म्हणून, मुलांचे वर्तनांत त्यायोगें जसा बदल

होतो, तसा इतर शिक्षणापासून होत नाहीं, ही गोष्ट थोड्यांचे लक्षांत येते. गृहशिक्षणाची खरी मातब्बरी व या शिक्षणापासून होणारे बरेवाईट परिणाम, हीं फारच थोड्या आईबापांस माहीत आहेत. मुलगा बिघडला असतां तो दुसऱ्या मुलांच्या संगतीनें बिघडला, अथवा शाळेंत जाऊन बिघडला, असें म्हणण्यास ते चुकत नाहीत. ही ओरड अलीकडे बरीच ऐकूं येते. मुलें संगतीनें बिघडत नाहीत, किंवा जीं मुले शाळेंत जातात तीं सर्व सच्छिष्य बनतात, असे आम्ही म्हणत नाहीं; तथापि तीं बिघडण्यास अथवा चांगली निपजण्यास आईबाप बरेच अंशी कारणीभूत असतात. मुलांस बाहेरचे सहवासापेक्षां बहुतकरून आईबापांचा सहवास फार असतो. जसे आईबापांचे वर्तन असतें, तसा त्या वर्तनाचा ठसा मुलांचे मनांवर उमटून तो बरेच दिवस कायम राहतो. शाळेत मुले प्रतिबंधांत असतात. ज्याप्रमाणे घरीं मुलांचे मन मोकळें असतें, त्याप्रमाणे दुसरे ठिकाणी नसते. त्यांस ज्या बऱ्यावाईट सवई लागतात, त्यांस जे बरेवाईट वळण लागतें, ते विशेषेकरून तेथें लागते. यामुळे त्यांचे परीक्षण करून त्यांचे मनांस वळण देण्यास घर हें उत्तम व मुख्य साधन आहे. म्हणून आपल्या मुलांचे आचरण चांगले असावे, अशी जर आपली इच्छा आहे, तर गृहशिक्षणाविषयी आपण प्रथमपासून काळजी घेणें फार अगत्याचें आहे. ज्या तत्त्वांवरून समाजाचे उत्कर्षाचें नियमन होतें, अर्थात् सर्व राष्ट्राचेही उत्कर्षाचें नियमन होतें, त्या तत्त्वांचें बीज वस्तुतः गृहशिक्षण आहे. ज्यांकडे गृहशिक्षणाचें काम आहे, त्यांचा

जसा मुलांवर अधिकार चालतो, तसा सरकारचा चालत नाहीं. सरकारचे हातपाय स्वतःच्याच नियमांनीं अथवा लोकमतामुळें बांधले असतात. आईबापांची गोष्ट कांहीं अंशीं निराळी असते; त्यांस जसें आपल्या मुलांना शिक्षण द्यावेंसें वाटेल तसें देतां येते. सरकारास तसे करण्यास पुष्कळ अडचणी असतात. समाज हा अनेक व्यक्ति मिळून होतो. जसे व्यक्तिमात्राचे आचारविचार असतील, तसे समाजाचे असणार. गृहशिक्षण हे व्यक्तिमात्राच्या शिक्षणाचा पाया आहे; म्हणून सामाजिक सुधारणेची व पर्यायें-करून राष्ट्रीय सुधारणेची खरी शाळा गृह आहे.

मनुष्य कसाही शहाणा असला, तथापि लहानपणीं त्यास जी संगत अथवा ज्या संवयी लागल्या असतील, त्यांचा त्याचे मनावर कांहीं ना कांही तरी परिणाम झालेला असतो. लहानपणीं मुलांची स्थिति निराश्रित असते; पोषण व शिक्षण यांसाठीं त्यांस दुसऱ्यां-वर अवलंबून रहावें लागतें; तीं फक्त अनुकरण करणारीं असतात; जरी यःकश्चित् गोष्टीमुळे त्यांस कांही संवयी लागल्या असल्या, तरी त्या संवयी फार दिवस असतात. ही गोष्ट आईबापांनी अथवा मुलांचे पालकांनीं लक्षांत ठेविली पाहिजे. ज्याप्रमाणे प्रभातसमयावरून दिवसाचें साधारण अनुमान बहुशः कळते, त्याप्रमाणे मूल कशीं निपजणार याचें स्थूल अनुमान बहुशः त्याचे प्रथमचे अंकुरावरून कळतें. यास कांही अपवाद सांपडतात. कांही मुलें लहानपणीं द्वाड असून पुढे तीं चांगलीं निपजलीं आहेत, अशीं उदाहरणें दृष्टीस पडतात. परंतु हें साधारण मान नाही.

ज्या गोष्टी प्रथम मुलांचे दृष्टीस पडतात, व ज्या तीं प्रथम ऐकतात, त्यांचा ठसा त्यांचे मनांवर चांगला उमटतो. पदार्थांचे स्वरूपांविषयीं प्रथम जी त्यांस माहिती मिळते, तीच तीं ग्रहण करितात. भय, आनंद, दुःख यांविषयीं जी त्यांची प्रथम कल्पना होते, ती मागाहून पुष्कळ दिवस राहते. मनुष्यास विचारशक्तीच्या योगानें बाह्य गोष्टींचे यथार्थ ज्ञान होऊन त्यास बरेंवाईट कळूं लागते, हे खरे आहे. तथापि बाह्य पदार्थांचा अथवा बाह्य संगतीचा परिणाम कांहीं तरी झाल्याशिवाय रहात नाहीं. जर मोठ्या लोकांचे मनांस अज्ञान व हलकट लोकांचे नित्य सहवासाने थोडा तरी विकार होतो, तर मुलांचे मनांस विकार होईल यांत नवल नाहीं. ज्या गृहांत प्रेमभाव आहे, जेथें कर्तव्यकर्मांविषयीं आसक्ति आहे, ज्या ठिकाणी सदाचरणाचें वर्तन आहे, ज्या घरीं व्यवस्था करणारी वडील माणसें समजुतदार व उद्योगी आहेत, त्या घरांतील मुलें सशक्त, निरोगी व दुसऱ्यांचे उपयोगी पडणारी निपजतात. तसेंच, ज्या घरीं अज्ञान, आपमतलब, पंक्तिप्रपंच. भांडणकज्जा, आळस, हलकटपणाचे वर्तन हीं आहेत, त्या ठिकाणी मुलांसही हे दुर्गुण जडतात. ज्या ज्या गोष्टी मुलांच्या नजरेपुढे असतात, त्या त्या त्यांस उत्तम वाटतात. अशी जर वास्तविक स्थिति आहे, तर त्यांच्यापुढे चांगल्या अनुकरणीय वस्तु नेहमीं ठेवाव्या. दुर्दैवानें अथवा दुसरे कारणामुळे कांहीं ठिकाणी आई व मुले यांचा वियोग झालेला असतो. परतु एकदरींत लहानपणीं मुलांस विशेषेंकरून आईचा सहवास फार असतो. त्यांचे डोळ्यांपुढे अनुकरणीय वस्तु

फार करून आई ही असते. आईची स्थिति लोहचुंबकाप्रमाणें असते. तिला ज्याप्रमाणें मुलांचें मन आपलेकडे ओढून घेतां येतें, त्याप्रमाणें दुसऱ्या कोणासही तितकें घेतां येत नाही. कांहीं मुलांस बाप, आजा, आजी वगैरे वडील माणसांचा लळा लागलेला असतो; परंतु तो आईच्या अभावीं अथवा पश्चात् होय. बहुत करून मुलांचा ओढा जन्म देणाऱ्या आईकडे फार. आईनें मुलांस तोंडानें प्रत्यक्ष कांहीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. तोंडच्या सांगण्यापेक्षां तिच्या स्वतःच्या कृतीपासून ज्यास्त कार्य होतें. मुलें कृतीचें तेव्हांच अनुकरण करितात. आई रडावयास लागली असतां तीं रडतात. हंसूं लागली असतां हंसतात. तात्पर्य त्यांची बहुतेक कृति तिजवर अवलंबून असते. आईचें वर्तन बोलण्याप्रमाणें आहे किंवा नाहीं हें त्यांस समजतें. बोलण्याप्रमाणें तिची कृति नसेल, तर "मनस्यन्यद्वचस्यन्यत्कार्यमन्यत्" हा जो मोठा दुर्गुण तो त्यांस जडतो. मुलांचा स्वभाव आईबापांच्या कृतीप्रमाणें अनुकरणाचे योगानें हळुहळू बरावाईट बनत जातो. प्रथमतः आपणांला त्यांचे अनुकरणाची मौज वाटते. त्यांचे कृतींत तादृश अर्थ नाहीं, अशा समजुतीवर आपण जातों व त्यांकडे फारसें लक्ष देत नाहीं. परंतु एक दोन तीन चार वेळा एकाच गोष्टीचें अनुकरण करण्यानें त्यांस ती गोष्ट करण्याची संवय लागून त्यांचा स्वभाव बनतो. अनुकरणीय गोष्ट चांगली असेल, तर चांगलें कार्य होतें, वाईट असेल तर वाईट कार्य होतें. बापाचे कृतीपेक्षां आईचे कृतीनें मुलांचे मनांवर दृढतर परिणाम होतो, ही गोष्ट आपण

लक्षांत ठेवीत नाही. घर हें लहानसे राज्य आहे. गृहकृत्यांत बापापेक्षां आईची मुखत्यारी फार असते. असे असणें हेंच योग्य व हितावह आहे. आईचा आपले मुलांवर पूर्ण अंमल असतो. कांहीं गोष्ट लागली असतां मुले ती आईपाशी मागतात. तीं आईच्या द्वारें बहुत करून बापाजवळ गोष्ट काढितात. आई त्यांचे डोळ्यांपुढे अक्षयीं असते. म्हणून गृहशिक्षणासंबंधी पहिली गोष्ट आईचें सद्वर्तन ही होय.

**वि. मो. महाजनी.** विविधज्ञानविस्तार.

---

## पाठ १० वा.



### पुढची तजवीज !

सर्व देशांतील पूर्वीच्या श्रीमंत लोकांची चाल असे की, आपल्या मनास करमणूक करण्याकरितां जवळ खुषमस्करे ठेवावयाचे. असा एक नकल्या इंग्लंडांतील एका बड्या मनुष्यापाशीं होता. त्यानें एके दिवशी त्याच्या स्वाधीन एक काठी केली आणि सांगितलें की, जेव्हां तुझ्याहून मूर्ख तुला कोणी भेटेल, तेव्हां त्यास ही काठी दे; तोंवर तुजपाशींच असूं दे. पुढे कित्येक वर्षांनीं, त्या श्रीमंत गृहस्थास मोठें दुखणें लागून तो आतां वांचत नाहीं, अशी त्याची अवस्था झाली. अशा समयीं एकदां त्यानें आपल्या खुष-मस्कऱ्यास जवळ बोलावून सांगितलें कीं, " आतां तुझी माझी फारच

थोडी सोबत आहे!" नकल्यानें विचारलें, "महाराज! आपण कोणीकडे चाललां?" त्या गृहस्थानें उत्तर केलें, "परलोकीं." "मग आपण परत केव्हां येणार? एका महिन्याने?" "नाहीं." "मग काय एका वर्षानें?" "छे! छे!" "तर मग केव्हां?" "केव्हांच नाहीं." नकल्या विचारतो, "असें काय? तर मग आपण जेथें जाणार, तेथील काय तजवीज आपण करून ठेविली आहे?" तो गृहस्थ उत्तर करतो, "कांहीं नाहीं." नकल्या आश्चर्य करून म्हणतो, "काय! कांहींच तजवीज करून ठेविली नाहीं? तर महाराज! ही माझी काठी मी आपणांसच देतो. कां कीं, आपणांहून अधिक मूर्ख आजपर्यंत माझ्या पाहण्यांत आलाच नाहीं!"

**वि. कृ. चिपळूणकर.** विनोद व महादाख्यायिका.

---

## पाठ ११ वा.



### आरोग्य.

शरीरांतील सर्व इंद्रियांचे व्यापार अव्याहत व सुरळीत चालत असून, आपल्यास कोणत्याही प्रकारची शारीरिक पीडा किंवा मानसिक व्यथा नसणें, अशी जी आपल्या एकंदर शरीराची सुस्थिति, तिला आरोग्य असें म्हणतात. ह्या जगांत मनुष्याच्या सुखास साधनीभूत अशा ज्या कांहीं उत्तम उत्तम गोष्टी आहेत, त्यांतच

आरोग्याची गणना होत असून, इतर सुखांच्या अभावींदेखील या एका सुखाचाच आपल्यास पूर्ण उपभोग घेतां येतो. या गोष्टीचा खरेपणा रोगानें आपण पीडित झालेले असलों, म्हणजे विशेष दिसून येतो. आरोग्याची ही सुखप्रद स्थिति, आपले जीवन ज्यांवर अवलंबून आहे असे कांहीं सृष्टिनियम आहेत, ते बिनचूक पाळल्यानें आपल्यास प्राप्त करून घेतां येते. हे नियम रसायनशास्त्राच्या नियमांप्रमाणे अगदीं ठरीव आहेत. अर्थात् पाळावे तशा योग्य रीतीनें ते पाळल्यास, इच्छित कार्य अवश्य घडून येतें; व त्याचप्रमाणें त्यांत किंचित्‌देखील कसूर झाल्यास, इष्ट परिणाम घडून येण्यास त्या मानाने व्यत्यय येतो. आरोग्यप्राप्तीस अवश्य अशा गोष्टी म्हटल्या, म्हणजे प्रथमतः शुद्ध व स्वच्छ अशा हवेचा भरपूर पुरवठा असला पाहिजे. नंतर शरीरांतील सर्व भागांच्या गरजा भागविण्यास पुरे एवढेच व असावें तशा प्रकारचें अन्न सेवन केलें पाहिजे. त्या अन्नांतील पोषक अंश शरीरांतील प्रत्येक अवयवास नेऊन पोंचविण्यास व त्यांतील अवशिष्ट, टाकाऊ व निस्तेज अंश शरीराबाहेर वाहून नेण्यास पिण्याच्या कामीं स्वच्छ व अदूषित अशा पाण्याचा उपयोग केला पाहिजे. व शरीरांतील अपकारक पदार्थ द्रवरूपानें बाहेर निघून जाण्यास प्रतिबंध न व्हावा, म्हणून शरीराची कातडी स्नानादि क्रियांनीं नेहमीं स्वच्छ ठेविली पाहिजे; म्हणजे कातडींत असणाऱ्या सूक्ष्म अशा अनंत छिद्रांचीं द्वारें नेहमीं खुलीं ठेवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ह्यांशिवाय आणखी एक विशेष सांगण्यासारखी गोष्ट आहे, ती अशी कीं, ह्या

जगांत मनुष्यास वेळोवेळीं प्राप्त होणाऱ्या, व क्वचित् प्रसंगीं अनिवार्य, अशा संकटांस पाठ देण्याचें सामर्थ्य यावें, व मनास त्याबद्दल व्यर्थ क्षुब्धता प्राप्त होऊं नये, अशाकरितां खऱ्या साधुसंतांस योग्य असें समाधान व शांतवृत्ति आपल्या ठिकाणीं नेहमीं ठेविली पाहिजे; निदान ती ठेवण्याचा प्रयत्न तरी ठेविला पाहिजे. वरील उपायांनीं, संपत्ति मिळविण्याकरितां ज्याप्रमाणें आपण झटत असतों, त्याप्रमाणेंच आरोग्य संपादन करण्याकरितां आपण सदैव झटत असले पाहिजे. आरोग्याशिवाय संपत्तीचा खरोखर पाहूं गेल्यास कांहीं एक उपयोग होत नाहीं. परंतु तेंच आरोग्य जर आपल्यापाशीं आहे, तर संपत्ति सहज मिळवितां येते. आरोग्य संपादन करणें वास्तविक पाहूं गेल्यास आपल्या हातचें काम आहे; किंबहुना ही केवळ अनुभवसिद्ध गोष्ट आहे असें म्हटले तरी चालेल. दुखणेबाणें येणें ही केवळ दैवायत्त आकस्मिक गोष्ट आहे, असे आपल्यास नेहमीं खचित म्हणतां येणार नाही. त्यांत बहुत करून आपल्या संबंधाचा कांहीं ना कांहीं तरी कार्यकारणसंबंध असतोच. अर्थात् आरोग्यास अवश्य असे जे सृष्टिनियम आहेत, त्यांचें आपल्याकडून कोणत्या ना कोणत्या तरी रीतीनें उल्लंघन झालेलें असतें, व त्याचें बहुधा हे फळ असतें, व तें आपणांस कदाचित् टाळितां आलें असते, ही गोष्ट आपण नेहमीं लक्षांत ठेविली पाहिजे. जन्मतःच आपल्यामध्यें जीवनशक्ति म्हणून कांहीं ईश्वरानें ठेवलेली असते, व ती आमच्या स्वतःच्या कृतींनीं आपल्यास कमी करितां येते किंवा वाढवितां

येते. आरोग्य ही वस्तुतः मनुष्याच्या शरीराची नैसर्गिक किंवा अंगभूत स्थिति होय. आणि यामुळेंच आपल्या शरीरामध्यें असा एक स्वाभाविक धर्म दिसून येतो कीं, त्याचा आरोग्य प्राप्तीविषयीं सतत प्रयत्न चाललेला असतो. अर्थात् जन्मतः जरीं आपली अशक्त प्रकृति असली, तरी तेवढ्यावरूनच आपण नेहमीं रोगग्रस्त असलें पाहिजे असें होत नाहीं. नीट व्यवस्थेनें राहिल्यास तीच आपली अशक्त प्रकृति आपल्यास सशक्त व सुदृढ करितां येते. गरीब स्थितींतील मनुष्यास आईबापांची दीनावस्था हें आपल्या दारिद्र्याचें कारण, असेंही म्हणतां येईल. परंतु वास्तविक प्रकार तसा नसून अशा मनुष्याच्या दारिद्र्याचें खरें कारण त्याच्या ठिकाणीं वसत असते हें उघड आहे. याच नियमास अनुसरून आपल्यास असें दिसून येतें कीं, क्षयरोगी किंवा अशक्तप्रकृति आईबापांच्या, व्यवस्थेनें राहणाऱ्या संततीस, निष्काळजीनें व बेपर्वाईनें नियमबाह्य राहणाऱ्या अशा सशक्त व सुदृढ प्रकृतीच्या मनुष्यापेक्षां कमी दुखणींबाणी येतात. अशाच अर्थानें लॉर्ड बेकन यानें एक ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, ‘ चांगल्या मार्गानें कुब-ड्यांच्या आश्रयानें लंगडत लंगडत जाणारा पांगळा मनुष्यदेखील, आडमार्गानें धांवत जाणाऱ्या मनुष्यास मागें टाकील.’

याप्रमाणें आरोग्य म्हणजे काय, ते कोणत्या उपायांनीं संपादन करितां येतें, त्याची जतन कशी करावी, व तें ठेवणें किंवा घाल-विणें हें आपल्या हातचें कसें आहे, हें सांगितलें.

विविधज्ञानविस्तार.

---

## पाठ १२ वा.



## सीमोल्लंघन.

[ कैलासवासी महादेव शिवराम गोळे यांनी एका दसऱ्याचे प्रसंगी पुढील उपदेश पुणे येथील न्यू इंग्लिश स्कूलच्या विद्यार्थ्यांस केला.]

आज दसऱ्याचा सण आहे. या दिवसाचे मुख्य कर्तव्य सीमोल्लंघन हें आहे. पूर्वीं ज्या वेळीं मराठे लोकांत वीरश्रीचा केवळ अवतार झाला होता, व स्वपराक्रमानें दिग्विजय संपादण्याची उत्कट आशा त्यांच्या हृदयांत वागत होती, त्या वेळीं नवे नवे मुलूख काबीज करण्याकरितां ते जेव्हां बाहेर पडत, तेव्हां वर्षाकालाच्या अखेरीस येणारा हा सण स्वराज्याची सीमा ओलांडून पलीकडे जाण्यास सुमुहूर्त गणिला जात असे. केवळ बाहुबलाच्या उत्कर्षाचे ते दिवस आतां गेले; परंतु त्यांबरोबर वीरश्रीचा किंवा पराक्रमाचा काळ गेला असें नाहीं. ती वीरश्री व तो पराक्रम मानसिक विजयाच्या श्रेष्ठतर कर्तव्याकडे आतां योजिला पाहिजे. आपल्या अंगीं असणाऱ्या अनेक दोषांमुळें आपल्या उद्योगास, आपल्या संपत्तीस, आपल्या सर्व प्रकारच्या उन्नतीस, किंबहुना आपल्या मनोराज्यासदेखील अतिदुस्तर सीमांचें सर्व दिशांनीं आवरण पडलें आहे. या आवरणामुळें, आपणांस आपली बुद्धि, सुविचार व कर्तबगारी प्रकट करून दाखविण्यास इतका आकुंचित प्रदेश उरला आहे कीं, त्यांची वाढ होऊं शकत नाहीं व त्यांच्या ऱ्हासास अकालींच आरंभ होतो. तेव्हां या तारुण्याच्या

भरतीच्या काळांत तुम्हांमध्यें जी वीरश्री व जी महत्त्वाकांक्षा जागत असेल, तिचा खरा सदुपयोग म्हटला, म्हणजे स्वतःचे व कुटुंबस्थितीचे सर्व दोष व न्यूनता दूर करणें, तेणेंकरून उद्योगादि इष्ट हेतूंस आकुंचित करणाऱ्या दुसऱ्या सीमांचे उल्लंघन करणें, हा होय. या प्रकारच्या सीमोल्लंघनास तुम्ही प्रवृत्त व्हावे, व आजच्या या सुमुहूर्तानें आपला निश्चय तडीस नेण्याच्या उपायचिंतनास लागावें.

या प्रकारच्या सीमोल्लंघनापासून जो एक अत्यंत इष्ट परिणाम घडून येईल तो हा कीं, या राष्ट्रांतील लोकांविषयी जगांत बहुमान उत्पन्न होईल, व आमच्या राज्यकर्त्यांपैकीं अनेक उदार पुरुष व स्त्रिया आपणांस राष्ट्रोन्नतीच्या कामीं मदत करण्यास तयार होतील. पूर्वी एका काळी हा हिंदुस्थान देश कोठें आहे, कसा आहे, इत्यादि गोष्टींविषयीं युरोपांत कोणालाही चांगली माहिती नव्हती. त्या वेळीं या देशास सुवर्णभूमि हे नांव प्राप्त झाले होतें, व या देशाच्या अपार संपत्तीविषयीं व विलक्षण रीतिभातींविषयीं युरोपांतील लोक ह्व्या त्या असंभाव्य कल्पना करीत असत. त्या पूर्वीच्या काळीं परद्वीपस्थ आपणांविषयीं कोणते कुतर्क करितात, याविषयीं आपण बेफिकीर राहिलों असतों, तर त्यामुळें आपलें मुळींच नुकसान होण्याचा संभव नव्हता. परंतु हल्लीं तशी स्थिति नाहीं. या देशाविषयीं व येथील राहणारांविषयीं सर्व सुधारलेल्या राष्ट्रांस चांगली माहिती झाली आहे, व त्यांतील एका अति बलाढ्य राष्ट्राचा या देशावर अंमल सुरू झाला आहे. ज्यांस आपणांविषयीं माहिती

आहे व ज्यांशी आपला नित्य संबंध येतो, त्यांचें आपणांविषयीं चांगलें मत असावें, याबद्दल आपणांस काळजी घेतली पाहिजे. तसेंच, ज्यांच्या हातीं आपलें हित किंवा अहित करण्याचें आहे, त्यांस आपली योग्यता व आपले गुण कळावे, त्यांमध्यें कोणत्याही आत्मदोषानें आपणांविषयींचा गैरसमज किंवा तिरस्कार उत्पन्न होऊं नये, अशाविषयीं आपला नित्य प्रयत्न असला पाहिजे. आपण अशक्त, आळशी, निरुद्योगी, अपराक्रमी व केवळ गतानुगतिक आहों, असा आपला दुर्लौकिक सर्व सुधारलेल्या राष्ट्रांमध्यें होत आहे. व जर आपण या दुर्गुणांपासून मुक्त होण्याचा मनापासून प्रयत्न केला नाहीं, तर आपणांस कोण मान देईल? कोण आपल्या उपयोगी पडेल?

आपल्या पूर्वजांच्या संबंधानें युरोपियन लोक जेव्हां स्तुतीचे उद्गार काढितात. तेव्हां ते स्वतःच्या प्राचीन पूर्वजांशीं त्यांची तुलना करितात. परंतु जेव्हां हल्लीच्या एतद्देशीयांविषयी ते कांहीं उद्गार काढितात, तेव्हां ते स्वतःशी त्यांची तुलना करितात. या तुलनेत आपण कमी पडलों, तर तो दोष कोणाचा? पूर्वजांच्या स्तुतीबद्दल जसें आपणांस समाधान वाटतें, तसें स्वतःच्या न्यूनत्वाबद्दल आपणांस अत्यंत दुःख वाटलें पाहिजे.

आपल्या न्यूनता दूर करण्याकरितां आपण मनापासून झटत आहों; नवीन विद्या, नवीन कौशल्य, नवीन उद्योग व नवीन विचारसरणी ग्रहण करण्यास आपण तयार आहों; व त्यामुळें आपणांस पुनः ऊर्जित काळ येण्याचीं शक्यता आहे, असें आपल्या

राज्यकर्त्यांपैकीं जे विचारी व थोर मनाचे पुरुष आहेत, त्यांस दिसून आल्यास, ते आपले साहाय्यकर्ते होतील व त्यांच्या साहाय्यानें कित्येक दुःसाध्य गोष्टीही सुसाध्य होतील, यांत शंका नाहीं.

**म. शि. गोळे.** शाळेचा आणि कुटुंबाचा अभिमान.

---

## पाठ १३ वा.



### दानत.

दानत ही एक मोठी अपूर्व चीज आहे. हिच्या बळावर ह्या जगांत मोठमोठ्या गोष्टी घडून येतात. रोजच्या व्यवहारांत ही केवळ अंशतः पाहण्यांत येते; परंतु जिकडे जिकडे हिचा पूर्ण प्रभाव दृष्टीस पडतो, तिकडे तिकडे मानवांची खरी योग्यता दिसून येते. चांगुलपणाचें ते केवळ एक आगरच बनून जातें, असेही म्हटल्यास चालणार आहे.

खरोखर ज्यांची उत्तम दानत असते, म्हणजे सद्गुद्योगांत ज्यांचा नेहमीं कालक्षेप होतो, व्यवहार ज्यांचा सरळ, प्रामाणिकपणा व नेकी ज्यांची मोठी, व दुष्कर्मांपासून जे अगदीं पराङ्मुख, असे मनुष्य कशा जरी गरीब स्थितींत असले, तरी ते लोकांस नेहमीं पूज्यच असतात. त्यांचा लोक गौरव करितात, व त्यांजवर त्यांचा पूर्ण भरंवसा असतो. त्यांचा उपदेश लोकांस मान्य होतो, व तद-

नुसार स्वतांचें वर्तन ठेवण्याचा ते प्रयत्नही करूं लागतात. असे मनुष्य आपले पाहण्यांत एकंदरींत फार थोडे येतात. तरी त्यांच्यामुळें ह्या जगाचें रहाटगाडगें सुरळीत चाललें आहे. किंबहुना ते आहेत म्हणूनच मनुष्यास ह्या संसारांत कांहीं गोडी वाटते व तो घरदार करून राहतो. त्यांच्या अभावी, अरण्य बरें पण संसार नको, अशी मनुष्याची स्थिति होणार आहे. अशांच्या उलट ज्यांचें वर्तन ते मनुष्यजातीचे केवळ शत्रु होत. स्वतांच्या दुर्वर्तनानें ते हरएक प्रकारें ह्या जगास गांजीत आहेत. अशांची संख्या देशांतून कमी होईल तेवढी बरी.

विद्वत्तेपासून मनुष्याला मोठें भूषण असतें, ही गोष्ट खरी आहे. तरी अंगी उत्तम दानत असणें ही गोष्ट त्याहूनही कांही विशेप आहे. विद्वत्तेपासून मनुष्याची लोकांत केवळ वाखाणणीमात्र होते; परंतु दानत उत्तम आहे तर त्याची मानमान्यता अधिक होते. हे नुसत्या विद्वत्तेच्या योगाने होणें नाही. विद्वत्ता ही केवळ कमीज्यास्त डोकेंफोड केल्याने प्राप्त होते. परंतु दानत उत्तम ठेवणें आहे, तर अंतःकरण शुद्ध व निर्विकल्प असे केले पाहिजे; व याला मनाचा कांही विशेप निग्रह लागतो. विद्वान् लोक जे आहेत, त्यांची देशाच्या शिरःस्थानी योजना केली आहे, हें ठीकच आहे. कारण देशाची सर्व प्रकारची माहिती त्यांस असून देशाचें बरेंवाईट हें सर्व कांहीं त्यांसच समजतें. परंतु त्या विद्वत्तेस शोभेल असें वर्तन जर त्यांच्या अंगीं नाहीं, तर ते शुद्ध भारवाहक होत असून लोकांचे पुरस्कर्ते असें त्यांस म्हणतां येत

नाहीं, व लोकांस बऱ्यावाईटाची सल्ला देण्यास ते अधिकारी होत नाहींत. ही योग्यता मिळविणें कठिण आहे. तर अंगीं दानत उत्तम ठेविली पाहिजे. मग विद्वत्ता जरी थोडीशी कमी असली, तरी हरकत नाहीं.

श्रीमंती ही म्हणजे ह्या जगांत वांटलेली आहे असे नाही. ती कोणापाशीं असते व कोणापाशीं नसते. पुष्कळांस तिचा संसर्गदेखील नसतो. जाडेभरडे अन्नवस्त्र मिळालें, म्हणजे तेवढ्यापुरतें संतुष्ट राहणारांची संख्या बरीच मोठी दिसून येते. तशांत खरोखर श्रीमंती म्हणजे काय, हेंच समजणें मोठें कठिण आहे. कारण, तिला म्हणजे कधी कोणीं कांट्यांत घालून तोललें आहे, असें नाहीं. अर्थात् एकाची जी श्रीमती ती दुसऱ्याची गरिबी. म्हणून श्रीमान् होण्याचा प्रयत्न जो आहे तो चांगल्या रीतीनें होत असेल, तर मनुष्याने अवश्य करावा, करूं नये असे नाहीं. तरी सर्वांसच तो साध्य होईल, अशी त्याच्याविषयीं खात्री नसते. परंतु तेच प्रत्येक मनुष्याने असें जर म्हटलें की, माझी दानत मी उत्तम प्रकारची ठेवीन, अर्थात् माझें आचरण होईल तेवढे मी निष्कलंक ठेवीन, तर हें बरीक त्यास खचित साध्य होणार आहे. थोडीबहुत ईश्वरानें बुद्धि दिली आहे, तिचा चांगल्या कामाकडेच उपयोग करूं म्हटल्यास खचित करतां येणार आहे. तसेच सत्य, नीति व प्रामाणिकपणा ह्यांचें लहानसहान गोष्टींतदेखील सदैव अवलंबन शक्य असून, मिळालेल्या भाजीभाकरीवर सुखानेंच आयुष्य क्रमण करण्याचा निदान प्रयत्न तरी मनुष्याधीन आहे. सारांश,

ईश्वराने मनुष्यास ज्या ज्या स्थितींत ठेवले आहे, त्या त्या स्थितीत स्वतांचे कर्तव्य म्हणून जें कांही आहे, ते त्यास बिनदिक्कत करतां येणार आहे.

**वि. मो. महाजनी.** विविधज्ञानविस्तार.

---

# पाठ १४ वा.



## वाचन.

गुरूचा समागम होऊन त्याशी संवाद करण्यास सर्वास मिळतें असे नाही. आणि कदाचित् असा दुर्मिळ योग घडून आला, तरी तो फार दिवस टिकत नाही. दैववशात् आपणांस चांगले व हुशार मित्र मिळाले, तरी आपली व त्यांची मैत्री नेहमी कायम राहील. ते व आपण निरंतर एकेच ठिकाणी राहूं, असे कोणीही सांगू शकणार नाही. जशी स्थिति प्राप्त होईल, त्याप्रमाणें मनुष्यास राहणें भाग पडते. याकरितां सर्व स्थळी व सर्व प्रसंगीं उपयोगी पडणारें असें ज्ञानाचे उत्तम साधन म्हटलें म्हणजे वाचन होय. मनुष्य श्रीमंत असो वा दारिद्री असो, तो राजवाड्यांत राहो वा भिकारड्या झोपड्यांत राहो, त्यास मित्र असोत किंवा नसोत, तो आपल्या वैभवशिखरी असो किंवा दुःखानें त्याचें काळीज होरपळून गेलें असो, त्यास वाचनासारखें मनोरंजक आणि ज्ञानप्राप्तीचें सुलभ असे दुसरे साधन नाही.

ज्या गांवांत आपण राहात असूं, तेथील विद्वान् लोकांशी परिचय करून त्यांपासून आपणांस ज्ञान संपादन करून घेतां येईल. परंतु त्या गांवाशिवाय अन्य गांवी व अन्य देशीं जे विद्वान् लोक रहात असतील, त्यांचा व आपला परिचय कसा होणार? तसेंच आपले चारपांच मित्र खेरीज करून इतरांशी वादविवाद करण्यास आपणांस कसें सांपडणार? परंतु वाचनाच्या योगानें आपणांस दूरदूरच्या लोकांशी, आधुनिक व प्राचीन विद्वान् मंडळींशी, सहज परिचय करून घेता येतो.

इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, अमेरिका ह्या देशांत राहणाऱ्या, तसेंच आपल्या देशांत दूर प्रदेशीं राहणाऱ्या ज्ञानसंपन्न मनुष्यांच्या ज्ञानाचा फायदा आपणांस बसल्या ठिकाणीं करून घेतां येतो. त्याकरितां आपणांस फिरावें लागत नाहीं. तसेंच जे विद्वान् लोक जगांत पूर्वकाळीं होऊन गेले व विचाररूपानेंच आज जे जगांत हयात आहेत, अशा लोकांच्या ज्ञानाचा फायदा आपणांस वाचनाच्या योगानें सहज करून घेतां येतो. होमर, व्हर्जिल, शेक्सपियर, कालीदास इत्यादि अलौकिक बुद्धीच्या पुरुषश्रेष्ठांस हे जग सोडून कित्येक शतकें झालीं. त्यांचीं मृत शरीरें मातीशीं मिळून गेलीं. तरी ते विचाररूपानें जिवंत असून आपणांबरोबर बोलण्यास, हंसण्यास, आपणांस उपदेश करण्यास सदा तयार आहेत. त्यांनीं आपले उत्तमोत्तम विचार आपल्या ग्रंथांत लिहून ठेविले आहेत. मात्र आपण त्यांचे ग्रंथ वाचले म्हणजे झालें.

पूर्वी ग्रंथ फार दुर्मिळ असत. मोठमोठ्या ग्रंथसंग्रहालयांतही दोनशे-अडीचशेपेक्षा अधिक ग्रंथ क्वचितच असत. सर्व ग्रंथ हातानें लिहून काढावे लागत असल्यामुळे, ग्रंथ पाहण्याससुद्धां मिळत नसत, आणि याकारितां ते समग्र पाठ करावे लागत असत. अशी स्थिति असल्यामुळे गुरुमुख व संवाद ही त्या काळीं ज्ञान मिळविण्याचीं मुख्य दोन साधनें असून त्यांची योग्यता सर्वत्र विशेष समजली जात असे; परंतु गटेनबर्ग याने छापण्याच्या कलेचा शोध लावल्यापासून पूर्वीची सर्व स्थिति बदलली. जे ग्रंथ पूर्वी पाहण्याससुद्धां मिळत नसत, ते अति स्वल्प किंमतीस सर्वांस मिळूं लागले. नवीन ग्रंथ छापून भराभर निघूं लागले. यामुळें वाचनाची अभिरुचि वाढून वाचन हे ज्ञान प्राप्त करून घेण्याचें मुख्य साधन झालें.

**या. शं. वावीकर.** वाचन-ग्रंथमाला.

---

# पाठ १५ वा.



## ज्वलत् पर्वत.

ज्या पर्वतांतून नेहमीं सुरुंग उडाल्याप्रमाणें अग्नीच्या ज्वाला, राखाडी, धूर इत्यादि जोरानें बाहेर पडतात, त्यास ज्वलत् पर्वत असे म्हणतात. कित्येक पर्वतांतून चिखलही बाहेर पडतो.

कांहीं विद्वान् लोकांची अशी कल्पना आहे की, प्रथमतः सूर्यापासून कांहीं तेजोमय बाष्परूपी ढग बाहेर पडले, आणि तेच कालांतराने थंड होऊन सांप्रतची आपली पृथ्वी झाली आहे. तथापि तिच्या पोटांतील उष्णता अद्यापही कायम आहे! व तीच ज्वलत्पर्वतांच्या व उष्णोदकाच्या झऱ्यांच्या रूपाने बाहेर पडते. शिवाय पृथ्वीच्या पोटांत—खाणींत वगैरे—जसजसे शिरावे, तसतशी उष्णता वाढू लागते, हेही त्यास एक प्रमाण आहे. कित्येक खोल खाणींच्या तळाशी इतकी उष्णता असते की, तेथील लोक वस्त्रप्रावरणे अगदी फेकून देतात. भूपृष्ठापासून सुमारे तीन मैल खोलीवर पाण्यास आधण येण्याइतकी उष्णता आहे.

ज्वलत्पर्वताचा देखावा कांहींसा आगगाडीच्या चिमणीतून निघालेल्या आगीच्या भपकाऱ्याप्रमाणें दिसतो. आगगाडीच्या बंबातून जसा वाफेचा, आगीचा व धुराचा लोट निघतो, तसाच ज्वलत्पर्वताच्या शिखरातून लोट निघत असतो. धातूंच्या तप्त रसाचे लोंढेच्या लोंढे निघून पर्वताच्या पायथ्याकडे त्यांचे पाट चाललेले असतात. ज्वलत्पर्वताचे आकार अनेक प्रकारचे असतात. कित्येक अगदी लहानशा टेंकडीवर असून त्यांची तोंडें थोड्याच घेराची असतात. तसेच, कित्येक पर्वतांतून चिखल, राखाडी वगैरे चार चार मैल उंच उडत असतात.

ज्वलत्पर्वतावर एक विहिरीसारखा पोकळ खळगा असतो, त्यास 'ज्वलन्मुख' असे म्हणतात. ह्याच्या तळापासून पृथ्वीच्या पोटांत एक विवर गेलेलें असते. आणि त्या विवरांतून ज्वाला,

राखाडी, धातूंचे रस, तप्त पाषाण वगैरे बाहेर पडतात. ज्वलत्पर्वताचे तोंड मोठें असले, म्हणजे तप्तरसाचा वर येण्याचा जोर कमी असतो.

ज्वालामुखीचा स्फोट होण्यापूर्वी बहुत करून पृथ्वीला एक प्रकारची चमत्कारिक गति उत्पन्न होते. आणि दूर अंतरावर मेघगर्जना झाल्याप्रमाणें ध्वनि ऐकूं येतो. पृथ्वी थोडीशी कंपायमान होते. उत्तरोत्तर हा ध्वनि आणि भूकंप वाढूं लागतो. आणि शेवटी मोठा प्रचंड आवाज होऊन पर्वतशिखरास कोठे तरी एक भगदाड पडते, आणि त्यांतून आगीचे, वाफेचे, व तप्त रसाचे लोट बाहेर पडूं लागतात. एखाद्या समयी त्यांतून धूळ आणि राख इतकी बाहेर पडते की, कित्येक कोसपर्यंत आकाश अगदीं व्याप्त होऊन जिकडे तिकडे दिवसाढवळ्या अंधेर होऊन जातो. शिवाय ह्या लोढ्यांतून कधी कधीं तापून लाल झालेले दगड लांब लांब उडून कित्येक कोसांवर जाऊन पडतात.

स्फोट झाल्यानंतर तप्तधातुरसाचे प्रवाह पर्वताच्या दरीखोऱ्यांतून वाहूं लागतात. ह्या नद्यांस '**लावा**' असे नांव आहे. '**लावा**' हा शब्द इतालीं भाषेतील असून त्याचा अर्थ 'तप्तरसाची नदी' असा आहे. हा रस प्रथमतःच वाहू लागला, म्हणजे मोठ्या जोराने खळखळतो, व त्याचा रंग लोखंडाच्या रसासारखा पांढरासफेत असून चकाकतो. परंतु थोड्याच वेळांत तो त्याचा चकचकीत रंग बदलून तो तांबडा होतो. आणि लौकरच त्यावर काळ्या रंगाची कठिण पापडी जमूं लागते. तरी आंतील रस ताप-

लेल्या लोखंडाप्रमाणे लालच असतो. ह्या ज्वलत्पर्वताच्या **तावडींत** सांपडलेली झाडे, घरें चटसारी त्यांत वाहून जळून खाक होतात.

सुमारे २००० वर्षांपूर्वी **विसूविअस** पर्वताचे शिखर नाना प्रकारच्या वृक्षांनी व्याप्त असून मोठे रमणीय दिसे. पुढें त्यास भूकंपाने गांठले. इ. स. ७९ मध्ये त्याच्या शिखरावर आगीचे प्रचंड लोळ उठूं लागले. राख आणि दगड यांनी मिश्रित झालेला असा एक जगड्व्याळ वाष्पस्तंभ सुमारे १२०० फूट आकाशांत उडूं लागला. हे धुराचे आणि वाफेचे लोट कित्येक कोसपर्यंत पसरले, आणि राखेची व दगडांची वृष्टि सुरू झाली. ह्या राखाडीचा थर एवढा झाला की, त्यामध्ये मोठमोठालीं तीन शहरें अगदीं गडप होऊन जाऊन त्यावर तीस तीस फूट जाडीचा थर चढला. ह्या गोष्टीस सुमारे १७०० वर्षे लोटून गेल्यानंतर त्या पुरलेल्या शहराचा बराच भाग उघडा केला. तेव्हा त्यांतील घरे जशीच्या तशींच उभी होती. भिंतीवरील वेलपत्ती व चित्रे अगदी ताजी होती; आणि जेथें ज्या स्थितीत मनुष्ये मृत्यु पावली तेथे त्या स्थितींत त्यांचे सांगाडे जसेच्या तसेच कायम होते.

ज्वलत्पर्वतांपैकी ३०० पर्वत प्रसिद्ध आहेत. आपल्या हिंदुस्थान देशाला अगदी जवळचा ज्वालामुखी म्हटला म्हणजे बंगालच्या उपसागरांतील **ब्यारन** बेटांत आहे. हे बेट **अंदमान** बेटाच्या जवळच आहे. पासिफिक महासागराच्या किनाऱ्यावर अर्धवर्तुलाकृति ज्वलत्पर्वत अनेक आहेत. सर्व जगामध्ये उंच आणि जोराने वाहणारा **काटोपाक्सि** ज्वलत्पर्वत **विषुववृत्ता**नजीक **अन्डेस**च्या पूर्वेकडील

ओळींत आहे. ह्याचे शिखर नेहमी **हिमालया**प्रमाणे बर्फाने आच्छादित असतें; परंतु स्फोट होण्यापूर्वी ते वितळून जातें.

**किलोवा** हाही एक जगांतील अति मोठा ज्वलत्पर्वत आहे. हा **स्यान्डवुइचच्या** बेटांतील **हावई** नांवाच्या बेटांत आहे. ह्याच्या मुखाचा घेर ९ मैल असून त्यांत तप्त रसाची कितीएक सरोवरें भरलेली आहेत. ह्यांतील रस कढतांना केव्हां त्यांतील बुडबुडे तीस तीस चाळीस चाळीस फूट उंच येतात. **एशिया** खंडांतही बरेच ज्वलत्पर्वत आहेत. परंतु आसपासच्या द्वीपसमूहांत पुष्कळच आहेत. थोड्या वर्षांपूर्वी **सुमात्रा** आणि **जावा** बेटांच्या दरम्यान **सुंदाच्या** खाडीत एक भयंकर स्फोट आणि भूकंप झाला होता. ह्या स्फोटाने समुद्राची एक लाट एवढी मोठी उसळली की, ती हजारो मैल लांब गेली ! आणि एक वाऱ्याचा सोसाटा सर्व पृथ्वीभोवती फिरला ! त्या सपाट्यांत **क्याका**टोचा मोठा थोरला भाग समुद्रांत गडप होऊन गेला. ह्या स्फोटाचा गडगडाट सुमारे सर्व युरोपाएवढ्या प्रदेशावर ऐकावयास आला. आणि त्यांतील कित्येक दगड तीस तीस मैल उंच उडाले ! !

युरोपखंडांतील मुख्य ज्वलत्पर्वत म्हटले म्हणजे **एटना**. **विसूवियस** आणि **हेक्ला** हे होत. **हेक्लां**तून निघालेल्या तप्त रसाच्या नदीची लांबी ५० मैल आहे ! जगाच्या इतिहासावरून पाहिले, तर आतांपेक्षां प्राचीन काळचे ज्वालामुखी अत्यंत भयंकर आणि फार जोरदार असत. दक्षिण गोलार्धांत बराच भाग वितळलेल्या

रसाच्या थराने आच्छादिलेला होता. ज्वलत्पर्वताच्या स्फोटापासून झालेली जमीन बहुत करून सुपीक असते.

ज्वालामुखीचे स्फोट होण्याची कारणे खाली दर्शविलीं आहेत. पृथ्वीच्या पोटांत जें असह्य तेज किंवा अग्नि आहे, त्याच्या सभो-वर कित्येक मैल जाडीचे भरीव पाषाणमय आच्छादन आहे. ते त्यांतील उष्णता भूपृष्ठावर येऊं देण्यास प्रतिबंधक होते. एका भांड्यांत पाणी घालून त्यास सळसळीत आधण आणून, त्याचीं द्वारे चहूकडून बंद केली, तर ते भांडे फुटते, हा अनुभव आहे. ह्याच नियमाप्रमाणे त्या उष्णतेने वितुळलेले खडक बाहेर येण्याविषयी जोर करतात, तोच स्फोटांना कारण होतो. कित्येकांचे म्हणणे असे आहे की, पृथ्वीवरील पाणी जोराने पृथ्वीत शिरून जेव्हां त्याचा मोठा सांठा होतो, तेव्हां पुनरपि जोराने तें वर येते. आणि तें फार खोलींतून वर आल्यामुळे त्या घर्षणाच्या योगाने तप्त होऊन त्याची वाफ बनते, आणि वाफेच्या जोराने सुरुंग उडाल्याप्रमाणे मोठा स्फोट होतो. ज्वलत्पर्वत बहुत करून समुद्रकाठावर फार असतात. काही ज्वलत्पर्वत समुद्राच्या पोटीं उद्भव पावून नवीन बेटे उत्पन्न करितात. पुष्कळ बेटे अशाच रीतीने बनलेली आहेत, अशी कल्पना आहे.

**कृ. ना. आठल्ये.** केरळकोकिळ.

---

## पाठ १६ वा.



## असें वाचावें.

ज्यांस ग्रंथ वाचण्याचा नाद असतो, किंवा डौलाकरितां जे नसा आव घालतात, ते बहुधा आपली विद्वत्ता वाचलेल्या पानांच्या संख्येवर लेखतात. जितकीं पानें आपण वाचलीं, तितक्या मानानें आपले ठायीं अधिक ज्ञान आलें, असें ते समजतात. पण हा केवढा भ्रम आहे, हें अमळ विचार केला असतां हवें त्यास कळण्यासारखें आहे. जितकें जितकें ज्यानें वाचलें तितका तितका तो विशेष ज्ञानसंपन्न व शहाणा, असें जर असतें, तर सध्याचा काळ जगाच्या मार्गांतल्या सर्व काळांपेक्षा ज्ञानांत व शहाणपणांत श्रेष्ठ असता; कारण हल्लीं जितके ग्रंथ झाले आहेत व होताहेत, व लोकांत वाचनाचा सध्या जेवढा प्रचार आहे, त्याचा लक्षांशही प्राचीन काळीं नव्हता. पण चमत्कार पहा काय आहे कीं, अत्यंत प्राचीन काळचेच महान् महान् ग्रंथकार कीर्तिमंदिराच्या अत्युच्च पदावर जे एकदां अढळ बसले आहेत ते आहेत! हल्लींच्या काळीं ज्ञानाचा केवढाही फैलावा झाला असला, तरी त्यांची सर कोणालाही येत नाहीं! तेव्हां यावरून स्पष्टच दिसतें कीं, वाचलेल्या ग्रंथांच्या संख्येचा आणि विद्वत्तेचा मेळ घालणें, हें नेहमीं बरोबरच असतें असा नेम नाहीं. ज्यानें दहाच ग्रंथ वाचले, पण ते मननपूर्वक, शोधक बुद्धीनें वाचले, त्याचें ज्ञान, आणि ज्यानें शेंकडो भरा-

भर वाचून फेकून दिले, त्याचें ज्ञान, या दोहोंत कांहींच साम्य धरतां येणार नाहीं. पारसीकांचें मोठ्या डामडोलाचें अफाट सैन्य आणि शिकंदराचें थोडकेंच पण कसलेलें सैन्य, या दोहोंचा सामना झाला असतां जो परिणाम झाला, तोच वरील दोन पंडितांचें वाग्युद्ध चाललें असतां व्हावयाचा. पण इतकेंच नव्हे, तर तें 'भाराभर केलेलें पाठांतर' सर्वथा 'व्यर्थ' होय; इतकेंच नव्हे, तर तें अत्यंत अनर्थकारकही होय. वरच्या सैन्याचाच दृष्टान्त घेऊन पहा. त्यांत कोणाचा जोडा कोणाच्या पायांत नसल्यामुळे व जो तो आपल्याच थाटांत असल्यामुळे ऐन गर्दीच्या वेळेस सगळा घोटाळाच घोटाळा होऊन सैन्याची संख्या त्यांच्या नाशास जशी कारण झाली, त्याप्रमाणेंच वरील ग्रंथसंख्या वाचणारास उपयोगी पडत तर नाहींच, पण उलटी गर्वोत्पत्तीस मात्र कारण होऊन त्यास प्रसंगी गोत्यांत आणण्यास मात्र खाशी उपयोगी पडते! अथवा सर्वांच्या अतिशय परिचयांतला व्यापार जें भोजन, त्याचा दाखला घ्या. अन्न जसें शरीरास, तशीं वाचन, श्रवण, वगैरे जीं ज्ञानाचीं साधनें, तीं मनास होत. एकानें जसें शरीराचें पोषण होतें, तसेंच दुसऱ्यानें मनाचें होतें. या दोन्ही व्यापारांत पुष्कळ प्रकारचें मोठें चमत्कारिक साम्य आहे. तें असें: जेवण जसें सावकाश, नेमस्तपणानें व नियमानें केलें असतां अंगीं लागून शरीरास हितावह होतें, त्याप्रमाणेंच वाचायाचे ग्रंथ जर पूर्ण लक्ष देऊन मननपूर्वक असे बेताबातानें वाचले, तरच त्यांपासून ज्ञानाचा लाभ होऊन निरनिराळ्या मानसिक शक्ति वृद्धिंगत होत जातील. नाहीं तर

जसा अधाशी मनुष्य अन्नाशी गांठ पडली असतां आकंठ तृप्ति करून घेऊन, पुढे मग आमांशाच्या योगानें होणारी पीडा भोगीत बसतो, त्याप्रमाणेच वाचणाराचीही स्थिति होते. म्हणजे सगळेच अर्धे अर्धे माहीत, पक्के निश्चित असें कांहींच नाही, असें असल्यामुळें भलभलत्या कल्पना व विलक्षण वेडगळ मतें त्याच्या मनांत शिरून ती अभिमानास्तव त्यास कधींही टाकावीशीं वाटत नाहीत. तेव्हां, अन्नाचा परिपाक होऊन ते रक्तरूपानें शरीरास मिळालें, म्हणजे जसें त्याचें सार्थक झालें, त्याप्रमाणेंच आपण जें वाचलें त्याचें पुरतेपणी विवेचन करून त्यांतलें ग्राह्य कोणतें, त्याज्य कोणतें, वगैरेची नीट व्यवस्था झाली, म्हणजे तो मजकूर ज्ञानरूपानें आपल्या मनाशीं मिळून तो आपला झाला असें समजावें. या ठिकाणीं मांसाहाराचा दृष्टान्त फार समर्पक होय. पशुपक्ष्यादिकांचें मांस खाल्लें म्हणजे तें जसें तत्क्षणींच शरीराच्या मांसाशीं मिळत नाहीं, तर जठराग्नीनें त्याचें पुनः पृथक्करण होऊन व तेथील सर्व व्यापार त्यावर क्रमाक्रमानें होऊन, शेवटी जेव्हां त्याचें रक्त बनतें व रक्ताचें मांस होतें, तेव्हांच तें जसें खाणाराच्या मांसाशीं मिळतें, तशीच गोष्ट ग्रंथवाचनाची होय. शेकडों जाडे मोठमोठाले ग्रंथ जरी घोकून टाकले, तरी जोंपर्यंत त्यांचें विवेचन करण्यास वाचणारानें आपल्या विचारशक्तीचा उपयोग केला नाहीं, तोंपर्यंत तितकी विद्या त्या जाडी पुस्तकांतल्या पुस्तकांतच राहिली. तिचा लवलेशही त्याच्या मनांत शिरला नाहीं. इसापनीतींतील उंटाप्रमाणे त्याच्या पाठीवर मात्र अन्नसामुग्री पुष्कळ झाली. पण पोटांत

कांहीं नाहीं ! त्या खाशा ओझ्यानें यास वाहण्याचे मात्र श्रम होतील व मूर्खत्वास्तव त्याच्या भाराचा त्यास मोठा गर्वही वाटेल. पण उपयोग म्हटला, तर जो कोणी शहाणा त्यांतील अन्न काढून करून घेईल त्यासच !

**वि. कृ. चिपळूणकर.** निबंधमाला.

---

## पाठ १७ वा.



### वाचकांचे चार प्रकार.

एका मोठ्या इंग्रज ग्रंथकाराने वाचकांचे पुढील चार प्रकार सांगितले आहेत. पहिल्या वर्गांतल्या वाचकांस त्यानें वाळूच्या घड्याळाची उपमा दिली आहे. त्यांतील वाळू जशी इकडून सळकन निसटून तिकडे जाते, आणि तिकडून तशीच पुन्हा इकडे पडते, त्याप्रमाणेच या वाचणारांनी पुस्तकाचे पारायण केले, तरी शेवटी पुनः ते कोरडे ते कोरडेच ! दुसऱ्या प्रतीचे वाचक स्पंजासारखे होत. स्पंज जसे पाहिजे ते शोषून घेऊन पुन्हां बाहेर टाकितें, फरक म्हणून इतकाच कीं, मूळ द्रव्य अंमळ खराब होऊनमात्र निघते, त्याप्रमाणे. तिसरा वर्ग गाळण्याच्यासारखा. गाळण्यांत कांही घातले, तरी शुद्ध तेवढा अंश नेमका निघून गाळ गाळ तेवढा मात्र फडक्यांत आयता राहतो. त्यासारखें या तिसऱ्या

मंडळींचें वाचन. आणि सर्वांत उत्कृष्ट असा जो शेवटला यथार्थ वाचकांचा वर्ग, त्यास गोवळकोंड्याच्या खाणींतल्या मजुरांची उपमा दिली;—कीं, जे लोक गदळ तेवढें सर्व एकीकडे टाकून, शुद्ध हिरा तेवढा नेमका काढून घेतात!

**वि. कृ. चिपळूणकर.** विनोद व महदाख्यायिका.

---

## पाठ १८ वा.



### प्रथम व्यक्तिसुधारणा.

राष्ट्राची सुधारणा म्हणजे त्यांतील प्रत्येक मनुष्याचा उद्योग, उत्साह आणि खरेपणा या सर्वांचा समूह आहे; तसेंच राष्ट्राची उतरती कळा म्हणजे त्यांतील प्रत्येक मनुष्याचा आळस, स्वार्थदृष्टि आणि अनीति यांचा समूह आहे. राष्ट्रास दुःखें आहेत तीं नसतीं तर बरें झालें असतें, असें लोक म्हणतात. पण ते इतकें समजत नाहींत कीं, ही दुःखें बहुत करून प्रत्येक मनुष्याच्या अनीतीमुळेच झालीं आहेत. मोठमोठाल्या शहरांत अनीति असते, हें सर्व देशांत समजून आलें आहे. मुंबई, पुणें, कलकत्ता, लंडन, पारिस इत्यादि शहरांविषयीं ज्यांस कांहीं माहिती आहे, त्यांस ठाऊक असेल कीं, या शहरांतून अनीतीचीं उदाहरणें फारच आढळतात. याचें कारण कितीएक लोक असे समजतात कीं, मनुष्यांची

वस्ती जसजशी अधिक होत जाते, तसतशी अनीतिही वाढत जाते. पण यापुढे ते कांहीं जात नाहींत. हेंच कारण आहे असें समजून ते स्वस्थ बसतात, आणि शहरें मोठी होऊं देऊं नयेत, असें म्हणतात. मोठमोठ्या शहरांत प्रथमतः सुधारणा होते, आणि ज्या ज्या ठिकाणीं सुधारणा फार होते त्या त्या ठिकाणीं अनीति वाढते. यावरून सुधारणा हे अनीतीचें कारण आहे, तेव्हां सुधारणा होऊं देऊं नये, असें कितीएकांचें म्हणणें आहे. वास्तविक पाहिलें असतां अनीतीचें कारण लोकांची वस्ती किंवा सुधारणा हें नाहीं. सूक्ष्म विचाराअतीं असे दिसून येईल कीं, अनीतीचें कारण तिसरेंच आहे. तें कोणते म्हणाल, तर मनुष्याचें वर्तन. शहरामध्यें नानातऱ्हेचे लोक असतात; त्यांत कोणी चांगले असतात, कोणी वाईट असतात. खेड्यापाड्यांतील लोकांपेक्षां शहरांतील कितीएक लोक अतिशय चांगले असतात, कितीएक अतिशय वाईट असतात. शहरांत अनीतीचीं उदाहरणें सांपडतात, त्याप्रमाणें नीतीचीं व परोपकाराचींही सांपडतात. अनीतींत जशीं शहरें पुढारी आहेत, तशीं नीतींतही आहेत. तसेंच सुधारणा होते तिचा उपयोग जसा चांगल्या कामाकडे होतो, तसा वाईट कामाकडेही होतो. म्हणून वाईट कामाकडे जर तिचा उपयोग करून घेतला, तर तो सुधारणेचा दोष नव्हे. पूर्वीं चाकू चांगला नव्हता, म्हणून लेखण्या चांगल्या करितां येत नव्हत्या. याकरितां त्या चाकूला धार लाविली, तेव्हां त्यापासून लेखण्या चांगल्या करितां येऊं लागल्या. पण तोच चाकू घेतला आणि कोणाच्या पोटांत खुपसला, तर धार लावणाऱ्याकडे—म्हणजे

सुधारणा करणाऱ्याकडे त्याचा दोष आहे कीं काय? अर्थात् नाहीं. यावरून असें स्पष्ट झालें कीं, राष्ट्राचीं संकटें म्हणून जीं आपण म्हणतों, तीं खरोखर त्यांतील प्रत्येक मनुष्याच्या वर्तनापासून उत्पन्न झालेलीं असतात. हें जर वाचकांस स्पष्टपणें कळलें तर देशाभिमानी पुरुषांचें काम काय, हें सहज त्यांच्या लक्षांत येईल. राष्ट्राचीं संकटें जर त्यांस दूर करावयाचीं आहेत, तर केवळ कायदेकानू करून फारसा अर्थ नाहीं, असें त्यांस सहज समजेल. कारण, राष्ट्रांतील व्यक्तींचा स्वभाव व वर्तन हीं जर वाईट असतील, तर तीं संकटें कायद्यांनीं नाहींतशीं केलीं, तरी तीं दुसऱ्याच रूपानें दृष्टीस पडतील.

मनुष्याचा स्वभाव जोपर्यंत वाईट आहे, तोपर्यंत कायद्यांचें कांहींच चालणार नाहीं. खरोखर अनीति बंद होण्याला प्रत्येक मनुष्यानें नीतीनें वागण्यास झटलें पाहिजे. यांतच देशाभिमान आणि परोपकारबुद्धि दिसून येईल. चालू असणाऱ्या कायद्यांमध्यें किंवा व्यवस्थेमध्यें फेरफार व्हावा, म्हणून यत्न करण्यांत तादृश अर्थ नाहीं. असें करणें म्हणजे, मनुष्याचें रक्त दूषित होऊन त्यापासून रोग उत्पन्न झाल्यावर बाह्योपचार करण्यासारखें आहे. एकीकडे बाह्योपचार केले, म्हणजे तेथील दुःख नाहींसें होऊन तें शरीराच्या दुसऱ्या भागावर मोठ्या जोरानें निघतें. तिकडून तिसरेकडेस निघतें. तेव्हां हें दुःख नाहींसें करावयाचें असेल, तर आंत उपचार करून रक्तशुद्धि केली पाहिजे. तीवांचून त्या दुःखाचें बीं मोडणार नाहीं. याचप्रमाणें मनुष्याचा दुष्ट स्वभाव हे राष्ट्रीय दुःखांचें बीं

आहे. ते काढून टाकल्यावांचून कायद्यांमध्यें कितीही फेरफार केले, तरी तीं दुःखे नाहींतशीं होणार नाहींत. म्हणून, प्रत्येक मनुष्यानें स्वतः नीतीनें वर्तण्यास झटावें, याकरितां देशाभिमानी पुरुषानें उद्योग केला पाहिजे.

इतिहासावरून आपणांस असे दिसून येईल कीं, जी प्रजा नीतिमान्, शूर व उद्योगी असते, तिचे राज्यकर्ते चांगले असतात. जी प्रजा नीतिभ्रष्ट, भितरी व आळशी असते, तिचे राजे जुलमी व दुर्वृत्त असतात. एखादे वेळी वाईट प्रजेवरचे राज्यकर्ते चांगले झाले असले, तरी ते पुढे वाईटच होतात. परंतु प्रजा जर चांगली आहे, तर राजेसुद्धां चांगले होतात. आपणांमध्ये " यथा राजा, तथा प्रजा " अशी म्हण आहे. त्याप्रमाणेंच " यथा प्रजा, तथा राजा " असे म्हटलें असतांही चालेल. प्रजा जर चांगली असली, तर एकंदरीत हित होते, व ती चांगली नसली, तर अहित होते. राजा जरी दुष्ट असला, तरी प्रजेचे फारसे नुकसान एकंदरीत होणार नाही. तें कदाचित् झालेच, तर एक वर्ष, दोन वर्षे, पंचवीस वर्षे होईल; पण शेवटी राजाला प्रजेप्रमाणेच व्हावे लागेल. प्रजा हा एक मोठा नदीचा ओघ आहे व त्याला कधी कधी अडविणार राजरूपी पर्वत असतात. या पर्वतांमुळें तो ओघ थोडासा वळेल, परंतु समुद्रास जाऊन मिळणार नाही, असे कधीही होणार नाहीं. राजे किती जरी दुष्ट असले, तरी प्रजा सुवृत्त असल्यास, ते आपोआप चांगले होतात. तसेंच उलट पक्षीं, प्रजा वाईट असून राजे जरी चांगले

असले, तरी फारसा फायदा होणार नाहीं. यास इतिहासाचीं उदाहरणें अनेक देतां येतील. राजा जुलमी असला, म्हणजे प्रजेची स्वतंत्रता नष्ट होते; म्हणून अशा जुलमी राजास दूर केले, तर देशाचें मोठें कल्याण केले, असे म्हणतात. परंतु ही स्वतंत्रता शरीराचीच होय. मानसिक स्वतंत्रता नष्ट झाली, म्हणजे काम मोठे कठिण आहे. शारीरिक दास्य भोगणें सोपे, परंतु मानसिक भोगणे कठिण. मनावर जुलूम करणारे कामक्रोधादिक रिपु, तसेंच अज्ञान यांचा जुलूम अतिशय जुलमी राजाच्यापेक्षांही मोठा असतो. याकरितां प्रथमतः मनुष्याने मानसिक स्वतंत्रता मिळवावी. ही जर नसली, तर राजे चांगले असोत, जमीन सुपीक असो, राज्यव्यवस्था उत्तम असो, तरी देश कधीही चढत्या कळेस लागणार नाही. देशाच्या खरोखर स्वतंत्रतेचे बीज त्यांतील प्रत्येक मनुष्याचा स्वभाव हे आहे. प्रत्येक मनुष्यास जर शारीरिक आणि मानसिक स्वतंत्रतेची इच्छा असेल, तर सर्व देशाचे कल्याण होईल, व देशास स्वस्थतेच्या सुखाचा लाभ मिळेल.

**वि. मो. महाजनी.** स्वतःचा प्रयत्न.

---

## पाठ १९ वा.



## आयुष्याचा उपयोग.

### भाग १ ला.

एक पैसा जवळ असला, म्हणजे पाहिजे तो पदार्थ मिळतो. त्याप्रमाणें वेळाचा उपयोग करण्याचा मार्ग चांगला ठाऊक असला, म्हणजे माणसाला पाहिजे तें काम सिद्धीस नेतां येते. आजपर्यंत जगामध्ये ज्या माणसांनीं मोठे पराक्रम केले आहेत, त्यांची चरित्रे पाहिली तर असे दिसून येईल कीं, त्यांना जे काय यश मिळालें, ते वेळाचा चांगला उपयोग हा मोबदला दिल्याने मिळाले. वेळ म्हणजे काय ? आयुष्य ! ते किती मोलाचें आहे ! तें एक नाहीं, म्हणजे बाकीच्या कोणत्याही वस्तूचा उपयोग नाहीं. मोठमोठे भूपति अत्यंत सुखदायक संपत्तीचा त्याग करून मृत्युपथानें एकदम निघून जातात. त्यांना जावेच लागते. कां ? तर तिचा उपभोग घेण्यास ज्या आयुष्याच्या उपयोगाचा मोबदला द्यावा लागतो, ते आयुष्य त्यांच्यापाशी नाहींसे होतें. ह्याचा अर्थ असा कीं, आयुष्य नाहीं म्हणजे कांहीं नाहीं.

पै पै मिळून कोट्यवधि रुपये होतात. थेंब थेंब मिळून महासागर होतो. एक एक दाणा मिळून धान्याचीं कोठारेंच्या कोठारें भरतात. त्याप्रमाणे पळ पळ मिळून मनुष्याचें आयुष्य होते म्हणून पळ हें जरी अत्यल्प दिसलें, तरी तें क्षुल्लक मानूं नये. जो माणूस

एक पैदेखील व्यर्थ खर्चीत नाहीं, त्याचा रुपया कधीं व्यर्थ खर्चावयाचा नाहीं. त्याप्रमाणें जो माणूस आपलीं घटकापळं सत्कार्यास लावितो, त्यास आपल्या दिवसरात्रीस आणि महिन्यांस वेगळे जपावयास नको. म्हणून आपल्या आयुष्याचा यत्किंचित्‌ही भाग व्यर्थ जाऊं देऊं नये.

पैसा गेला तर तसा पुनः मिळवितां येतो. स्मरण होईना, तर ज्ञान पुनः संपादितां येतें. परंतु, आयुष्य एकदां गेलें म्हणजे गेलें. त्याचें दर्शन पुनरपि व्हावयाचें नाहीं. "न कालचा दिन आज दुजा' असें जोशीबोवांनीं म्हटले आहे. हे कां लक्षांत येत नाहीं? पैसा पुनः मिळविण्यास उद्योग करावा लागतो. ज्ञान संपादण्यास अभ्यास करावा लागतो. तसें कांहीं आयुष्याचें नाहीं. कालचा दिवस गेला, कीं त्याच्या जागीं आजचा दिवस अगदीं अप्रयत्नतः, अगदीं आपोआप, न-बोलवितां येतो; आणि तो इतका हळूच येतो कीं, तो केव्हां येतो हें कळतदेखील नाहीं. त्यामुळें, आजचा दिवस हा कालचा तोच नव्हे, तो गेला आहे आणि हा त्याच्या जागीं दुसरा आला आहे, ह्याचें भान रहात नाहीं. हा एक मोठा भ्रम आहे. हा टाळावयास पाहिजे.

झाड जसें वळवावयाचें असेल, तसें त्याला, ते लहान आहे तोंच, वळण लाविलें पाहिजे. लोखंड वळवावयाचे असतां, ते तापून लाल झालें आहे तोंच ठोकिलें पाहिजे. त्याला जर उशीर झाला, तर मग तें सगळें फसतें. तसेंच आयुष्याचें आहे. तरुण-

पण आहे, बुद्धि चांगली आहे, ग्रहणशक्ति ताजी आहे, तों शिकून घ्यावें. हें प्रौढपणी व्हावयाचें नाहीं. उद्योग करणें, दोन पैशांचा संचय करणें, लौकिक संपादणें, हें प्रौढ वयांत व्हावयाचें. तें शक्ति क्षीण झाल्यावर म्हातारपणीं व्हावयाचें नाहीं. आणि दुर्लक्षामुळें किंवा आळसामुळें हीं जर साधलीं नाहींत, तर म्हातारपण निःसंशय विपत्तींत जावयाचें. तें महद्दुःख आहे. तें आपल्या वांट्यास येऊं नये, असें ज्यांस मनापासून वाटत असेल, त्यांनीं आपल्या तरुणपणाचा आणि प्रौढपणाचा उपयोग चांगला करावा. शेत पेरल्याशिवाय उगवावयाचें नाहीं, हें खचित समजावें. आणि पेरावें तें सहसा फुकट जावयाचें नाहीं, हेंही लक्षांत ठेवावें.

"असतात शितें तों मिळतात भुतें" हें संपत्तीचें आहे. तें असूं द्या. घरांतलें अन्न खाण्यास कोण येतील ते येऊं द्या, आणि तें त्यांना खाऊं द्या. पण आयुष्यास खाणाऱ्या पाहुण्यांस जवळ येऊं देऊं नका. आतां तुम्हांकडे जे जेवीत आहेत, ते कदाचित् तुमच्या अवनतीच्या वेळीं तुम्हांला जेवावयाला घालतील; पण, तुमचें आयुष्य सरायाची वेळ येईल, तेव्हां त्यांचें किंवा दुसऱ्या कोणाचेंही आयुष्य तुमच्या उपयोगीं पडावयाचें नाहीं. त्यांच्यानें तें तुम्हांला देतां यावयाचें नाहीं, आणि तुम्हांला तें घेतां यावयाचें नाहीं. कै. विश्वनाथ नारायण मंडलिकांविषयीं असें सांगतात कीं, कोणीही भेटावयास आला असतां, अमुक मिनिटें बोलावयाचें असें त्याला स्पष्ट सांगून ते बोलावयास लागत असत. तसेंच जर्मनींतले नामांकित पराक्रमी प्रधान प्रिन्स बिस्मार्क यांच्या खोलींत

तर एक घड्याळ ठेविलेलें असे. आणि पाहुण्याशीं बोलण्याच्या वेळाची इयत्ता संपली, म्हणजे त्यांतून आपोआप, " आतां पुरे, आतां पुरे " असे शब्द निघत असत !

---

## पाठ २० वा.



## आयुष्याचा उपयोग.

### भाग २ रा.

सुख होण्यास विश्रांति पाहिजे—आवश्यक आहे. पण विश्रांति कोणाला? उद्योग्याला ! काम करून दमतो तो हायसा बसतो. जो नेहमींच स्वस्थ बसतो—उद्योग करीत नाहीं—दमत नाहीं—त्याला विश्रांति कशाची? त्याला सगळीच विश्रांति ! तोच आळस. पळण्यापेक्षां चालणें बरें, चालण्यापेक्षां उभें राहणें बरें, उभें राहण्यापेक्षां बसणें बरें, बसण्यापेक्षां लवंडणें बरें, हे आळसाचे डोहाळे होत. आळस दरबारांत आला कीं, द्रव्य आणि सुख ह्यांनीं खिडक्यांतून बाहेर उड्या मारल्याच समजा. निरुद्योगी, आळशी मनुष्याचें मन हें अविचारभुताचें उद्योगस्थान होय. मन रिकामें असें कधींच रहात नाहीं. त्याचा स्वभावच असा आहे कीं, त्याला कांहीं तरी नेहमीं काम लागतें. तें अमक्याच प्रकारचें लागतें असें नाहीं. पण काम लागतें. त्याला चांगलें काम दिलें, म्हणजे अर्था-

तूच तें वाईट कामाकडे वळत नाही. त्याला तिकडे वळण्यास अवकाशच सांपडत नाही. तेच त्याला चांगले काम दिलें नाहीं, म्हणजे अर्थात् तें वाईट कामाकडे वळतें. म्हणजे हें वाफेच्या यंत्रासारखें आहे. ते चालू असतां त्याला चांगल्या रुळावर नीट लावून ठेविले, म्हणजे ते गाड्या सरळ मार्गानें ओढून नेऊन, माणसांस साह्य करितें. तेंच, तसें नीट मार्गावर लावून ठेविलेलें नसलें, म्हणजे भलतीकडे जाऊन आपल्या स्वतःचा नाश करून घेऊन, दुसऱ्या वस्तूंचा नाश करितें.

" निरंतर चांगला उद्योग करीत असतो, तोच जिवंत आहे, असे म्हणावें." असें एक वचन आहे. तें शब्दशः खरें आहे. निरुद्योगी मनुष्य मृत समजावा, किंवा मृतापेक्षांही अधिक वाईट समजावा. कां की, मृत मनुष्य आपण स्वतः नाहींसा होतो, एवढेंच काय ते. परंतु, निरुद्योगी मनुष्य, म्हणजे कांहीं तरी मूर्खपणा करीत बसणारा मनुष्य, जे कांहीं तरी करितो, त्यानें तो आपणास बुडवून घेऊन दुसऱ्यांस बुडवितो. कै. महादेव गोविंद रानडे हे प्राणोत्क्रमणाच्या आधीं एक तास असें म्हणाले कीं, " उद्योग करीत असतां मरणे हेंच सुखाचें मरण होय. " आणि त्यांना स्वतःला तसेंच मरण आलें. कुटुंबांत किंवा देशांत विपत्ति असते, ती अशा [ निरुद्योगी ] माणसांच्या पायीं उत्पन्न झालेली असते.

निरंतर चांगला उद्योग करावा. परंतु त्याविषयीं फार हांव धरूं नये. उद्योग करणें हें आपलें काम, त्याचें फल येणें परमे-

स्वाधीन आहे. दोन कोळी एकाच होडींत बसून एकसारखीं जाळीं टाकून, एकसारखे खपत असतात. त्यांतल्या एकाच्या जाळ्यांत पुष्कळ मासे येतात, दुसऱ्यास एकही मिळत नाहीं, असें कधीं कधीं घडतें. हें सगळें योगायोगाचें फल होय. तरी उद्योग पाहिजे. पुष्कळ मासे ज्याला मिळाले तो कोळी जर स्वस्थ बसता, तर ते मासे आपोआप त्याच्या जाळ्यांत आले नसते. सिंह पराक्रमी असतो, तरी त्याचें भक्ष्य त्याच्या तोंडांत आपोआप येऊन पडत नाही. अणाखी, भक्ष्य सांपडतें तेंही म्हणजे नेहमीं त्याच्या योग्यते-सारखें मोठें असते असेंही नाहीं. तरी त्याविषयीं त्याला खंती वाटत नाहीं. पृथ्वीपतीनें बाण मारिला, म्हणजे तो सिंहाला किंवा वाघालाच लागला पाहिजे, असें नाहीं. तो कोल्ह्यालाही लागतो. तो योग आहे.

"करूं आतां सावकाश ! घाई काय?" ही कल्पना मोठी घातुक आहे, मोठी चोर आहे. हिनें फार घात होतो. घाई नाहीं तर काय झाले? आज जे साहित्य हाताशीं आहे, तें उद्यां राहतें म्हणून कशावरून? आणि उद्यांचा दिवस तरी आपल्या हातीं लागतोच, ह्याचा काय नेम आहे? आपल्या हातून जें काय होण्या-सारखें असेल, तें एकदम करून टाकावें, हें उत्तम. लांबणीवर टाकूं नये.

कार्य अर्धवट राहिल्याची क्षीत करूं नये. अर्धवट राहिलें म्हणून काय झालें? राहिलेलें कोणी तरी पूर्ण करील. पण, मुळीं आरं-

भच जर केला नाहीं, तर तें कदाचित् मुळींच व्हावयाचें नाहीं. देवालय बांधावयाचें ते अर्धें कां होईना, तेवढेच पुण्य.

काय करावयाचें त्याविषयीं उगाच वाच्यता करूं नये. जें काय योग्य वाटेल तें एकदम करावयास लागावें. त्याविषयींचा निश्चय ढळूं देऊं नये. " निश्चयाचें बळ। तुका म्हणे तेंचि फळ. " आयुष्याचा उपयोग बेताने जपून केला, म्हणजे तें सगळ्या इष्ट कामांस पुरून उरतें. कार्लाईलनें लिहावयाचें तेवढें सगळें लिहून लेखणी खालीं ठेविली, आणि म्हटले की, " मी आतां मरावयास तयार आहें. " एका तत्त्वज्ञानें दुसऱ्यास म्हटले, " आतां आपण वृद्ध झालों—थकलो. आपण आतां विश्रांति घ्यावी हें बरें नाहीं काय ? " त्यास दुसऱ्यानें उत्तर दिले, " विश्रांति ? मरणोत्तर सगळी विश्रांतिच आहे ! " आणखी विश्रांति म्हणजे काय? कांहीं एक न करितां हातपाय जोडून स्वस्थ बसणे ही कांहीं विश्रांति नव्हे. त्यांत कांहीं सुख नाहीं. एका कामाचा शीण आला म्हणजे दुसरें करायास लागणें—त्यांत बरें वाटते—त्यांत नवा हुरूप येतो—ती विश्रांति खरी. मनुष्य पडलेलाच असतो. पण, एका कुशीवरून दुसऱ्या कुशीस वळला, म्हणजे बरे वाटतें. तीच गत विश्रांतीची आहे.

**ग्लॅडस्टन** ह्यांनीं एके वेळीं व्याख्यानामध्यें श्रोत्यांस सांगितलेः—" तुम्ही आपले आयुष्य चांगल्या कामीं लावा; त्याचा सव्याज लाभ तुम्हांस प्रौढपणांत तुमच्या अजमासापेक्षां पुष्कळ अधिक खचित होईल; त्याप्रमाणेंच, जर तुम्ही आपला वेळ व्यर्थ

घालवाल, तर परिणामीं बुद्धीनें, नीतिमत्तेनें आणि योग्यतेनें इतकी हानि पावाल की, तिची तुम्हांला आतां पुरती कल्पना-देखील करितां यावयाची नाही. लक्षांत ठेवा." तुकाराम महाराजांनीं मोठ्या कळकळीनें मनुष्यास म्हटलें आहे:—

कांहीं धांवाधांव करीं । जोंवर आहे मृत्यु दुरी ॥

**वि. कों. ओक.** बालबोध.

---

# पाठ २१ वा.



## मनुष्यांचे तीन प्रकार.

### भाग १ ला.

जगांत तीन प्रकारचीं माणसे आढळतात. त्यांपैकीं एक प्रकार म्हटला म्हणजे, केवळ स्वार्थावर नजर देणाऱ्या कोत्या समजुतीच्या लोकांचा; दुसरा प्रकार परोपकारी व दूरदृष्टीच्या लोकांचा; व तिसरा मध्यम प्रतीच्या लोकांचा, म्हणजे जे केवळ स्वार्थपरायण नाहींत, परंतु फारसे परोपकारीही नाहींत, ज्यांची दृष्टि फार दूरवर पोहोंचत नाहीं, परंतु ती अगदींच आकुंचितही नाहीं, अशांचा. पहिल्या वर्गांतील माणसांची संख्या बरीच मोठी आहे, परंतु ती मोठी असण्याची कारणें अज्ञान, अविचार, दारिद्र्य, दुःसंगति वगैरे अनेक आहेत. कोणीही मनुष्य स्वभावतःच निव्वळ आप्पल-

पोट्या असेल, असें मला वाटत नाहीं; परंतु हा दुर्गुण जडण्यास व त्याचा मनुष्यावर पगडा बसण्यास अल्प कारणही पुरतें. कोत्या समजुतीच्या मनुष्यास पैसा मिळवावा हें कळतें, परंतु त्याचा सत्कारणीं व्यय करावा, हें समजत नाहीं. आपल्या दाराशीं कोणी आंधळा, पांगळा, दुबळा, भिकारी येईल या भीतीनें तो आपलें दारें कड्या लावून बंद ठेवील. ऐषआरामाच्या किंवा कला-कौशल्याच्या कामाचा त्यास अत्यंत तिटकारा असावयाचा. "हे घेऊन यानें काय पोट भरावयाचें आहे. ?" असें तो म्हणेल. व्यवहारज्ञानाबद्दल या प्रकारच्या मनुष्यास जितकी घमेंड असते, तितकी थोड्याच दुसऱ्या लोकांस असेल. खर्चाच्या भीतीनें तो चांगल्या घरांत राहणार नाहीं; खर्चाच्या भीतीनें तो चांगलें अन्न खाणार नाहीं; खर्चाच्या भीतीनें धर्माचें किंवा परोपकाराचें काम त्याच्या हातून कदापि होणार नाहीं; परंतु जी गोष्ट आपण करीत नाहीं, ती करण्यास उचित नव्हे, असें दाखविण्याचा त्याचा सदोदित प्रयत्न असल, व चांगल्याही कामाचे त्यास दोष-मात्र दिसतील. दोघां माणसांतील तंटा सोडविण्यास कोणी गेल्यास, "या चोंबडेपणाची यास काय गरज होती ? त्यांनीं एकमेकांचे गळे कापले असते, तर, याचें काय जात होतें ?" कोणी देवालय बांधावयास निघाला, तर, "कोण छांदिष्टपणा हा ! आजपर्यंत देवालयें नव्हतीं म्हणून का कोणाचें अडलें होतें ?" कोणी मोठें सुंदर घर बांधूं लागल्यास, "आजपर्यंत असलीं घरें नव्हतीं म्हणून कोणी मेला होता कीं काय ?" याप्रमाणें प्रत्येक चांगल्या

कामावर या व्यवहारज्ञाची टीका आहेच. कोणतीही नवी गोष्ट कोणी करूं लागल्यास त्यास जो राग व तिटकारा येतो, व ज्या कुत्सित कल्पना त्याच्या मनांत भरतात, त्या सांगतां पुरवणार नाहींत. कोणास ठकविणें, बुडविणें, भलत्या नादास लावणें, धर्महानि करणें इत्यादि अनेक दुष्ट हेतूंचा नवीन कृत्य आरंभणारावर ते आरोप करितील, व तेवढ्यानें त्याने आपले काम सोडून न दिल्यास, त्याचा पाडाव व फजिती करण्याकरितां खोट्याच वाईट गोष्टी रचून त्या प्रसिद्धीस आणतील. "पहा रे बुवांनो! आज असें झालें, उद्यां अमुक होणार म्हणून ऐकतों, कोणावर काय प्रसंग येईल याचा नेम नाहीं. सावध असा, नाहीं तर या माणसाच्या नादीं लागून नाहक बुडाल!" याप्रमाणें जे कोणी आपल्यासारखेच नाहींत, त्या सर्वांवर वाईट टीका करण्याचें त्यांस एवढेंच कारण असते कीं, आपल्या व्यवहारज्ञानाबद्दल आपली प्रतिष्ठा व्हावी, आपण जी गोष्ट करीत नाहीं, ती करणें योग्यच नव्हे, असें लोकांस भासावें, विशेषतः आपल्या आळसावर व आप्पलपोटेपणावर पांघरूण पडावें. ज्यास स्वतः कोणतीही चांगली गोष्ट करावयास नको असते, त्यास जे दुसरे ती करीत असतील त्यांस विघ्न करण्यास पुष्कळ वेळ सांपडतो. अशा लोकांपासून शेजाऱ्यापाजाऱ्यांस, गांवच्या लोकांस, किंबहुना सर्व राष्ट्रास प्रसंगविशेषीं मोठी भीति असते. आपल्या कवडीच्या फायद्यासाठीं दुसऱ्याचें हजारों रुपयांचें नुकसान झालें, तरी ते फिकीर करीत नसतात. आपलें कोणी थोडें नुकसान केल्यास त्याचा सूड

उगविण्याकरितां त्याचें कितीही नुकसान झालें, तरी ते पहावयाचे नाहींत. व आपल्या स्वतःच्या प्राप्तीकरितां देश बुडाला तरी बेहत्तर आहे, असा त्यांचा निश्चय असतो. चहाडी करणें, शत्रूस फितुर होणें, कोणावर अकस्मात् घाला घालणे, हीं नीच कृत्ये या प्रकारच्या लोकांकडून होतात. यांच्या प्रती लावणें झाल्यास नीचपणा, विघ्नसंतोषीपणा, कवडीचुंबकपणा, निर्दयता, विश्वासघात इत्यादि दुर्गुणांचें कमीअधिक प्राबल्य पाहूनच लाविल्या पाहिजेत. मनुष्य आप्पलपोटचेपणाच्या आधीन झाल्यावर कोणकोणत्या दुष्ट गोष्टी करण्यास तयार होईल हे सांगणे कठिण आहे !

या प्रकारचे लोक जगांत आरंभापासून आहेतच. परंतु जर सर्वच लोक पहिल्यापासून असे असते, तर आज जगाची कशी स्थिति आपणांस दिसली असती, या गोष्टीची कल्पना करा. आजपावेतों माणसें शुद्ध रानटी स्थितींत राहिलीं असती, झोंपडया बांधूनच त्यांनीं निर्वाह केला असता, त्यांमध्ये कलाकौशल्याचा व ज्ञानाचा पूर्ण अभाव राहिला असता, परस्परांमध्यें नित्य भांडणतंटे सुरू असते, व क्रूरतेची आणि विश्वासघाताचीं कृत्ये प्रत्यहीं घडलीं असतीं, कोणाचाही उत्कर्ष दुसऱ्यांस सहन झाला नसता, कोणाचेंही पुढें पाऊल पडलेलें इतरांस पाहवलें नसते.

---

# पाठ २२ वा.



## मनुष्यांचे तीन प्रकार.

### भाग २ रा.

ही स्थिति जगास न येण्याचे कारण दुसऱ्या प्रकारचे लोक दर पिढीस थोडे थोडे उत्पन्न होत गेले, हें होय. लोकांच्या हिताकरितां झटणें, कांहीं मोटी गोष्ट आपल्या हातून घडण्यासारखी असल्यास तिच्या सिद्धीकरितां आपलें पाहिजे ते नुकसान करून घेणे, मानसिक परिश्रमाने विशेष ज्ञान संपादन करणें, सत्कार्यास निरंतर मदत व उत्तेजन देणे, वृथा लोकापवादास न भिणें, हे व असेच दुसरे गुण या दुसऱ्या वर्गांतील माणसांमध्यें दिसतात. या वर्गांतील लोकांनीं जे सतत श्रम केले, त्यांनी जो स्वार्थत्यागाचा कित्ता घालून दिला, इतरांच्या दुराग्रहामुळे त्यांस जीं संकटें भोगावी लागली, त्या सर्वांमुळेच केवळ हल्लीची सुस्थिति आपणांस प्राप्त झाली आहे.

ईश्वराच्या आराधनेसाठी जी सुंदर देवालयें जागोजाग बांधलेली दिसतात, ती कोणी बांधिली? मोठमोठ्या नद्यांस जे ठिकठिकाणीं घाट बांधलेले आहेत, ते कोणी बांधले? मोठ्या विशाल वृक्षांचें बीजारोपण कोणीं केले? व त्यांच्या छायेखालीं थकल्याभागलेल्यांस सुखानें बसतां यावें म्हणून त्यांस पार कोणीं बांधले? प्रवाश्यांच्या सोईकरितां धर्मशाळा कोणीं बांधिल्या? विहिरी व

तलाव कोणीं खणिले ? अन्नछत्रें कोणीं स्थापिलीं ? ज्ञान व सदाचार यांच्या वृद्धीकरितां सर्वस्वीं त्याग कोणीं केला ? धर्मस्थापना व स्वराज्यस्थापना यांसाठीं कोणीं भगीरथ प्रयत्न केले ? स्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठीं कोणी आपले देह बळी दिले ?

या सर्व गोष्टी आत्मनिरपेक्ष, दूरदर्शी व परोपकारी अशा पुरुषांनीं केल्या. अशा पुरुषांस अज्ञान, उन्मत्त, अविचारी, दुराग्रही व आप्पलपोटये, अशा लोकांकडून किती अडथळा झाला, त्यांस किती संकटें व यातना सोसाव्या लागल्या, या गोष्टीची कल्पना एकट्या हिंदुस्थानांतील थोर पुरुषांचीं चरित्रें वाचूनही येण्यासारखी आहे. परंतु ही कल्पना पूर्णपणे मनावर बिंबण्यास युरोपांतील थोर पुरुषांची चरित्रें वाचलीं पाहिजेत. कारण तेथें सत्पुरुष आणि दुष्ट पुरुष यांमधील युद्ध कित्येक शतकेंपावेतों मोठ्या कडाक्यानें सुरू होतें. दुष्ट पुरुषांस धर्मबळ, राजसत्ता व संपत्ति हीं सर्व अनुकूल होतीं. सत्पुरुषांस सत्यनिष्ठेचें, परोपकारबुद्धीचें व सुविचारांचेंमात्र पाठबळ होतें, व त्यांचा सर्व हवाला केवळ ईश्वरावर होता. तेथें अशी स्थिति असतां अखेरीस सत्पुरुषांचाच जय होत गेला, सत्याचें व सुविचाराचेंच प्राबल्य होत गेलें, व दुष्ट पुरुषांसही सौम्य स्वरूप धारण करून सत्पुरुषांचे बाह्यात्कारें अनुकरण करणें भाग पडलें. ईश्वरी संकेताप्रमाणें मनुष्याच्या उन्नत स्थितीची व कर्तव्याची दिशा कोणती, हें याप्रमाणें युरोपच्या इतिहासावरून विशेष लक्षांत येतें.

आतां वर सांगितलेलीं परोपकारकृत्यें करणाऱ्या सत्पुरुषांच्या हेतूंची पहिल्या वर्गांतील व्यवहारज्ञान्यांच्या रीतीनें परीक्षा करूं लागल्यास ते सर्व थोर पुरुष मूर्ख व छांदिष्ट ठरतील ! कारण हीं कृत्ये करितांना त्यांनी आपणां स्वतःस काय फायदा होणार, याचा मुळींच विचार केला नाहीं. परंतु ज्याचे विचार अद्यापि इतके कोते व कुत्सित झाले नाहीत, त्यास त्या महात्म्यांचे औदार्या-विषयीं निदान आश्चर्य तरी वाटेल, व त्यांविषयीं थोडी तरी कृत-ज्ञता त्याच्या हृदयांत उत्पन्न होईल. पहा कीं, ज्यांनीं स्वदेशाच्या स्वातंत्र्यासाठी आपले जीव अर्पण केले, त्यांना स्वतःला त्या देशा-पासून किंवा स्वातंत्र्यापासून कांही तरी उपयोग होणार होता काय ? ज्यांनीं पराकाष्ठेचे श्रम करून गहन विषयांचें ज्ञान संपादन केलें, त्यांस तें लिहून ठेवण्याचा स्वतःला कांहीं फायदा वाटला असेल काय ? ज्यांनीं अन्नछत्रे घातलीं, ते पुरुष उपाशी मरत होते कीं काय ? ज्यांनीं विहिरी, तलाव व घाट बांधले, ते निरंतर तहानेनें व्याकुळ झाले होते काय ? ज्यांनीं देवालयें बांधली, त्यांच्या हातून निरंतर नरकवास प्राप्त होईल अशीं कांहीं भयंकर पातके घडलीं होतीं काय ? छे, छे ! असा प्र[illegible]र असण्याचा बिलकुल संभव नाही. अशीं कृत्यें करणारांचें त्या[illegible]सून स्वतःचें फारच थोडे हित होणार होतें; त्यांचा उपयोग दुसऱ्यांस व्हावयाचा, व म्हणूनच अशा कृत्यांस परोपकाराचीं कृत्यें असें आपण म्हणतों.

परंतु अन्नछत्रांत फुकाचें जेवून, विहिरीचें स्वच्छ, शीतळ पाणी पिऊन, धर्ममंदिराच्या थंड सभामंडपांत सुखानें बसून, किंवा सायं-

काळीं घाटावर चैनीनें हवा खात पडून, जेव्हां कोत्या बुद्धीचे लोक व्यवहारज्ञानाच्या गोष्टी सांगतात, व आपल्या काळच्या परोपकारी पुरुषांस मूर्ख, दांभिक किंवा पापाचारी ठरवितात, किंवा दुसरीं अनेक दूषणें देतात, तेव्हां खरे व्यवहारज्ञान कोणास आहे म्हणून समजावें? ज्याने ते देवालय किंवा तो घाट बांधिला त्यास किंवा त्यावर बसून यथेष्ट गप्पा मारणारास? खाणें, पिणें, शरीरवासना पुरविणें व द्रव्यसंचय करणें, आपल्या पुरता विचार करून तटस्थ राहणे किंवा दुसऱ्यास उपद्व्याप करणे, हेंच शहाणपणाचें सर्वस्व असाच जर सर्वांनी विचार केला, तर हें जग आतां आहे तसे सुंदर राहणार नाहीं; सामान्य मनुष्यास त्यापासून आतां इतका सुखाचा लाभ होणार नाहीं; व मोठ्या उदार अंतःकरणाच्या पुरुषांस ते राहण्यास योग्य नव्हे असे वाटू लागेल.

याप्रमाणें मनुष्याचे मुख्य जे दोन प्रकार त्यांमधील भेद सांगितला. बाकी राहिलेल्या तिसऱ्या प्रकारचे लोक उभयतांचेही गुणावगुण कमीअधिक प्रमाणानें घेऊन आपला चरितार्थ चालवितात. तेव्हां त्यांविषयीं कांहीं विशेष सांगावयास नको. या तीन प्रकारांपैकी कोणता उत्कृष्ट, कोणता अनुकरणीय, असें विचारिल्यास तो परोपकारी पुरुषांचाच, असे हल्लींच्या काळांत कोणीही सांगेल. परंतु तो तुम्हीं स्वीकारिला आहे काय? त्यांत आपली गणना व्हावी असें तुम्हीं कांहीं थोडे तरी केले आहे काय? असें विचारिल्यास मग पुष्कळांस काय उत्तर द्यावें, याचा संदेह पडेल.

**म. शि. गोळे.** शाळेचा अभिमान.

## पाठ २३ वा.



### न्यायाचा मासला.

रूमशामच्या एशिया खंडांतील मुलुखाची राजधानी स्मर्ना नामक विख्यात शहर होय. तेथें एक मुसलमान वाणी रहात असे. त्याच्या मुलास तेथें नायब काजीची जागा मिळाली. त्या अधिकाराप्रमाणें नायबसाहेबांची शहरांतून देखरेख होऊं लागली. कोणाची कोणत्याही प्रकारची दगाबाजी नजरेस आली कीं पुरे, त्यास तावडतोब सक्त सजा होई. एके दिवशीं झाडून साऱ्या दुकानदारांच्या मापांची व वजनांची तपासणी सुरू झाली. नायबाचा बाप यासंबंधानें मोठा निर्मळ होता असे नाहीं. खोटींनाटीं मापें व वजनें बाळगून गिऱ्हाइकांस फसविण्याचा त्याचा नेहमींचा धंदाच होता. त्यांतून त्याच्या मुलास नायबी मिळाल्यापासून तर तो आपल्या ठिकाणीं अगदीं निर्धास्त झाला होता. ज्या दिवशीं वरील तपासणी सुरू झाली, त्या दिवशीं त्याच्या शेजाऱ्यांनीं त्यास सांगितलें कीं, तूं आपलीं नेहमींचीं वजनें दडवून ठेवून खरीं दुकानांत ठेव, म्हणजे तीं तपासलीं तरी कांहीं धास्ती नाहीं. मियांनीं हें शेजाऱ्यांचे बोलणें झिडकारून दिलें; आणि आपलाच मुलगा तपासणीस आहे, तेव्हां आपणास काय भय आहे, या घमेंडीवर स्वारी राहिली. तपासणी होतां होतां त्याच्या दुकानाशीं नायब येऊन ठेपला; तरी त्याचा बाप खुशाल आंत टेकून बसला होता.

नायबाने इतरांप्रमाणें त्यासही सांगितलें कीं, तुमच्या दुकानांतील वजनें व मापें सारीं पुढें आणा, तीं आम्हांस पाहिलीं पाहिजेत. बापानें हा हुकूम ऐकला न ऐकलासें करून, सर्व हंसण्यावारी नेण्यास आरंभ केला; पण नायबानें ताबडतोब शिपायांस ताकीद दिली कीं, बेलाशक आंत जाऊन सारीं वजनें व मापें बाहेर काढा. शिपायांनीं तसें करून तीं सर्व तपासून पहातां तीं अगदीं खोटीं ठरलीं. तेव्हां लागलींच तीं सर्व मोडूनतोडून टाकण्याविषयीं हुकूम झाला. तो ऐकून वाण्यास मोठा अचंबा वाटला, व तो अगदीं गांगरून गेला; तरी त्यास एवढें वाटलें कीं, आतां यापेक्षां तरी आपला लेक ज्यास्त करणार नाहीं; नायबानें आपलेंतुपलें बिलकूल न ओळखितां पन्नास रुपये दंड व पन्नास फटके ही सजा त्यास देऊन ती तेथल्या तेथें अंमलांत आणली.

शिक्षा आटोपल्यावर नायबानें घोड्यावरून खालीं उडी टाकिली, आणि आपल्या बापाचे पाय धरले; आणि आपल्या अश्रूंनीं त्यांचें प्रक्षालन करून त्यास म्हटलें, 'बाबा! परमेश्वराच्या, सरकारच्या, स्वदेशाच्या व हुद्याच्या संबंधानें जें माझें कर्तव्य होतें तें मी करून चुकलों. आतां पुत्रधर्माप्रमाणें तुझें ऋण जें माथीं आहे तें फेडूं दे. न्यायदेवता ही अंध आहे, ती या पृथ्वीवर साक्षात् ईश्वराचीच विभूति आहे. ती आपपर हे संबंध ओळखीत नाहीं. गणगोताचे संबंध हे ईश्वराचे नियमांपुढें व राष्ट्राच्या कायद्यांपुढें कांहीं नव्हत. यांचें तुझ्याकडून उल्लंघन झाल्यामुळें तूं शासनास पात्र झालास! हें शासन तुला कोणाकडून तरी पोंचा-

याचेंच, पण ते तुला देणें माझ्याच नशिबी आलें, याचा मला खेद होतो! तर शेवटी एवढीच विनंती करतो की, यापुढें खऱ्या मार्गानें वाग, आणि मी जे केले त्याबद्दल मजवर शब्द न ठेवितां असें करणें माझ्या कपाळी आले याबद्दल माझी तुला दया येऊ दे."

इतकें बोलून तो तपासनीस घोड्यावर चढला आणि आपल्या कामास पुनः लागला. रयतेनें हें निःपक्षपात न्यायाचे उदाहरण पाहून त्याचा मोठा जयजयकार केला. ती लोकप्रशंसा सुलतानाच्या कानी जातांच त्यानें त्यास काजी केला; व काजीचा मुफ्ती केला. हा मोठा अधिकार तो बजावीत असतां सारी प्रजा त्यास दुवा देऊं लागली.

**वि. कृ. चिपळूणकर.** विनोद आणि महदाख्यायिका.

---

## पाठ २४ वा.



### रामरसाचे दोन घुटके!

**भाग १ ला.**

नऊ महिने गर्भवास काढल्यावर चैत्र महिन्यांत नवमीच्या दिवशीं पुनर्वसू नक्षत्रीं राम जन्मास आला. त्या वेळेस पांच ग्रह स्वगृहींचे होते. चंद्र व गुरु एकाच राशीचे होते, व लग्न कर्क होतें. राजपुत्र व त्यांतही नवससायास करून प्राप्त झालेला पुत्र असूनसुद्धां बालपणीं रामाच्या शिक्षणाविषयीं यत्किं-

चितही हयगय झाली नाहीं. बालपणींच वेदाध्ययन करून धनुर्विद्येत व घोड्यावर बसण्यांत तो वाकबगार झाला होता; व इतकें असूनही तो नेहमीं "पितृशुश्रूषणरत" असे. रामाचे डोळे लाल, बाहु विस्तृत, ओष्ठ रक्तवर्ण व आवाज दुदुंभीप्रमाणे असे. पंधरा वर्षांचा असतांच यज्ञक्रियेस व्यत्यय आणणाऱ्या राक्षसांचें निर्दलन करण्याकरितां रामास विश्वामित्र घेऊन गेला. पुढे "गोब्राह्मणहितार्थ" व "देशहितार्थ" मुनिवर्यांचा उद्देश सिद्धीस नेल्यावर जनकाच्या धनुष्याचा भंग करून वीर्यशुल्क सीतेचा पत्न्यर्थ रामानें अंगीकार केला. वयोवृद्धीबरोबर रामाची गुणवृद्धिही होत होती. देशकाल पाहून कोठें कसे वागावे, हे त्यास चांगलें समजत असे. त्याची स्मरणशक्ति वाखाणण्यासारखी होती. प्राकृतमिश्रित संस्कृत नाटकें आदिकरून त्यानें वाचली होती. राज्यकारभाराचें सर्व शिक्षण त्याला मिळाले असून त्याचे खासगी आचरण सरळ, सत्याला धरून व विनययुक्त असे. दुसऱ्यास दुःख झालें असतां त्यास अत्यंत दुःख होई, असा त्याचा स्वभाव असे. अशा गुणवान् पुत्रास राज्याभिषेक करून पुष्कळ वर्षे राज्यधुरा वाहिल्यानें थकलेल्या दशरथास विश्रांति घेण्याची मनीषा झाली. परंतु भरतास राज्य मिळत नाहीं, एवढ्यावरून उत्पन्न झालेल्या कैकेयीच्या मत्सरामुळें रामास चौदा वर्षे वनवास काढणे भाग पडलें. दशरथानें कैकेयीस पूर्वी दोन वर देऊं केले होते, ते त्या दुष्टबुद्धि स्त्रीनें त्या संधीस मागितले. आपल्या पित्यास आपण दिलेलें वचन राखतां यावे, व सत्यापासून भ्रष्ट होण्याची

त्याला पाळी येऊं नये, म्हणून त्या पितृभक्तिपरायण पुत्रानें वनांत जाण्याचें मोठ्या खुषीनें कबूल केलें. ह्याचें नांव पितृभक्ति व सत्यनिष्ठा !

वनांत जाण्याच्या पूर्वी सीतेला भेटण्याकरतां तिच्याकडे राम गेला. त्या वेळेस त्यानें आपल्या भार्येला एखाद्या व्यवहारज्ञ मनुष्याप्रमाणें मोठ्या शहाणपणाचा व धूर्तपणाचा उपदेश केला आहे. घटकाभर राम ही काल्पनिक व्यक्ति मानली, तरी काव्यकाराच्या चाणाक्षपणाविषयीं कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं. तो उपदेश असा,—" ओसाड वनांत जावयास निघालेला मी तुला भेटण्याकरितां आलों आहें. भरत जवळ असतांना त्याच्यासमक्ष माझे गुण केव्हांही गाऊं नको. कारण संपन्न स्थितींतल्या पुरुषांना दुसऱ्याची केलेली प्रशंसा सहन होत नाहीं. माझी किंवा माझ्या स्वरूपाची वाखाणणी कोणाजवळ तूं कधींही करूं नको. कारण, त्याच्या योगानें भरताविषयीं प्रतिकूल ग्रह केल्यासारखें होईल. मी वनांत गेल्यावर उपवास व व्रतें करून तूं कालक्रमण कर. प्रातःकाळीं उठून यथाविधि देवाची पूजा केल्यावर माझा पिता जो दशरथ त्याला नमस्कार करीत जा, आणि माझ्या दुःखी मातेचा नेहमीं मान राखीत जा. " अशासारख्या व्यावहारिक उपदेशाची हल्लींच्या आमच्या विधवांना किती तरी आवश्यकता आहे. अशा प्रकारचे उपदेश ज्या पुराणांत सांपडतात, त्या पुराणांची योग्यता निःसंशय कमी नाही. परंतु आमच्या दृष्टीवरचें आवरण अद्यापि निःशेष गेलें नाहीं. ते जाईपर्यंत पुराणांची उपयुक्तता आमच्या

मनांवर ठसावी तशी ठसणार नाहीं. सुमंत्राबरोबर रामानें आपल्या आईला वनांतून जो निरोप पाठविला, तोही वरच्यासारखाच धूर्तपणाचा आहे. राम म्हणतो—" माझ्या आईला सांग की, मी राजाची वडील बायको आहें हा गर्व सोडून, राजाच्या इतर स्त्रियांशी आपलें वर्तन ठेव. एवढेंच नव्हे, तर राजा जिचें ऐकतो त्या कैकयीलाच मान दे."

वनवासाचे क्लेश सहन करणें भाग पडून राज्यपद हातचें गेलें व भरताला तें प्राप्त झाले, ह्याबद्दल रामाला वाईट वाटलें नाहीं, व त्याचा त्यानें मत्सरही केला नाहीं. अयोध्येहून निघते वेळीं तद्वासी पौरांना त्याने केलेल्या उपदेशावरून त्याच्या निष्कलंक मनाची अटकळ होते. तो उपदेश असा.—" अयोध्यावासी जनांची जशी प्रीति मजवर आहे व मला ते जसा मान देतात, तशी प्रीति व तसाच मान, किंबहुना त्याहीपेक्षां विशेष, त्यांनी भरताला द्यावा. भरताचे वर्तन शुद्ध आहे. तुम्हांला प्रिय व हितावह असेल तेच तो करील. भरत वयानें लहान आहे, तरी पण तो ज्ञानसंपन्न, मृदुभाषी, शूर व गुणवान् असून योग्य रीतीनें राज्यकारभार करण्यासारखा आहे." ह्यावरून उघड दिसते की, कैकेयीच्या दुष्ट कृतीने संतापून जाऊन रामाने भरताविषयी आपलें मन कलुषित होऊं दिलें नाहीं.

उच्चनीच कशीही स्थिति येवो; प्रसंग येईल तो स्वावलबनानें पार पाडतां येण्यासारखें शिक्षण त्या राजपुत्रांना मिळाले होतें. अरण्यमार्ग आक्रमीत असतां वाटेत नदीनाले लागल्यास त्यांपली-

कडे जाण्याकरितां जंगलांतली लांकडें आणून, तराफा बनवून राम-लक्ष्मण पैलतीरी जात असत. अरण्यांत निरनिराळ्या ठिकाणीं वस्तीकरितां पर्णकुटिका ते स्वतः बांधीत, व जटायूसारख्या आप्ताचें देहावसान झालें असतां त्याचा अंत्यविधि स्वतः मन्त्रोक्तरीतीनें उरकून टाकीत. ह्यावरून प्राचीन कालच्या लोकांना व्यावहारिक व व्यापक शिक्षण किती मिळत असे, व कोणत्याही स्थितीत तदनरूप होण्यास ते किती लायक असत, ह्याची कल्पना करितां येईल.

---

## पाठ २५ वा.



## रामरसाचे दोन घुटके !

### भाग २ रा.

रामाच्या ठिकाणी जे अनेक गुण होते त्यांपैकी सीतेच्या ठिकाणीं अनन्य अनुराग हा एक होय. ह्या पतिपत्नींचे एकमेकांवर निःसीम प्रेम होतें व त्याबद्दल एकमेकांची पूर्ण खात्री होती. रावणाने सीता-पहार केल्यावर रामाला शोकानें कसे विव्हल केले होते, हें सर्वांस माहीत आहे. सीतेसाठी हळहळणाऱ्या व तत्प्राप्तीसाठी आतुर झालेल्या रामाचें वर्तन, युद्धांत रावणाचा पराभव होऊन सीता फार दिवसांनीं भेटल्यावर, फारच निराळ्या प्रकारचे होतें. आनंदांत मग्न होऊन सीतेचा अंगीकार एकदम न करितां तो फार सावध-पणानें वागला. त्याची मुद्रा गंभीर झाली. पत्नीप्रेमाला वश होऊन

त्यानें विवेकशक्तीला सोडिलें नाही. बिभीषण सीतेला घेऊन आला, तेव्हां जवळ असलेल्या लोकांना एकीकडे सारण्याची एकच गर्दी उडाली. सीतेच्या मार्गावर व आसपास कोणींही फिरकूं नये, म्हणून वेत्रधारी शिपाई इतस्ततः छडी फिरवीत फिरूं लागले. पण दुसऱ्यांना विनाकारण यत्किंचितही त्रास पोहोंचूं नये, अशी इच्छा बाळगणाऱ्या रामाला हे सहन कसे व्हावे? लोकांना तेथून घालवून दिल्यामुळें, त्यांच्या ठिकाणीं भीति उत्पन्न झालेली पाहून, तें सहन न होऊन व सभ्यपणाला तें अनुचित आहे असे वाटून रामाने त्या गोष्टीचे निवारण केले, व बिभीषणाला तो जरा टोचून बोलला. "मला विचारल्यावांचून तुम्ही ह्या लोकांना त्रास कां देतां? त्यांना उद्विग्न करूं नका. हे लोक माझेच आहेत." असे त्यानें उद्गार काढिले.

पुढें राम म्हणतो:— "गृहें, वस्त्रें किंवा प्राकार ह्यांनीं स्त्रियांचे आवरण होत नाहीं. त्यांचे शुद्धाचरण हेच त्यांना आवरण होय. संकटांत, युद्धांत, यज्ञभूमीवर, अथवा लग्नांत स्त्रिया पुरुषांच्या दृष्टीस पडल्या तरी त्यांत दोष नाही. पालखी सोडून सीतेला पायांनीच मजकडे येऊं द्या." पुढें सीता जवळ आली. परंतु पूर्वी प्रेमळ व पत्नीचे कुतूहल पुरविण्यांत तत्पर असलेला भर्ता ह्या क्षणीं कठोरचित्त झालेला तिने अवलोकिला; व खालीं लिहिल्याप्रमाणें रामानें तिला उच्चारलेले शब्द ऐकून तर तिला फारच दुःख झालें. रामानें तिला सांगितलें:— "स्नेह्यांच्या शौर्याने सफल झालेला हा युद्धाचा खटाटोप जो मीं केला तो तुझ्याकरितां नव्हे, हें तू पक्के

समज. बायकोला पळवून नेणाराचे ह्याला शासन करितां येत नाहीं, असा अपवाद मला लागूं नये, एवढ्याकरितां मी ह्या युद्धाच्या भरीस पडलो. तुझ्या चरित्राविषयीं संशय उत्पन्न झाल्यामुळें, नेत्ररोग झालेल्या मनुष्याला जसा दिवा सोसत नाही, तसा प्रकार तुझ्याविषयीं माझा झाला आहे. म्हणून वाटेल तिकडे तूं जा. माझी तुला परवानगी आहे. तुझ्याशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं." ह्यावरून हें उघड होतें कीं, रामाचे मन जितकें प्रेमळ होतें, तितकेंच निश्चयी होतें. पण सीता तरी रामाचीच बायको. तिला आपल्या निर्दोष वर्तनाची खात्री होती. आतां ही लज्जेची वेळ नाही असें पाहून तिनेंही रामाला बाणेदार उत्तर दिलेः—" एखादा असंस्कृत मनुष्य आपल्या असंस्कृत पत्नीला बोलतो तद्वत् हे कठोर, कानांला कटू लागणारे व अनुचित वाक्य मला कां ऐकवितां ? मला आपण समजतां तशी मी नाहीं, असें खास समजा, हे मी आपल्या चारित्र्याची शपथ घेऊन सांगत्ये." एवढेंच म्हणून ती राहिली नाही. रामाच्या व जमलेल्या सर्व लोकांच्या समक्ष, "माझें आचरण जर निष्कलंक असेल, तर सर्वसाक्षी अग्नि माझें संरक्षण करो." असें म्हणून तिनें प्रदीप्त केलेल्या अग्नीत प्रवेश केला. परंतु अग्निज्वालांनी तिचा देह भडकून न जातां विभावसूनें तिला आपल्या अंकावर घेऊन रामाच्या स्वाधीन केले. तेव्हां हिच्या ठिकाणीं पापाचा लवलेश नाहीं, अशाविषयीं रामाची खात्री झाली. रावणाच्या अंतःपुरांत दीर्घकाळ राहणाऱ्या सीतेचा एकदम अंगीकार केला असतां बालिशत्वाचा आरोप येईल, तो चुकवावा, म्हणून रामानें वरील

प्रकार केला. ज्या राजनीतीच्या शिक्षणानें लोकमताला मान देणारे राजे पूर्वी निपजत, त्या राजनीतितत्त्वांची प्रशंसा करावी तेवढी थोडीच.

तथापि, एवढ्याच प्रसंगाने सीतेचें संकट टळले नाहीं. चौदा वर्षे वनवासांत काढून, रावणाचा पराभव केल्यानंतर सीतेसह राम राजधानीत परत आल्यावर, राज्य चालवीत असतां सीतेविषयीं लोकांची कुजबूज त्याच्या कानांवर आली. तेव्हां रामाचें मनसुद्धां उद्विग्न झाले; आणि सीतेचा त्याग करण्याचा त्यानें निश्चय केला. " लोकापवादाच्या भीतीने मी आपल्या प्राणांचाही त्याग करीन, मग सीतेची कथा काय ? " असा विचार करणाऱ्या रामानें हा आपला अभिप्राय त्रिवर्ग बंधूंस कळविला; व सीतेला वाल्मीकीच्या आश्रमाच्या आसपास सोडून देण्याची आज्ञा त्यानें लक्ष्मणाला केली. ज्या काली प्रजाजनांकरितां आपल्या आवडत्या भार्येसही सोडून देण्यास राज्यकर्ते तयार असत, त्या कालच्या राज्यव्यवस्थेच्या प्रशसनार्थ ज्यास्त लिहिण्याची आवश्यकता नाहीं. रामाच्या अशा वर्तनाबद्दल जे सानंद आश्चर्य वाटते, त्याहूनही ज्यास्त आश्चर्य सीतेला सोडून लक्ष्मण परत फिरतांना त्याच्याबरोबर तिनें जो निरोप रामाला पाठविला, तो वाचून वाटतें. " भावांबरोबर जसें आपले वर्तन आहे तसेंच प्रजाजनांबरोबर सदोदित असो. हाच श्रेष्ठ धर्म आहे. ह्याच्यापेक्षां दुसरी उत्तम कीर्ति नाही. पौरजनांच्या ठिकाणी धर्मानें वागणाऱ्या आपणांला पुण्य प्राप्त होवो. माझ्या शरीराला क्लेश होतील त्यांविषयीं मी दुःख बाळगीत नाहीं. " आपल्यामुळें

आपल्या पतीला अपवाद लागण्याची भीति आहे, म्हणून खुबीनें व धैर्यानें पतीचा वियोग सहन करणाऱ्या स्त्रिया फारच क्वचित् सांपडतात. आपल्या त्यागाचें कारण लक्ष्मणाचे तोंडून ऐकल्यावर रामाला पाठविलेल्या वरील निरोपावरून सीतेच्या समयसूचकतेची तारीफ केल्याशिवाय राहवत नाही.

वरील विवेचनावरून राम धार्मिक, प्रजाहितदक्ष, सरळ मनाचा, कोमल अंतःकरणाचा व दृढनिश्चयी होता, हे दिसून येईल. त्याचप्रमाणें तो दूरदर्शी व मनुष्यस्वभावाची पारख करणारा होता. तो जरी साधा होता, तरी एकदम फसून जाण्यासारखा भोळा नव्हता. दशरथाच्या मरणानंतर राम वनवासांत असल्याकारणानें भरत राज्यकारभार पहात होता. चौदा वर्षे राज्यलक्ष्मीचा उपभोग घेतल्याने न जाणो कदाचित् भरताच्या स्वभावांत विपर्यास झाला असेल, असे मनांत येऊन वनवासांतून परत आल्यावर अयोध्यानगरींत शिरण्याच्यापूर्वी रामानें हनुमंताला भरताचा अभिप्राय जाणण्याकरितां पुढें धाडिलें. त्यानें मारुतीला सांगितलें कीं, " मी आलो आहे असें भरताला समजल्यावर त्याची मुद्रा कशी होते, व माझ्यासंबंधाने एकंदर त्याची वागणूक कशी आहे, तें सर्व पाहून ये. त्याचप्रमाणें तोंडावरून, दृष्टीवरून व भाषणावरून भरताच्या मनांतला अभिप्राय जसा असेल, तसा काढून मला कळीव. कारण, सर्व वासना परिपूर्ण होत असून, हत्ती, घोडे, रथ ह्यांची अनुकूलता असून व वडिलार्जित राज्य प्राप्त झालें असून कोणाचें मन बदलणार नाहीं ? जर कदाचित् कैके-

यीच्या संगतीनें स्वतः राज्य करण्याची भरताला इच्छा झाली असेल, तर त्याला राज्य करूं दे. " या उताऱ्यांत रामाचा शहाणपणा व स्वार्थत्याग हे दोन्ही दिसून येतात.

रामानें ह्या जगांत किती वर्षे घालविलीं, हें निर्णयात्मक ठरविणें कठिण आहे. परंतु रामचरित्रांतील गोष्टींवरून परिगणन करितां रामाचें वय मरणसमयीं एक्याण्णव-ब्याण्णव वर्षांचे असावें, असें अनुमान करण्यास प्रत्यवाय नाहीं. रामराज्यांत लोक सुखी होते तसे अन्यत्र केव्हांही नव्हते.

**ना० गो० चाफेकर.** ग्रंथमाला.

---

## पाठ २६ वा.



## दुर्दैव.

जगाच्या स्थितीवरून असें दिसते कीं, आपणास वाटतील तशा गोष्टी घडून याव्या, असे करणे मनुष्याच्या स्वाधीन नाहीं. कधीं कधी मोठमोठ्या साधूवरदेखील अनिवार्य संकटे येतात. याविषयीं बहुतांनीं बहुत प्रकारचे तर्क केले आहेत. कोणी म्हणतात कीं, हें पूर्वजन्मार्जित पातकांचें फळ होय. जे पूर्वजन्म मानीत नाहींत, ते म्हणतात कीं, मनुष्य हा स्वर्गसुखास पात्र झाला किंवा नाहीं, याविषयीं त्याच्या अंतःकरणाची परीक्षा पाहण्याकरितां ईश्वर त्यावर अशीं संकटें आणितो. यांपैकीं काय खरें असेल तें असो,

त्याविषयीं येथे लिहीत नाही. कारण, असे प्रसंग बहुशः फारच थोडे असतात. लक्षपूर्वक पाहिलें असतां असे दिसून येईल कीं, आपल्या दुराचरणामुळें विपत्ति प्राप्त झालेल्या मनुष्यांचीं पुष्कळ उदाहरणें सांपडतील. एखाद्या मनुष्यास दुखणें येऊन जरा प्रकृति बिघडली कीं, तो लागलाच दैवास दोष लावूं लागतो. दुसऱ्याचा हेवा करितो; व देवाच्या घरीं न्याय नाहीं, असेंही म्हणतो. अशा मनुष्याला प्रकृति बिघडण्याच्या कारणाविषयीं प्रश्न केला असतां, 'हल्लींचें दुखणे येण्यासारखे माझ्या हातून आजपर्यंत कांहीं एक वाईट कृत्य झालें नाहीं, हा केवळ ईश्वरी क्षोभ होय,' असें त्याच्याने प्रामाणिकपणाने छातीवर हात ठेवून सांगवेल काय? आरोग्यरक्षणास आवश्यक अशा आहारविहारांच्या नियमांनीं तो वागता, तर त्याच्यावर असा प्रसंग आला असता काय? यथेच्छ आहारविहार करून अशी स्थिति प्राप्त झाली, तर त्यानें दैवास कां दोष लावावा? आणि ईश्वरास कां अन्यायी म्हणावें? रोग व विपत्ति हीं ज्यांस प्राप्त झाली आहेत, अशा मनुष्यांच्या स्थितीचा शोध केला असतां असें कळेल की, बहुतेकांस आळस, अधाशीपणा, दुर्व्यसन, वगैरे गोष्टींपासून अशी स्थिति प्राप्त झाली यांत संशय नाहीं. हजारों रोगी व दुःखी पाहिले असतां केवळ नशिबानें ज्यांस अशी वाईट स्थिति प्राप्त झाली आहे, असे फारच थोडे सांपडतील. अल्पवयांतच कित्येकांचीं मुखें टवटवी जाऊन म्लान झालेलीं, कित्येकांस ऐन उमेदींतच क्षयाची भावना झालेली, असे लोक दृष्टीस पडतात. पण बहुशः हीं सर्व दुःखे त्यांनी मूर्खपणाने

व दुराचरणाने अपणांस प्राप्त करून घेतलेलीं असतात. असें असूनही ते ईश्वरास दोष देतात.

कित्येक शरीरानें दृढ असतात; पण अठरा विस्वे दारिद्र्य त्यांच्या पाठीस लागलेलें असतें. नेहमीं ज्या त्या कामांत निराश होतात; बरकत येत नाहीं. अशा मनुष्यांनीं पूर्वीपासून आपल्या आचरणाचा विचार केल्याशिवाय एकाएकीं दैवास दोष देऊं नये. आळस, गर्व, राग, दुर्व्यसन यांच्या योगानें त्यांनीं आपला कल्याण करून घेण्याचा काल कधींच घालविला नसेल काय? आपण मौजा मारून काळ घालवावा आणि लोक श्रमानें व सदाचरणानें वागून आपणांपेक्षां अधिक सुखी झाले म्हणजे नशिबास दोष लावावा, हा केवढा मूर्खपणा आहे! सर्वांशीं नसलें, तरी बहुतांशी आपलें कल्याण करून घेण्याचें मनुष्याच्या स्वाधीन आहे. एका कवीनें म्हटले आहेः—

**यात्यधोधो व्रजत्युच्चैर्नरः स्वेनैव कर्मणा।**
**कूपस्य खनिता यद्वत्प्रासादस्येव कारकः॥**

**अर्थः**—मनुष्य आपल्या कर्मानेंच उच्च किंवा नीच स्थितीस जातो; जसे विहीर खणणारा खणीत खणीत खालीं खाली जातो, आणि वाडा बांधणारा मजल्यावर मजला चढवीत वर जातो.

मनुष्याचा कांहीं एक दोष असल्याशिवाय जगांतील सर्व वस्तु त्यास प्रतिकूल होतील असें कधीं व्हावयाचें नाहीं. ईश्वरभक्ति, सदाचरण, उद्योग, सत्स्वभाव, जितेंद्रियता, सदसद्विचार, प्रामा-

णिकपणा, हीं सुखप्राप्तीचीं निश्चित साधनें आहेत. जे मनुष्य विपत्तींत असतात त्यांच्या अंगीं वरील गुण नसतात, एवढेंच त्यांच्या दुःखाचें मूळ कारण होय. आपला अपराध दुसऱ्यावर घालावा, हा मनुष्याचा स्वभाव आहे. याकरितां ज्या वेळेस दुसरा कोणी सांपडत नाहीं, त्या वेळेस दैवास दोष लावावयाचा. मनुष्य प्रथम सदसद्विचार सोडतो, तो सुटल्यावर दुराचरण करितो, तें केलें म्हणजे दुःख प्राप्त होतें, आणि असें झाले म्हणजे मग ईश्वरास दोष लावून आणखी पाप करितो. सुख प्राप्त झालें म्हणजे तेंमात्र आपल्या शहाणपणानें असे समजावयाचें; दुःख होईल तेवढेंमात्र ईश्वरानें दिलें असे म्हणावयाचें. वास्तविक पाहतां उलट स्थिति आहे. सुखमात्र ईश्वराच्या कृपेनें प्राप्त होते आणि दुःख आपल्या दुराचरणानें होतें.

वर सांगितलेल्या गोष्टी केवळ व्यक्तीस लागू आहेत असें नाहीं; राष्ट्रांचेंही तसेंच आहे. हाडवैर पडून अनेक लढाया होऊन देशांचे देश धुळीस मिळतात. मोठमोठालीं सैन्यें परस्परांच्या आंगांवर जाऊन रणभूमीवर रक्ताच्या नद्या उत्पन्न करितात! शिव शिव! काय अनर्थ हे! हे अनर्थ ईश्वर आणितो असें म्हणतां येईल काय? लाखो माणसें मरून रक्ताच्या नद्या वाहविण्यास ईश्वरानें एखाद्या शांत सुपीक देशावर सैन्य पाठविलें आहे काय? मनुष्यांच्या दुर्गुणांशिवाय या अनर्थांस दुसरें काय कारण आहे? राजांची महत्त्वाकांक्षा, प्रधानांचीं भांडणें, धर्माचा खोटा अभिमान बाळगणाऱ्यांचा मतलबीपणा, वगैरे गोष्टींनीं जगांत किती अनर्थ

झाले आहेत? अशा गोष्टींस ईश्वरी क्षोभ म्हणणे हें किती वेडे पणाचे काम आहे? मनुष्ये सदाचरणाने वागतील, तर हे अनर्थ जगांतून नाहीतसे होतील. याकरितां दुःख झालें असतां ईश्वरास दोष न देतां, त्यावर भरंवसा ठेवून सदाचरणानें वागावें, हाच सुखाचा उत्तम मार्ग होय.

**गोविंद शंकरशास्त्री बापट** गद्यरत्नमाला

---

## पाठ २७ वा.



### ज्यानें त्यानें आपल्या ऐपतीप्रमाणें वागावें.

आपणांस लोकांनी गरीब समजू नये, श्रीमत समजावे, म्हणून पुष्कळ लोकांचा उद्योग नेहमी सुरू असतो. लोकांनीं आपणांस गरीब म्हणावे, याची त्यांस लाज वाटते. ते श्रीमंत लोकांप्रमाणें पोशाख, सामानसुमान, नोकरचाकर, यांप्रीत्यर्थ बराच खर्च करितात. हे करणे वाईट आहे. ज्याने त्यानें आपल्या ऐपतीप्रमाणें राहणे योग्य आहे. जवळ पैसा असतां पोटाला चिमटा घेऊन आपले व आपल्या मुलांबाळांचे हाल करणे, व सत्कार्याकडे पैसा खर्च करण्याविषयीं पराङ्मुख असणे, हें वर्तन जितकें वाईट आहे, तितकेंच जवळ पैसा नसतां अथवा ऐपत नसतां कर्ज काढून श्रीमंतीचा डौल घालणें वाईट आहे. पुष्कळ जहागीरदार, इनामदार व शेटसावकार, जवळ पैसा नसतांही, आपण आपल्या

इतमामाप्रमाणें थाटामाटानें वागलों नाहीं, तर लोक आपणांस नांवें ठेवितील, या भयानें खर्च करीत गेले व शेवटीं भिकेस लागले. ज्या ठिकाणीं आपण थाटानें दिवस काढिले, तेथें भिकाऱ्यासारखें राहण्याचा प्रसंग येईल व लोक आपणांस पूर्वीप्रमाणे मान देणार नाहींत, या भयानें कांहींनीं देशत्याग केल्याची व कांहींनी आत्म-हत्या केल्याचीं उदाहरणें सांपडतात. त्याप्रमाणेच पुष्कळ साधा-रण लोकांची गोष्ट आहे. आतां अशा वर्तनाबद्दल या लोकांस सर्वांशीं दोष ठेवितां येत नाहीं; कारण, " सर्वे गुणाः कांचनमा-श्रयन्ते " असा पुष्कळांचा समज असल्यामुळें लोकांस श्रीमंतीचा डौल घालण्याविषयीं इच्छा होते. हा समज वस्तुतः चुकीचा आहे. फक्त संपत्ति आहे एवढ्या कारणावरून एखाद्यास ज्यास्त मान मिळावा, व त्याजवळ पैसा नसला म्हणजे त्याचा अपमान व्हावा हें ठीक नाहीं. मनुष्याचे आचरण कसे आहे हें पाहणें जरूर आहे. असो. या समजामुळे हजारो लोकांचा नाश झाला आहे. खरी श्रीमंती असणे हे जरी चांगले आहे, तरी लोकांनीं आपणांस गरीब म्हटलें म्हणजे त्याबद्दल लाज वाटण्याचें कारण नाहीं. आपण खरोखर गरीब असून अथवा आपल्या ऐपतीप्रमाणें रहात असून, जर लोक आपणांस कमी समजतील, तर खुशाल समजोत. परतु श्रीमंतीचा डौल घालण्यासाठीं निरुपयोगी सामान घेणे, उचापत करणे, याचें पागोटें त्याचे डोक्यावर, त्याचें पागोटें याचे डोक्यावर असला घाणेरडा रोजगार करणें, लग्नकार्यांत फाजील खर्च करणें, काटकसर करून आपल्या म्हातारपणासाठीं

व मुलांबाळांचे सोयीसाठीं दोन पैशांचा संग्रह न करितां आपणांस व आपल्या मुलांस भिकेस लावणें हें चांगलें, किंवा लोकापवादास न भितां खऱ्या सुखावर नजर ठेवणे चांगले? लोकांनीं आपणांस श्रीमंत म्हणावें एवढ्याचसाठी ज्या मनुष्यांची खटपट असते, त्यांस पुष्कळ उलाढाली कराव्या लागत असतील हें उघड आहे. असल्या लोकांचे हातून आपलें कर्तव्य योग्य प्रकारें होण्याचा कमी संभव असतो. यांचे आचरण नेहमीं शुद्ध राहणें कठिण आहे. ही स्थिति वाईट आहे, हे कोणीही कबूल करील. यासाठीं जी आपली खरी स्थिति आहे तिजप्रमाणें वागणे ही उत्तम गोष्ट आहे.

"जो मनुष्य आपल्या श्रमांच्या मिळकतीवर अथवा जवळ जो दोन पैशांचा अर्थ आहे, त्यावर साधारणपणें चांगला चरितार्थ करितो, व वस्त्रप्रावरणाचे संबंधानें दैन्य दिसूं न देतां बेतानें राहतो, त्यास गरीब म्हणूं नये." असे जें बर्कसाहेबांनीं म्हटलें आहे, तें पुष्कळ अंशीं खरें आहे. कारण, असला मनुष्य मुंबईंतील 'लक्षाधीश' यांचे मानानें गरीब असो, परंतु वस्तुतः तो गरीब नाहीं. गरिबीविषयीं पुष्कळ लोकांची समजूत चमत्कारिक आहे. त्यांच्या गरजा खरोखरीच्या नसून काल्पनिक असतात. आपल्या बायकोची शुश्रूषा करण्यासाठीं कुणबीण असणें, आपली बरदास्त ठेवण्यासाठीं नोकर असणें, राहण्यासाठीं बंगलेवजा घर असणें, लग्नसमारंभासाठी शालजोड्या, पितांबर व चांदीचीं भांडीं यांचा संग्रह करून ठेवणें, बसावयासाठीं टांगा

चाळगणें, खाण्यापिण्याला गोडगोड पदार्थ असणें, बायकोपोरांचे अगांवर अलंकार असणें, तऱ्हेतऱ्हेचे पोषाख असणें, या व अशाच-सारख्या दुसऱ्या गोष्टी, या खरोखरीच्या गरजा नसून, पुष्कळ लोकांचे स्थितीचा सारासार विचार पाहतां, काल्पनिक गरजा होत. या गोष्टींवांचून खरोखर अडत नसून त्यांकडे पुष्कळांचा ओढा असतो. ज्यांपाशीं पुष्कळ संपत्ति आहे त्यांनीं वाटेल तर या गोष्टी खुशाल कराव्या. परंतु ज्यांस ऐपत नाहीं त्यांनीं, किंवा ज्यांची ऐपत बेताबाताची आहे त्यांनीं, असल्या गोष्टींनीं आपलें मन भ्रमण होऊं देणें व नसती काळजी विकत घेणें हें वेड आहे. अशा लोकांनीं आपल्या ऐपतीप्रमाणें राहणें योग्य आहे. नुसता देखावा उपयोगी नाहीं. जवळ पैसा असून दैन्य दाखविणें हें जसें चांगलें नाहीं, तसें जवळ पैसा नसून नुसत्या देखाव्यासाठीं कर्ज-बाजारी होणें योग्य नाहीं. पोकळ डामडौल करण्यानें आपण आप-लाच नाश करून घेतों; इतकेंच नाहीं, तर दुसऱ्यासही आपण बुडवितों. आपली ऐपत अगदींच बेताची आहे, असें सावकारास समजलें असतां तो आपणांस कर्ज देण्यापूर्वीच चांगला विचार करील. जोंपर्यंत आपली खरी स्थिति सावकारास कळली नाहीं, तोंपर्यंत तो आपल्या देखाव्यास पाहून पैसे देईल. हे पैसे आपण उडवून टाकिल्यामुळें व सावकाराची फेड करण्यास सामर्थ्य नस-ल्यामुळें अर्थातच सावकार बुडणार. यासाठीं ज्यानें त्यानें विशेष खबरदारी ठेविली पाहिजे. पोकळ श्रीमंती दाखवून मान मिळवि-ण्याचा हेतु धरणें बरें नाहीं. लोकांनीं आपणांस रावसाहेब म्हणावें

एवढाच पुरुषार्थ समजूं नये. ऐपत नसतां रावसाहेब म्हणवून घेण्याची संवय लागली असतां, त्याप्रमाणें कांहीं आचरण करावें लागते; प्रपंचांतील साधारण गोष्टी करण्यास लाज वाटूं लागते. या गोष्टीचा विचार केला पाहिजे. जन्मास येऊन रावसाहेब म्हणवून घेणें एवढाच हेतु सिद्धीस न्यावयाचा नाहीं; खावें, प्यावें, मजा मारावी, हींच जन्माची सार्थकता नाही; जन्मास येण्याचे दुसरे पुष्कळ हेतु आहेत; त्यांवर नजर ठेवून वागलें पाहिजे; श्रीमंतीचा पोकळ डौल न घालितां ऐपतीप्रमाणें राहिलें पाहिजे.

विविधज्ञानविस्तार.

---

## पाठ २८ वा.



### थोरांचे वंशज.

या (देहू) गांवीं तुकारामबोवांच्या वंशजांची सुमारें पंचेचाळीस घरें आहेत. ह्या देवस्थानाचे दरसाल पांचसहा हजार उत्पन्नाचे तीन गांव आहेत. त्यांपैकीं एका गांवचें उत्पन्न ह्या निरनिराळ्या वंशजांमध्यें वांटलें जाऊन बाकीचें उत्पन्न देवाची व उत्सवाची व्यवस्था नीट चालावी, म्हणून एकाच घराकडे लावून दिलेलें आहे. हे लोक शेतवाडी करून असतात. त्यांपैकीं

कांहींमात्र भगवद्भक्तीचे मार्गांत आहेत, परंतु बेतानेंच. कांहीं कांहीं तेथें येणाऱ्या यात्रेकरूंचे " निवद " घालून व भक्तमंडळी-कडून पैसे घेऊन आपली उपजीविका करितात, व कधी कधी बाहेरगांवींही फिरावयास जाऊन आपल्या शिष्यवर्गापासून पैसे मिळवून आणितात. एकंदरीनें, ह्या लोकांची स्थिति समाधानकारक नाहीं. त्या वंशांतील पूर्वीचें वारें गेले. हें पाहून चित्तास जरा उद्वेग वाटतो, व असा विचार येतो कीं, ज्याचा तो; ज्याचे त्याच्या-बरोबर जातें; मागें रहातें तें अस्सलाची नक्कलदेखील शोभणार नाहीं. याचे कारण काय, याचा प्रत्येकानें विचार करावा. हा अनुभव एकासंबंधानेंच नव्हे, तर हा सार्वत्रिक आहे, असे म्हण-ण्यास पुष्कळ पुरावा मिळेल. श्रीमच्छंकराचार्यादि आचार्य, श्रीशिवाजीमहाराजांसारखे राजे, रामदास व तुकाराम यांसारखे साधु व असे अनेक थोर पुरुष यांची जी पुढे परंपरा चालली तिच्यामध्यें त्यांच्या योग्यतेचे किंवा निदान त्यांच्या नांवास शोभण्यासारखे असे किती पुरुष उत्पन्न झाले हें पाहूं गेलें, तर निराशाच झाली पाहिजे; कारण त्यांची संख्या फारच अल्प आहे. यावरून असें वाटतें कीं, हीं जीं दिव्यपुरुषरत्नें सुदैवानें आपल्या दृष्टीस पडतात, तीं श्रेष्ठ दैविक स्फूर्तीनें प्रेरित झालेलीं असतात. त्या कालास अवश्य अशी कामगिरी करण्याकरितां त्यांची योजना झालेली असते. ह्या नरपुंगवांची उत्पत्ति करण्यामध्यें ' यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भ-वति भारत ' आणि ' परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ' या दोन श्लोकार्धांतील वचनांची परिपूर्णता करावी, असा परमे-

श्वराचा हेतु दिसून येतो. यांच्या अंगचें सामर्थ्य इतरांच्यापेक्षां शतपटीने अधिक असतें. आपल्या अवताराचा हेतु काय, व आपण कोणते विशिष्ट काम करण्यासाठी आलों, हें त्यांस पूर्णपणें अवगत असून त्याच धोरणानें त्यांचे सर्व प्रयत्न चाललेले असतात. सुखाच्या पाशांत ते कधींच सांपडत नाहींत. शरीराचे चोचले करणें व विषय-सुखाच्या भजनीं लागणें, हें तर त्यांस विषतुल्य वाटतें. याचे कारण इतकेंच की, या गोष्टी आपल्या इष्ट कार्याच्या आड येतील व त्यामुळें त्याचा बिघाड होईल, हें त्यांनीं पूर्णपणे जाणले असतें. ते इतके निग्रही व निश्चयी असतात की, विघ्नांस त्यांच्या प्रयत्नांस ह्मणून पाडतां येत नाही, निराशेस त्यांचा धैर्यमेरु हालवितां येत नाही, व क्लेशांस त्यांच्या वृत्तीची चलबिचल करून त्यांचे चित्त-स्वास्थ्य हरण करितां येत नाही. किंबहुना, प्रत्यक्ष मृत्युदेखील त्यांस जेरीस आणण्यास असमर्थ आहे. लोहचुंबकाप्रमाणे यांचे अंगीं तीव्र आकर्षणशक्ति असल्यामुळे हे प्रत्यक्ष आत्मिक लोह-चुंबक होत. यांना लोकांत चेतना कशी उत्पन्न करावी व त्यांचे अंगीं सामर्थ्य कसें आणावें, हें फार चांगले माहीत असतें; यामुळे त्यांचें काम झपाट्याने चालतें व त्यांस यशही तसेंच येतें. परंतु हें सामर्थ्य ईश्वरीप्रसादावांचून येत नसल्यामुळे ज्यांचे ठिकाणीं त्याचा अभाव असतो, अशांची कृति अगदीं दुबळी व फिकी दिसते. अर्थात् त्यांचे हातून नांवाजण्यासारखा कांहीं कार्यभाग होत नाहीं. सारांश, असे दिव्य हिरे कधीं काळी निपजतात व आपल्या

आंगच्या दिव्य तेजोबलानें लोकांत अवश्य ती चेतना उत्पन्न करून आनंदानें निजधामास जातात.

परंतु सामान्य जनांच्या अज्ञानामुळे त्यांच्या आंगचा स्वार्थ-त्याग, त्यांच्या आंगचें वैराग्य, त्यांची योग्यता व मूढ जनांस मोक्ष-मार्गास लावण्याची त्यांची उत्कट इच्छा, हींदेखील त्यांच्याबरोबर नामशेष होतात. ही गोष्ट राष्ट्रोन्नतीस हितावह नाही; तर त्यांस गुरु करून यथाशक्ति त्यांचा कित्ता गिरविण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे; आणि या कामी जर आपण नेटानें व निष्ठेने वागलों, तर थोडाबहुत कार्यभाग करण्याचें सामर्थ्य ईशकृपेनें व त्यांच्या अनुग्रहानें आपणांमध्यें येईल यांत संशय नाही.

**गो. कृ. देवधर.** देहूची याला.

---

## पाठ २९ वा.



## मनाची एकाग्रता हीच कार्यसिद्धि.

सर्व राजपुत्रांना धनुर्विद्या व अस्त्रविद्या शिकवीत असतां अर्जुनाची बुद्धिमत्ता, ग्राहकशक्ति व चातुर्य पाहून द्रोणाचार्यांची त्याजवर विशेष मर्जी बसली. एकदां त्यांनी सर्व राजपुत्रांजवळ एकेक कमंडलु देऊन, तो पाण्यानें आधीं कोण भरून आणतो, याची परीक्षा पाहिली. कमंडलु पाण्यानें भरून आणण्यासाठीं सर्व राजपुत्र नदीवर गेले. परंतु अर्जुनानें वारुणास्त्राचा जप करून

कमंडलु तेथल्या तेथेंच एकदम पाण्यानें भरून गुरुजीपुढें ठेविला. एकदां भोजनाचे वेळी वाऱ्याने दिवा गेला असतां, अर्जुन तसाच अंधारांत जेवला. त्या वेळी त्याचे मनांत अशी कल्पना आली कीं, अंधारामध्ये आपला हात चुकूनही दुसरीकडे न जातां नेमका तोंडामध्यें जातो; हें जर केवळ दृढ अभ्यासाचेंच फळ आहे, तर आपण तितका दृढ अभ्यास केल्यास आपणास अंधारांत निशाणही मारतां येईल ! असा विचार करून त्या दिवसापासून अर्जुन रात्रीं अंधारामध्यें निशाण मारण्याचा सराव करूं लागला. हा अभ्यास करतां करतां त्यास शब्दवेधित्व प्राप्त झालें. पुढें एके दिवशीं द्रोणाचार्यांनीं एका कुशल कारागिराकडून कृत्रिम भासपक्षी तयार करून आणिला, व तो एका झाडाचे शेंड्यावर ठेविला. सर्व राजपुत्रांना बोलावून आणून प्रत्येकास, 'धनुष्य सज्ज करून, त्यास बाण लावून, दोरी ओढून, भास पक्ष्याचे डोक्यावर नेम धरून, दोन घटकापर्यंत तसाच उभा राहा, व मी बाण सोडण्यास सांगतांच बाण सोड,' असें त्यांनी सांगितलें. प्रथमतः युधिष्ठिर धनुष्य सज्ज करून व नेम धरून तितका वेळ उभा राहिल्यावर त्यास, 'आतां तुला हा वृक्ष, भासपक्षी, येथें उभे असलेले तुझे भाऊ व मी यांपैकीं कोण कोण दिसत आहेत?' असा द्रोणांनीं प्रश्न केला. त्यावर 'तुम्ही, माझे भाऊ, हा वृक्ष व भासपक्षी हे सर्व मला दिसत आहेत,' असें धर्मानें उत्तर दिलें. तें ऐकून हा पक्का शिष्य नाहीं, असें समजून त्यांनीं युधिष्ठिरास धनुष्य खालीं ठेवण्यास सांगि-

नलें. याप्रमाणें सर्वांचीही परीक्षा घेतल्यावर, सर्व जण तींत नापास ठरले. इतरांप्रमाणें अर्जुनासही शरसंधान करून उभा राहण्यास त्यांनीं सांगितलें. दोन घटका होतांच त्यांनीं अर्जुनाला तोच प्रश्न विचारला. तेव्हां ' मला तुम्ही, माझे भाऊ, हा वृक्ष किंवा भासपक्षी, यांपैकीं कांहींच दिसत नसून भासपक्ष्याचें डोकेमात्र दिसत आहे,' असें अर्जुनानें उत्तर केलें! हें उत्तर ऐकतांच हाच शिष्य खरा व यानेंच आपल्या श्रमांचें चीज केलें, असें द्रोणाचार्यांना वाटून त्यांनीं आनंदानें ' बाण सोड ' म्हणतांच, अर्जुनानें बाण सोडला; तों भासपक्ष्याचें शिर तत्काळ उडून जमिनीवर पडलें!

ही गोष्ट लहानच आहे; परंतु तीवरून पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. कोणत्याही कामामध्यें मनाच्या एकाग्रतेचें किती महत्त्व आहे, हें या गोष्टीवरून कळून येणार आहे. कोणतेंही महत्त्वाचें कृत्य हातीं घेतलें असतां त्या वेळीं दुसऱ्या चारपांच गोष्टींकडे लक्ष गेलें, तर कोणतीच गोष्ट धड पार पडत नाहीं. कोणत्याही एकाच गोष्टीमध्यें मन जर इतकें गढून गेलें, कीं तीवांचून इतरांचें अस्तित्वही भासलें नाहीं, तर त्या कामांत यशःप्राप्ति खात्रीनें व्हावयाचीच, हें तत्त्व या लहान पण खुबीदार गोष्टीवरून चांगलें लक्षांत येणार आहे.

**ह. गो. लिमये.** भारतीय युद्ध.

---

## पाठ ३० वा.



### थोरल्या बाजीरावांचा पुत्रांस उपदेश.

" जे लोक आपणांस आपल्या देशांतच कोंडून घेतात, कधीं बाहेर पडत नाहीत, ते सर्वदा जंगली, दरिद्री, अज्ञानी, दुःखी आणि अभागी राहतात, हें पक्कें समजावें. प्रवास करण्यांत पातकाचा लेश नाहीं. असत्य भाषण, असत्याचरण, अथवा दुसऱ्यांस विनाकारण दुःख देणें, असलीं कामेंमात्र वर्जावीं.

" उद्योगानें सर्व कांहीं साध्य होतें. नशिबावर हवाला ठेवून स्वस्थ बसूं नये. वेळ आणल्याखेरीज येत नाहीं. साखर ही कधीं कडू लागली आहे काय? अमक्या मुहूर्तावर खाल्ली असतां ती गोड व अमक्यावर खाल्ली तर ती कडू, असें कधीं घडत नाहीं. तसाच दृढ निश्चयपूर्वक चांगला उद्योग केव्हांही करावा. त्यापासून सुफळ प्राप्त झाल्याशिवाय रहावयाचें नाही, हें निःसंशय समजावें.

" ज्या मनुष्याला स्वदेशाभिमान नाहीं, तो जिवंत आणि मेला सारखाच समजावा. माझ्या एकट्याच्या हातून काय होणार आहे, असें रें रें करीत बसूं नये. 'दसकी लकडी एकका बोजा' हा न्याय लक्षांत ठेवावा. जोंधळ्याच्या एका कणसांत फार तर पसाभर धान्य असतें; पण अशा पसा पसा धान्याची जमवाजमव केली, तर राशींच्या राशी पडतात. तसेंच, एक एक जुळतां

जुळतां हजारों स्वदेशाभिमानी होतात, आणि त्यांपासून उत्तम फळ निष्पन्न होतें.

" जो ज्या कामांत वाकब असतो, त्याला तें काम राबत्यामुळें चांगले करतां येतें. गुराख्याच्या हवालीं मोठी फौज केली, तर तो लढाईचें काम करील का? नाहीं. ज्याला ज्या गोष्टीची वाकबगारी, त्यालाच तिचीं कारणें, तिचे उपयोग, ती सिद्धीस नेण्यासाठीं तिचे भाग कसे पाडावे, आरंभ कोठे करावा, साधनें कोणतीं योजावीं, व मधलीं विघ्नें कशीं टाळावीं, हे सर्व कळतें. ह्यासाठीं कोणता मनुष्य कोणत्या कामास योग्य आहे, ह्याचा आधीं विचार करावा.

" बुद्धि चांगली असली, तरी तिचा विनियोग यथार्थ झाला पाहिजे. अग्नि हा पदार्थ अति उपयोगी आहे. त्यापासून पाकनिष्पत्ति, दीपन इत्यादि सुखावह कार्यें बहुत होतात. तीं करून घेण्याचें टाकून कोणी एखादा दुष्ट त्यानें लोकांचीं घरें जाळीत सुटला, तर तेथें अग्नीनें काय करावें? हा दोष अग्नीचा, कीं आगलाव्याचा? ज्याच्यासन्निध जावे त्याला जाळावें, एवढेंमात्र अग्नि जाणतो. तसे बुद्धीला सुमार्ग किंवा कुमार्ग लावणें हे तुमच्या हातीं आहे. ‘योजकस्तत्र दुर्लभः’ हा महाजनांचा सुबोध लक्षांत ठेवून बुद्धीची योजना नीट करीत जावी.

" अमुक एक संकट पडलें असतां अमुक अमुक युक्ति योजावी, अथवा अमुक एक उद्योग केला असतां अमुक अमुक

लाभ होतात, असें आपण पुष्कळांच्या तोंडून ऐकतों, व अनेक ग्रंथांत अनेक वेळा वाचितों, व त्या युक्ति आपल्या आठवणींतही असतात; परंतु त्यांचा उपयोग कोठें, कोणत्या प्रकारें करावा, ह्याचें व्यवहारज्ञान नसतें, त्यामुळें कित्येक शंहाणे असून अडाणी लोकांपेक्षांही अधिक विपत्ति भोगितात. वैद्य खासा चांगला पढीक आहे, त्याला सर्व रोगांचीं लक्षणें व निदानें मुखोद्गत आहेत. जवळ रसायनांचे बटवेचे बटवे भरले आहेत, तरी त्याच्या हातून रोगी बरे होत नाहींत, हें पुष्कळांस ठाऊक आहे. तात्पर्य, नुसती पुस्तकी विद्या उपयोगी नाही. तिला व्यवहारज्ञानाची जोड पाहिजे.

“ दूरदृष्टि, समयस्फूर्ति, पाताळयंत्रीपणा, रसिकता, कुशाग्रता, धूर्तता, इत्यादि गुण प्राप्त होण्यास, इतिहास, बखरी, काव्यें, गणित, धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, तर्कशास्त्र हीं अवलोकन करीत जावीं किंवा श्रवण करावी. ”

**ना. वि. बापट.** बाजीराव.

---

# पाठ ३१ वा.



## सन्मित्र.

योजी हिताप्रति, निवारुनि पापकर्मे ।
वर्णी बरेच गुण, झांकुनिया कुकर्मे ॥
दे आपणास असतां, व्यसनीं त्यजीना ।
सन्मित्रलक्षण असें वदतात जाणा ॥

—वामनपंडित.

या विस्तीर्ण संसारामध्येंच सर्व सार आहे, असे समजून तन्मय झालेल्या कोणत्याही संसारी माणसाला, तुकाराममहाराजांसारख्या परोपकाररत ज्ञानी पुरुषांनीं, ‘ सुख पाहतां जवापाडे, दुःख पर्वताएवढें, ’ असें जें संसाराचें वर्णन केलें आहे, तें चांगल्या रीतीनें उमजणें जरी कठिण आहे, किंबहुना अशक्य आहे, तथापि अनुभवावरून त्यांत बराच खरेपणा आहे असे त्याला वाटल्याशिवाय राहणार नाहीं. दुःखामागून सुख व सुखामागून दुःख असें रहाटगाडगें सदा चालूच आहे, आणि त्यामुळे खऱ्या विचारी माणसाला, मग तो संसारी कां असेना, संसार हा केवळ दुःखात्मकच आहे, असें वाजवी रीतीनें म्हणतां येणार नाहीं. पण, साधारण माणसाला असल्या गोष्टींचा विचार करण्याची संवय नसल्यामुळें तो तसा वाटल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं. कारण, दुःखाचें स्वरूप असें आहे कीं, मागें चांगली आठवण ठेवल्याशिवाय ते

सहसा जात नाहीं. परंतु अशा दुःखकारक भासणाऱ्या संसारामध्येंही मनुष्याला आपल्या दुःखाचा विसर पडावा, म्हणून परमेश्वरानें कांहीं अमोलिक चिजा निर्माण केल्या आहेत. अफाट समुद्र, नद्यांचे रम्य प्रवाह, लतावृक्षांनीं आच्छादित झालेले पर्वत, असंख्य तारागणांनीं विभूषित असें नभोमंडळ, सदासर्वकाळ उल्हास देणारे चंद्र आणि सूर्य इत्यादि अजब सृष्ट वस्तूंचें अवलोकन केल्यानें क्षणभर तरी आपलें दुःख विसरला नाहीं, असा कोणता सहृदय मनुष्य या धरित्रीवर असेल? परंतु या संसारांतील दुःख हलकें करण्याला व कधी कधीं तर विसरण्याला, या वर निर्दिष्ट केलेल्या वस्तूंपेक्षांही अधिक गुणकारी अशी एक दुर्मिळ वस्तु ईश्वरानें या जगांत उत्पन्न केली आहे. ती कोणती म्हणाल, तर शिरोवतरणांत वामनपंडितांनी आपल्या श्लोकांत ज्याचीं ठळक ठळक लक्षणें सांगितलीं आहेत, तो सन्मित्र होय. ही अशी अमोलिक जिन्नस लाधल्यावर दुःखाला एका बाजूस गुंडाळून ठेवण्याला आणखी तें कोणतें साधन पाहिजे? मात्र ही वस्तु वर्णन केलेल्या मासल्याचीच असावी. या मायावी जगांत, अंतरंग अगदीं भिन्न परंतु बाह्यतः तेवढ्या सन्मित्रासारख्या पुष्कळ वस्तु 'सन्मित्र' या अवर्णनीय सदराखालीं मोडल्या जातात. अशा प्रसंगीं निवड करितांना चूकभूल झाली आणि सदृश दिसणारा एखादा बनावट पदार्थ 'सन्मित्र' या समजुतीनें स्वीकारला गेला, तर मग दुःख नाहींसें किंवा हलकें न होतां उलटें किती अधिक जड होईल, किंवा वाढेल, याचामात्र कांहीं नेम सांगवत नाहीं. अनेक वेळा

ज्या संबंधास ' मैत्री ' हें पवित्र अभिधान देणें वस्तुतः इष्ट नाहीं, अशा संबंधास तें दिलेलें पाहण्यांत येतें. याचें विशेष स्पष्टीकरण पाहिजे असल्यास तें खालील उदाहरणावरून होण्याजोगें आहे. एखादी चोरांची टोळी किंवा जुवेबाजांचा आखाडा असला, तर त्यांतील व्यक्तींत परस्परांमध्यें कांहीं एक विशिष्ट प्रकारचा संबंध आढळून येतो. एकच निंद्य गोष्ट करण्याचा सर्वांचा सारखा मानस असल्यामुळें, ती गोष्ट सिद्धीस जाईपर्यंत ते कमीअधिक मानानें एकदिलानें वागतात, एकमेकांच्या उपयोगी पडतात व परस्परांच्या सुखदुःखाचे वांटेकरी होतात. वरवर पाहिलें असतां त्या त्यांच्या वर्तनावरून त्या सर्वांत स्नेहभाव दृढ आहे, अशी पुष्कळांची समजूत होते, व त्यामुळें ' मैत्री ' हा जो पवित्र संबंध तो त्यांच्यांत वसत आहे असें ते म्हणतात. परंतु येथें त्यांची चूक होते. खऱ्या मैत्रीला अत्यंतावश्यक जें निष्काम प्रेम तें या मंडळींत मुळींच नसतें. बाहेरून पाहाणाऱ्याला जो त्यांचा परस्परांविषयीं मोठा ओढा दिसून येतो, तो वस्तुतः खरा नसून निव्वळ दिखाऊ असतो. कार्यसिद्धि झाल्यावर काय तें प्रत्येकाचें खरें स्वरूप उजेडांत येतें; व त्या वेळीं कार्यसिद्धि होईपर्यंत जो परस्परांमध्यें ओढा किंवा प्रेम आहे असें आपणांस वाटत होतें, त्याचा कांहीं मागमूसही न सांपडून, हरएक जण दुसऱ्याला तोंडघशी पाडून, आपला स्वार्थ साधण्याचे प्रयत्नांत गुप्तपणें व्यापृत होता, असेंच नजरेस येतें. मुळाशीं ते सर्व परस्परांचे शत्रु असतात व तें त्यांच्या त्या निंद्य धंद्याला अनुरूपच असतें. निरुपद्रवी व

प्रामाणिकपणानें उदरनिर्वाह करणाऱ्या लोकांना नाडण्याचा व लुबाडण्याचाच ज्यांचा उघड धंदा, त्यांच्यांत निष्काम प्रेम हा उत्तम सात्त्विक गुण कसा यावा? व हा जोंपर्यंत त्यांच्यांत येण्याचा बिलकूल संभव नाहीं, तोंपर्यंत फसून जाऊन त्यांच्या त्या दुष्ट संबंधाला सन्मैत्रीचा संबंध समजणें म्हणजे निवळ चूक होय. अशा या दुष्ट लोकांच्या संबंधाला 'संगनमत' किंवा 'पातकी लोकांचे कूट' असेंच म्हणणे योग्य आहे. सारांश, असल्या तऱ्हेच्या दुष्ट संबंधांना जें पुष्कळांनीं 'मित्रत्व' या सदरांत गोंविलें आहे, त्यांतून ते काढून अजीबात दूर ठेविले पाहिजेत, व केव्हांही त्यांना 'मित्रत्व' या सदरांत घालण्याचे मनांत आणितां कामा नये.

**त्रि. का. पित्रे.** नीतिमुक्ताहार.

---

## पाठ ३२ वा.



### बालपतप्रधान.

बालपतप्रधानाची (सवाई माधवराव पेशवे यांची) काळजी घेण्याचें जोखमीचें काम ज्यांच्या अंगावर येऊन पडलें होतें, त्या कारभारी मंडळींना अहोरात्र झोंपा नव्हत्या, असें म्हटलें तर यत्किंचित्‌ही अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यांतही नाना फडणिसांस तर अहोरात्र आपल्या बालधन्याची काळजी वाहण्यापलीकडे कोणचीही गोष्ट सुचत नव्हती. कोण्या वेळीं कोण माणूस

काय विश्वासघात करील, आणि कोणचा भयंकर अनर्थ गुदरेल, याचा नेम नाहीं, असें त्यांच्या मनास सदोदित–अष्टौप्रहर वाटत असे. श्रीमंत नारायणरावांच्या निधनानंतर श्रीमंत गंगाबाई-साहेबांची प्रकृति चांगली रहावी, व त्यांच्या शरीरास सुखस्वास्थ्य असावें, एवढ्याकरितां कायावाचामनानें अहोरात्र काळजी घेतां घेतां केवढाले दुर्धर प्रसंग ओढवले, आणि ते टाळण्याकरितां आपणास काय काय श्रम करावे लागले, याचें स्मरण झालें म्हणजे त्यांचें अंग अगदीं थरथर कांपे. ते वेळची जबाबदारीच फार मोठी. परंतु आतां गादीला वारस होऊन तो गादीवर बसला. त्याच्या नांवानें वस्त्रें आणून सगळीकडे त्याच्या नांवाची द्वाही फिरवून दिली. आतां तो कर्तासवरता होईपर्यंत त्याच्या शरीराची काळजी घेणें हें आपल्यावरले केवढें जोखमीचें काम ! श्रीमंत गंगाबाईसाहेब गर्भवती नसल्याच, किंवा असूनही त्यांस कन्या झाली असती, तर आपल्याला हा सगळा व्यूह रचण्यास कांहींच सबळ कारण नव्हतें. मग दुसरें कांही आपण काढले असतें, केलें असतें, त्यांत आपल्याला इतरांचे साहाय्य मिळालें असतें, किंवा नसतें, हा भाग निराळा; परंतु कन्यारत्न झालें असतें, तर आपला पक्ष अगदीं लंगडा पडला असता. परमेश्वरकृपेनें आपला पक्ष लंगडा पडला नाहीं. श्रीमंत गंगाबाईसाहेब गर्भवती असतांना त्यांच्या जिवास अपाय करण्याचे अनेक प्रयत्न झाले, ते सगळे विफळ करण्यांतही भगवान् विष्णूनें आपल्यास साहाय्य दिलें. पुढें पुत्ररत्न झाल्यावर दहा दिवसांत त्याचा जीव घेण्या-

साठींही अनेक प्रयत्न झाले, परंतु तेही प्रयत्न आपण चालूं दिले नाहींत. पटवर्धनांसारख्यांच्या चाणाक्षपणानें आतांपर्यंत तर तसले प्रयत्न अंशत:सुद्धां सफळ होऊं दिले नाहींत. परंतु अजून किती तरी वर्षे आपल्याला काळजी घ्यायला पाहिजे आहे! श्रीमंत मोठे होऊन त्यांचे त्यांना समजूं लागेपर्यंत प्रत्येक बाबतींत त्यांची काळजी आपण घेतली पाहिजे. थोडी कसूर झाली, तरी-सुद्धां एखादे वेळीं कोणचा अनर्थ ओढवेल आणि कोणचा नाहीं याचा नेम नाहीं. असे नाना फडणीस यांस अहोरात्र वाटत होतें. राघोबादादाला कोणीं मिळूं नये, त्याला पुण्यावर चाल करणें अगदीं अशक्य करून सोडावें, इत्यादि गोष्टी या राज्यकार-स्थानांतल्या. त्यांच्याबद्दल जितकी काळजी घ्यावयाची, तितकी ते घेत असतच. जितकीं कारस्थानें लढवावयाचीं तितकीं ते लढवीत असतच; व जितकी कारवाई करावयाची तितकी ते करीत असत. परंतु जी काय मुख्य काळजी त्यांना अहोरात्र बाळगणें अत्यंत अवश्य होतें, ती आपल्या बालधन्याच्या शरीराची होय. आपल्या शत्रूंकडून त्याच्या जिवास अपाय होऊं नये; त्याच्या जिवास अपाय झाला, आणि आपले अनेक राजकीय व्यूह अगदीं सिद्धीस गेले तर काय उपयोग? फडणीस यासंबंधानें किती काळजी घेत असत, याची माहिती जर कोणीं साग्र लिहून ठेविली असती, तर किती तरी भयंकर गोष्टी त्यास लिहाव्या लागल्या असत्या. आनंदीबाईचा पहिल्यापासून प्रयत्न हा कीं, गर्भवती अवस्थेतच श्रीमंत गंगाबाईंचा नाश व्हावा. तसें आतां शक्य

नाहीं, असा काल येऊन ठेपला. तेव्हां दहा दिवसांतच त्या गरीब अर्भकाचा प्राण घेण्यासाठीं तिनें मारेकरी व मारेकरणी पाठिवल्या. तेव्हांचेही आपल्या हस्तकांचे प्रयत्न फसले, असें पहातां तिनें तिसरा एक व्यूह रचण्यास सुरुवात केली. तो व्यूह म्हणजे श्रीमंत गंगाबाईंच्या पातिव्रत्याबद्दल लोकांचे मनांत संशय उत्पन्न करण्याबद्दलचा होय. परंतु लोक त्या मातेस गंगाजलाप्रमाणे शुद्ध मानीत असल्याकारणानें तोही नीच प्रयत्न विफळ झाला. तेव्हां पुढें अशी अफवा पसरविण्याचा प्रयत्न सुरू झाला कीं, श्रीमती गंगाबाईंस व एका सोनारणीस एकाच वेळी मुलगी व मुलगा अशीं अपत्यें अनुक्रमे झालीं. तेव्हां मुलगी आणखी मुलगा हीं अदलाबदल करून ठेविलीं. पुढें ती बातमीही पसरण्यांत यश आलें नाहीं. कोणी तीवर विश्वास ठेवीना. जो तो असें बोलणारांची छीथू करूं लागला. राघोबादादांची बारामतीकरांच्या घरीं दिलेली मुलगी गंगाबाईंच्या प्रसूतिसमयीं अगदीं जवळ नेऊन ठेविली होती. आणि ती अहोरात्र गंगाबाईजवळच असे. अर्थात् कांहीं यत्किंचित् जरी लबाडी झाली असती, तरी ती केव्हांच पचतीना. अशा प्रकारें जेव्हां सर्व उपाय फसले, व आपण जें करायाला जावें, त्यांत कांहींच यश येत नाहीं असे तिनें पाहिलें, तेव्हां आनंदीबाईला आतां दुसरा कांहीं मार्ग उरला नाहीं. फक्त कांहीं तरी खटपट करून त्या मुलाच्या जिवाला अपाय करावयाचा. मुलगा जों जों वयानें मोठा होत जाईल, तों तों आपल्याबद्दल लोकांचा ग्रह अधिकाधिक वाईट होत जावयाचा, आणि आप-

त्याला राज्यप्राप्ति होण्याचेंही अशक्यच होत जावयाचें, हें तिला अर्थात्च धडधडीत दिसत होतें. यामुळें तिनें, ती आपण स्वतः लांब पल्ल्यावर होती तरी, त्या मुलाच्या घातासाठीं उपाययोजना चालविली होती. निदान तशा उपाययोजना तिच्याकडून होत आहेत, अशाबद्दल बातम्यांवर बातम्या येऊन थडकत होत्या. या बातम्यांत कधीं कांहीं तथ्य असो वा नसो; परंतु त्यांच्याकडे केवळ दुर्लक्ष करणें नानांस व त्यांच्या साहाय्यकारी मंडळीस अगदीं अशक्य होते. एखादें संकट आपणावर येणार असें आगाऊच कळलें असतां, तें संकट येणें शक्य किंवा अशक्य याचा विचार करून तें अशक्य ठरवून, त्याच्या निवारणार्थ कांहीं करावयास नको, असा निश्चय करून स्वस्थ बसावें, हें धोरणी पुरुषांचें लक्षण नव्हे. संकट अमुक प्रकारचें आणि तें अमुक प्रकारानें आपणांवर येणार आहे, असें कळलें असतां पहिल्याप्रथम तें संकट आलेंच, तर त्याच्या निवारणाच्या उपायांची योजना करून ठेवावी, आणि मग तें संकट येणार कीं नाहीं, याची चौकशी करीत बसावें, हाच मुत्सद्दीपणाचा मुख्य खरा मार्ग होय. तोच मार्ग नाना फडणिसांनीं पतकरला होता हें सांगणें नकोच. दर महिन्या दोन महिन्यांनीं एकदां अशी बातमी येई कीं, आनंदीबाईनें अमक्या बाईला फितूर केली आहे, किंवा अमक्या अमक्या माणसाचें वर्तन फार संशयित आहे, तो आनंदीबाईचा हेर आहे, आणि तो अमुक एका प्रकारानें वागत असतो. असें कळलें कीं, त्यांच्या पोटांत धस्स होत असे. त्यांनीं आपल्या

बालधन्याच्या जवळ जीं माणसें ठेवलेलीं होतीं, तीं सर्व मायेचीं, आस्थेचीं व अत्यंत विश्वासू अशींच ठेवलेलीं होतीं. परंतु कोण्या वेळीं कोणाला काय बुद्धि सुचेल आणि कोण लोभाला बळी पडेल, हें काय सांगावें, असें त्यांस नेहमीं वाटून ते फार जागरूक असत. कोणच्या वेळीं काय होईल याचा नेम नाहीं, असें धरूनच ते चालत असत. कांहीं बातमी येवो, आणि ती कितीही असंभवनीय असो. ती पूर्णपणें संभाव्य असें धरून ते उपाययोजना करीत असत.

**ह. ना. आपटे.** करमणूक.

---

## पाठ ३२ वा.



## हें चित्र पहा !

जिवाजीपंतअण्णा खासगीवाले म्हणून एक गृहस्थ थोरल्या माधवरावांच्या वेळीं होते. यांची ताकद कांहीं अवर्णनीय होती. खासगीवाले हे पेशव्यांचे खासगीकडील कामगार खरे, परंतु हे खासा स्वारीबरोबर लढाईवर जात. आतां खासगीवाल्यांच्या पराक्रमांचें इतिहासांत कोठें वर्णन आढळत नाहीं, याचें कारण असें कीं, खासगीवाल्यांच पेशव्यांच्या पदरच्या इतर सरदारांप्रमाणें पृथक् पथक नसे. निराळें स्वतंत्र पथक असल्याशिवाय लढाईंत पराक्रमांचें वर्णन होण्यास मार्ग नसे. असो. सांगावयाचें कारण;

खासगीवाले जरी खासगी कामाकडील कामगार होते, तरी त्यांस लढाई माहीत असे. त्यांच्या कुळांतील पुरुष लढाईवर जात. जिवाजीपंतअण्णा खासगीवाल्यांनीं, पेशव्यांच्या निजामाबरोबर ज्या लढाया झाल्या, त्यांतून अनेक धाडसाचीं कामें केलीं आहेत. घोड्यावर बसण्याच्या संबंधांत यांचें त्या काळचे लोक वारंवार नांव काढीत. कसाही रगेल व मस्त घोडा असो, अण्णांनीं एकदां त्यावर बसून फेरफटका केला की, तो अगदीं मऊ येई.

अण्णा खासगीवाल्यांचा एकट्याचा रोजचा आहार पायलीचा असे! त्यांचा जठराग्नि फारच तप्त असे. चार घटका दिवस आला नाहीं तोंच त्यांस शेरदीडशेर पोहे दुधाशीं किंवा दह्याशीं लागत. ही सकाळच्या फराळाची वेळ जरा चुकली, कीं त्यांचे प्राण कासावीस होत. पहांटेस हजारबाराशें नमस्कार घालून जोडी-मलखांब खेळून, मग अण्णा फराळ करीत. पूर्वी दहांची पंगत नसे. मध्यान्हाकाळ झाल्यावर जेवणाची वहिवाट असे. अण्णा जेवायला बसले, म्हणजे प्रथम गेला बाजार शेराचा भात, पावशेर-दीड-पावशेराचें वरण व त्यावर चांगलें अच्छेरभर तूप त्यांना लागे. याच्याच बेतानें पुढचें जेवण असे. वाचकहो, आठदहा माणसांस शेराचा भात शिजविला कीं, रगाडी झाली, संध्या-काळीं फोडणीचा भात करायला थोडासा उरायचा, अशांतलीं आपण सध्यांचीं माणसें अण्णांना राक्षस म्हणूं. पण याचा आपणांला खेद वाटायला पाहिजे! पोटभर खायला मिळण्याची भ्रांत अशांतली सध्यां आपल्याला स्थिति आली आहे. कैकांना

पोटभर अन्न नाहीं म्हणून थोडेंसें अन्न खाऊन पाणी पिऊन पोट भरावें लागत आहे ! हर हर ! ! अशा प्रकारें अन्न दुर्मिळ झालें, तेव्हां आपले आहार चिपट्याकोळव्यांत आले, हा एक ईश्वरी प्रसादच, असें आपण मानतां उपयोगाचें नाहीं. अलीकडे जेवणा-वळींत भाताचीं चार शितें खाऊन कोशिंबिरी चाखीत बसणारे पुष्कळ दृष्टीस पडतात. आणि अशांना अन्न तुटल्याबद्दल वाईट वाटत नाहीं. उलट ते नाजूकपणाबद्दल फुशारकी मारीत असतात; अलीकडे कमी जेवणें हें श्रीमंतीचें लक्षण होऊन बसलें आहे ! श्रीमंती तर गेलीच, पण कमी जेवण्यांत श्रीमंती येऊन बसली आहे ! विपरीत काळाचें कसें विपरीत लक्षण आहे पहा ! ! म्हणजे ज्यांना अन्न मिळत नाहीं ते पाणी पिऊन पोट भरतात, व ज्यांच्या नशिबानें अन्नाला तोटा नाहीं त्यांच्यानें खाववत नाहीं ! ! असो.

अण्णांच्या आहाराची व फराळाची वेळ चुकली, की त्यांच्यानें राहवत नसे, याची माहिती थोरल्या माधवरावसाहेबांपावेतों गेली. एके दिवशीं अण्णांची थट्टा करायची, असा श्रीमंत व दरबाची मंडळी या सर्वांचा बेत ठरला. जुन्या मंडईतून कसब्यांत जो रस्ता जातो त्यावर पटवर्धनांचा वाडा आहे. ते पेशव्यांचे आप्त. त्यांच्या येथें श्रीमंतांना मेजवानी करण्याचा विचार ठरविला. प्रहर दिवसास मेजवानीचा बेत आहे, अशी सूचना निमंत्रण करतांना सर्वांना देण्यांत आली. अण्णांना तर खरोखर अगदीं बरोबर प्रहर दिवसास पंगत बसावयाची असें सांगण्यांत आलें. हेतु एवढाच कीं,

अण्णांनीं रोजच्या नियमाप्रमाणें फराळ करूं नये. मेजवानीच्या दिवशीं सूर्योदय झाला नाहीं, तों अण्णांच्या येथें दुसरें बोलावणें गेलें. आतां रोजच्या नियमाप्रमाणें फराळ करावा कीं न करावा, अशा विचारांत अण्णा आहेत, तों श्रीमंतांकडून जरूरीचें बोलावणें आलें. तेव्हां अण्णा श्रीमंतांच्या भेटीला फराळ न करतांच गेले. अण्णा वाड्यांत जाऊन श्रीमंतांना भेटल्यावर श्रीमंतांनीं असा एक भानगडीचा विषय काढला कीं, तो लवकर म्हणून संपेना. पटवर्धनांकडलीं बोलवण्यांवर बोलावणीं येत होतींच. घड्याळजीनें सहा वाजले म्हणून सांगितलें, तरी श्रीमंतांचें व अण्णांचें बोलणें आटपून श्रीमंतांना स्नानाला उठायाला फुरसत होईना. अण्णांना केव्हां एकदां हा विषय संपेल असें झालें होतें. पण श्रीमंतांचें गुऱ्हाळ आवरेना, त्याला ते काय करणार ? पटवर्धनांकडलीं बोलावणीं येत होतींच, तेव्हां श्रीमंत अण्णांना बरोबर घेऊनच स्नानाला उठले. श्रीमंत स्नानाला गेले म्हणजे आपण फराळ करून घेऊं असा अण्णांचा विचार होता, पण तोही श्रीमंतांनीं साधूं दिला नाहीं. स्नान झाल्यानंतर श्रीमंत संध्येला बसले तरी त्यांनीं अण्णांना म्हणून सोडलें नाहीं. संध्या वगैरे होऊन देवाचें तीर्थ घेतल्यावर अण्णांना घेऊन श्रीमंत पटवर्धनांकडे आले. मेजवानीची सर्व तयारी झाली होती. सर्व मंडळी येऊन श्रीमंतांची वाटच पहात बसली होती. मेजवानीचा थाट उत्तम होता. परंतु पानांवरून जे पदार्थ वाढले होते, ते मुलींच्या भातुकलीच्याऐवजीं वाढलेले होते. लाडू मोतीचुराचे, पण मोठ्याशा सुपारीपेक्षां कांहीं मोठे नव्हते.

भाज्या व कोशिंबिरी पानांवर पुष्कळ प्रकारच्या होत्या, पण सगळ्या एके ठिकाणीं केल्यास त्यांचा गोळा लहानशा मुदीएवढा होईल न होईल. मध्ये भाताची मूद मुलींच्या भातुकलीला शोभेशीच होती. श्रीमंतांच्या पानासमोर अण्णांना बसविलें होतें. तो मेजवानीचा थाट पाहून अण्णांच्या अंगाचा अगदीं संताप झाला. पण त्यांना कांहीं बोलतां येईना. कारण, श्रीमंतांची स्वारी त्यांच्यापुढें बसलेली. पटवर्धनांनीं उदक सोडल्यावर सर्व मंडळी जेवावयास बसली. पुढें मधला भात वाढायला आला, तोही वाढणाराच्या मर्जीप्रमाणें वाढला जात होता. व आधीं सर्वांचा बेत झाला असल्यामुळें, मला आणखी पाहिजे असेही कोणी म्हणत नव्हता. वाढतां वाढतां वाढपी अण्णांच्या पानाजवळ आला, आणि सगळ्यांना वाढला होता त्या बेतानें त्यानें त्यांच्याही पानावर भात घातला, व अण्णांकडे न पाहतां तो पुढें जाऊं लागला. त्या मेजवानीच्या सर्व थाटावरून आजची मेजवानी केवळ आपल्याला उपाशीं मारण्याकरितां केली आहे, हें अण्णांच्या तेव्हांच लक्षांत आलें. सकाळचा रोजच्याप्रमाणें फराळ झालेला नाहीं, लवकरचा बेत ठरलेला, पण बराच उशीर झालेला, त्यानें अण्णांचा जठराग्नि अगदीं पेटला होता. पुढें श्रीमंत बसले आहेत, याचा कांहीं एक विचार न करितां अण्णांनीं वाढप्याच्या हातांतील वेळणी ओढून आपल्या पानांत ओतली ! तें अण्णांचें कृत्य पाहून मंडळीचा केवढा हंशा झाला असेल, याची कल्पना वाचकांनींच करावी. असो. पुढें थट्टामस्करींत सगळ्यांचीं जेवणें झाल्यावर

मंडळी हात धुवायला उठली. हात वगैरे धुऊन आचमनें करीत असतां अण्णांनीं एक भली जाड रुप्याची पंचपात्री पाहून उजव्या हातांत घेतली, ( पेशवाई भांडीं फार जाड असतात हे वाचकांना माहीत असेलच ) आणि सगळ्यांना उद्देशून ते म्हणाले, ‘ मी फार खातों म्हणून तुम्ही माझी सर्व मिळून थट्टा करितां व तुम्हांला मी भस्मरोगी असेन असे वाटत असेल; पण तसे नाहीं हो ! माझी ताकद कायम राखण्याकरितांच मी फार खातों.’ असें म्हणून त्यांनीं हातांत घेतलेली पंचपात्री बोटांनीं दाबून तिचा मुटका करून ही माझी आठवण म्हणून असूं द्या, असें ते सर्वांस म्हणाले ! वाचकहो, पेशवाईमध्यें अण्णांच्यासारखीं सशक्त माणसें होतीं, म्हणूनच शत्रूला पळतां भुई थोडी होई व आपल्या पूर्वजांचा दरारा वाटे, हें आपण विसरतां कामा नये. राज्य सुयंत्र चालण्यास लेखणी भक्कम पाहिजे हें खरें, परंतु लेखणीचें संरक्षण करण्यास ताकद पाहिजे. एक वेळ लेखणीवांचून ताकदीचें चालेल, पण ताकदीवांचून लेखणी सदा लंगडी, हें पक्कें लक्षांत ठेवा.

धुं. स. जोशी. ऐतिहासिक लेख–प्रथम गुच्छ.

---

## पाठ ३४ वा.



## हिताचे दोन शब्द.

माझी (लोकहितवादीची) सर्व जनांस एवढीच विनंती आहे कीं, तुम्ही सर्व जण विचार करण्यास लागा, वाचावयास लागा, नवीन ग्रंथ व वर्तमानपत्रें वाचा, व तुमचे शेजारीं काय होत आहे, याचा विचार करा. इंग्रजांमध्यें कितीएक चांगले गुण आहेत व ते तुम्हांस प्राप्त व्हावे म्हणून ईश्वरानें त्यांची तुमची संगत घातली आहे, हें लक्षांत आणा. सारासार पहा, परंपरा आंधळ्याची माळ लागली म्हणून तीच चालवूं नका. धर्मशील, ईश्वरतत्पर व्हा. ह्या गुणावांचून सर्व व्यर्थ आहे. सत्य बोला; दुष्ट वासना सोडा; धर्मसुधारणा करा; म्हणजे धर्म टाकूं नका, परंतु त्याचा अर्थ घ्यावा तसा काळ पाहून घ्या व ईश्वरासंबंधीं आणि जगासंबंधीं ज्ञान जगांत वृद्धिंगत करा. आळस सोडा, व तुमच्यामध्यें वास्तविक बुद्धिमान् असेल त्यास पुढारी करा; त्याचे अनुमतानें चाला. सर्व लोकांची जूट असूं द्या. आपसांत फूट नसावी, हें ध्यानांत वागवा. विद्या अधिक होऊन तुमचें पाऊल पुढें पडूं द्या. सर्व देशाची काळजी प्रत्येकानें करावी. तुमचे संपत्तीवर लक्ष देऊन तुम्ही आळसांत राहूं नका. खरी नीति कोणती तें पहा. पैसा खाऊं नका. प्रपंच, संसार भलाईनें करा. आपल्या शत्रूचेंदेखील वाईट इच्छूं नका. शरीरानें

व मनानेंदेखील पाप करूं नका. प्राणिमात्रावर दया करा. अपराध क्षमा होतील तितके करा. परंतु क्षमा न करण्याचा प्रसंग येईल तेथें क्षमा करूं नका. एकमेकांवर प्रीति करा. नित्य प्रातःकाळी उठून ईश्वराचें भजन व चिंतन करीत जा. त्याजवळ क्षमा मागा. आपले हातून पापें व अपराध बहुत घडतात, त्यांची क्षमा भगवंताशिवाय करणारा समर्थ कोणी नाहीं. ढोंग, सोंग करूं नका. लबाडी सदा ईश्वरास दिसते, यास्तव ती कदापि करूं नका. कोणतेंही पाप करूं नका. तें फार वाईट. इहलोकीं क्षणभर सुख वाटेल, परंतु त्याचा झाडा द्यावा लागेल. मरायाचें आहे, हें नित्य मनांत आणा. तुम्ही आपले मुलांची काळजी करून त्यांस शाहणीं करा, व सर्व लोकांची काळजी करा. नित्य कांहीं तरी सर्व देशाचें कल्याण केल्याशिवाय एक दिवस जाऊं देऊं नका. मुख्य ईश्वरभजन करण्याचा मार्गच हा आहे कीं, कोणास दुःख देऊं नये, सर्व लोकांचें हित करावें. स्वदेशाचें हित इच्छावें, पण परदेशाची हानि इच्छावी असें नाहीं. परंतु सांप्रत आपले लोक फार वाईट अवस्थेंत आहेत; सबब फार खबरदारी ठेवावी कीं, या लोकांचें कल्याण होईल. तुम्ही आपल्यास योग्य असें कर्म करा, अब्रू वाढवा; पैसा मिळाला तर अब्रू वाढते असें नाहीं. अब्रू, खरेपणा व निर्मळपणा यांपासून उत्पन्न होते. विद्या केली तर तीप्रमाणें वागणूक लागते, नाहीं तर विद्या व्यर्थ होय. विद्येचें सार्थक रोजगार नव्हे. ज्यास विद्येचा अर्थ ठाऊक नाहीं, ते असें म्हणतात. परंतु पोट भरणारी ती विद्या नव्हे, ती मजुरी

आहे. विद्या म्हणजे ज्ञान, जेणेंकरून मनुष्य निर्मळ होतो, विचारी होतो, समर्थ होतो. उनाड जे लोक आहेत, ते विद्येचें तात्पर्य द्रव्य मिळविण्याचें असें समजतात. परंतु विद्येपासून द्रव्यलाभही होतो व दुसरे अनेक लाभ होतात.

लोकहितवादी.

---

## पाठ ३५ वा.



## ' न मातुः परदैवतम्. '

[ प्रसिद्ध आंग्ल कवि शेक्सपिअर याच्या उत्तम नाटकांमध्यें हॅम्लेट नाटकाची गणना आहे. त्याचीं मराठींत तीन रूपांतरें झालेलीं आहेत. त्यांपैकीं रा. बरव्यांच्या पुस्तकांतून पुढील उतारा घेतला आहे. हॅम्लेट म्हणून एक राजपुत्र होता. त्याचा बाप–राजा–दोन प्रहरीं जेवणानंतर बागेमध्यें विश्रांतीसाठीं निजला असतां त्याच्या भावानें–हॅम्लेटच्या चुलत्यानें–केवळ राज्यलोभानें राजाच्या कानांत भयंकर विष ओतून त्याचा खून केला. व राजा सर्पदंशानें मेला अशी लोकांत कंडी पिकविली. लोकांचाही तीवर विश्वास बसला. पुढें त्या चुलत्यानें आपणाला राज्याभिषेक करून घेऊन आपल्या भावजयीबरोबर–हॅम्लेटच्या आईबरोबर–पाटही लाविला. नंतर राजानें पिशाचरूपानें येऊन आपल्या मरणाची खरी हकीकत हॅम्लेटला सांगितली. व आपल्या खुनाबद्दल चुलत्याचा सूड घेण्याबद्दल त्याला त्यानें आज्ञा केली. पण आपल्या राणीला–हॅम्लेटच्या आईला–कोणत्याही रीतीनें दुःख देऊं नको, तिला पश्चात्तापानें दुःख होईल तेवढें पुरे, असें त्यानें मुद्दाम सुचविलें. पुढील उताऱ्यांत पिशाचानें आपल्या मरणाची हकीकत आपल्या मुलाला सांगितली आहे.]

तुला ठाऊकच आहे, कीं दुपारच्या वेळीं नेहमीं मी दोन घटका आपल्या बगिचांत कारंज्यापाशीं जाईच्या मांडवाखालीं, विश्रांति घेण्यासाठीं पलंगावर पडून रहात असें. नित्याच्या पाठाप्रमाणें माझ्या मरणाच्या दिवशीं, तेथें मी वामकुक्षी केली असतां माझा किंचित् डोळा लागला. इतक्यांत ती संधी साधून तुझा चुलता, एका वाटींत तक्षकवेलीचा रस भरून घेऊन कोणाला न कळत गुपचुप तेथें आला, आणि तो रस त्यानें माझ्या उजव्या कानांत ओतला. वनस्पतींचें सामर्थ्य मोठें विलक्षण व अतर्क्य असतें. कित्येक वनस्पति अशा आहेत कीं, प्राण्यास अजरामर करण्याविषयीं त्या स्वर्गीच्या अमृतालाही मागें टाकितात! व कित्येकांचें प्राणनाश करण्याचें सामर्थ्य कालकूट विषाच्याही तोंडांत मारितें! असो. त्यानें तो रस कानांत ओततांच माझ्यानें एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवरही होववलें नाहीं. तिचें नांवच तक्षकवेल. मग काय विचारतोस! सामर्थ्यही त्याचप्रमाणें. प्रत्यक्ष तक्षकाचाच दंश तो! समुद्रमंथनांत प्राप्त झालेल्या हालाहलाच्या अंगींही त्या रसाप्रमाणें घातक शक्ति नसेल. मनुष्याच्या रक्ताशीं जसें कांहीं त्याचें हाडवैरच. कोणत्याही मार्गानें मनुष्याच्या शरीरांत त्याचा प्रवेश होण्याचामात्र उशीर, कीं, जसा पारा भुईवर ओतल्यावर अति चंचल गतीनें चोहोंकडे पसरतो, तसाच तो रस निमिषमात्रांत सगळें शरीर व्यापून टाकितो आणि श्वासोच्छ्वासाचे वगैरे सर्व मार्ग रुद्ध करितो! रक्ताशीं त्याचा संयोग होतांच, जसें दूध विरजून दहीं व्हावें,

त्याप्रमाणें रक्त नासून जाऊन जागच्या जागीं गोठून घट्ट होतें! ह्याच प्रकार माझ्या शरीराचा झाला. तो रस कानांत गेला न गेला तों, सर्व इंद्रियांचें चलनवलन स्तब्ध होऊन जाऊन, साऱ्या शरीराला जशी काय एकदम कीड लागून, तें गौर, मृदु अंग, एकाएकीं सर्प्यांच्या किंवा पालींच्या आंगाप्रमाणें खवळांनीं व्याप्त होऊन अगदीं खडबडीत होऊन गेले. ह्याप्रमाणें निःशंक अंतःकरणानें मी विश्रांतीसाठीं निद्रावश झालों असतां माझ्या भावानें माझ्या जिवावर, माझ्या गादीवर, आणि माझ्या राणीवर एकदम धाड घातली, व तिहींविषयींही मला संपूर्ण नागविलें. पहा, अंतकाळीं दानधर्म वगैरे करून, गंगोदकाचें वगैरे सेवन करून, किंवा परमेश्वराचें नामचिंतन करून पापक्षालन करण्यालाही दुष्टानें मला संधी दिली नाहीं! अंतकाळीं कृतकर्माविषयीं चित्ताला पश्चात्ताप होऊन जे प्राणी ईश्वरास अनन्यभावें शरण जाऊन त्याची क्षमा मागतात व करुणा भाकितात, त्यांची कींव त्या दयासागरास आल्यावांचून रहात नाहीं. त्याच्या नामचिंतनांत निमग्न असतां ज्यांचें देहावसान होतें, ते पातकाचे पर्वत असले तरी त्यांजला यमधर्मापुढें उभें राहण्यास भीति वाटत नाहीं. परंतु माझ्या भावानें पूर्ण दायिजगिरी साधली आणि ह्या दुर्दैवी प्राण्याच्या हातून तीही अमोल्य संधी हिरावून नेली. त्यामुळें ह्याला चित्रगुप्तापुढें हिशेब देण्यास तोंड राहिलें नाहीं. म्हणून अर्थात्च अति घोर व भयंकर यमयातना भोगीत राहणें याच्या कपाळीं आलें आहे! नको! नको!—नको! त्या यातनांची आठवण झाली कीं, काळीज फाटून जातें! असो.

आतां तुला सांगावयाचें इतकेंच कीं, तूं खरोखर माझा पुत्र असशील व तुझ्यामध्यें यत्किंचित् तरी पुरुषार्थ असेल, तर तूं हें सगळें गिळून जाऊन उदासीन वृत्ति स्वीकारून स्वस्थ बसूं नको. पण आणखी एक गोष्ट मी तुला सांगून ठेवितों व माझ्या सांगण्याचा धिक्कार तूं करणार नाहींस अशी माझी खात्री आहे. या सूड घेण्याच्या कार्याच्या व्यवसायांत तुला सुचतील त्या उपायांची तूं योजना कर; परंतु मनानें किंवा हातानें, आपल्या आईविषयीं-मात्र कांहीं विपरीत वर्तन करण्यास प्रवृत्त होऊं नको. 'न मातुः परदैवतम्' ही नीतिशास्त्राची उक्ति आहे ती यथार्थ आहे. तस्मात् मातृहत्येसारख्या महापातकाचा कधींही अधिकारी होऊं नको. किंबहुना पुत्रधर्मापासून तूं कोणत्याही प्रकारें पराङ्मुख होऊं नको. तिच्या कर्मांचा हिशेब घेणारा व तिच्या अपराधांबद्दल तिला दंड करणारा महासमर्थ न्यायाधीश बसलेलाच आहे, आणि त्यानें सर्व मनुष्यांप्रमाणेंच तिच्याही अंतःकरणांत फार तीक्ष्ण कांटे ठेविले आहेत; ते त्या अंतःकरणास तिनें केलेल्या कर्माबद्दल टोचीत राहतील. तें दुःख कांहीं थोडें नाहीं. पुत्राच्यानें मातेचे उपकार कधींही फिटत नाहींत; म्हणून तूं आपल्यावर कृतघ्नपणाचा आरोप येण्यास अवकाश देऊं नको. चल, आतां मी येतों बरें. ते ऐक, देवालयांतून चौघडे झडूं लागले, व कांकडआरत्यांचा गजर कानीं येऊं लागला. ते लोक तिकडून हातांत कांकडे घेऊन तोंडांनीं भूपाळ्या म्हणत म्हणत नदीतीराकडे जात आहेत. त्यांच्या हातांतील कांकड्यांच्या ज्योती पहा कशा पांढऱ्या फटफटीत दिसूं लागल्या.

सहस्त्ररश्मि भगवान् सूर्यनारायणाचा रथ अगदीं क्षितिजाशीं येऊन ठेपलाच म्हण; आतां येथें क्षणभरही उभें राहण्यास मला अवकाश नाहीं. मी चाललो. तुझें कल्याण होवो. माझी आणि मीं सांगितलेल्या शब्दांची विस्मृति पडूं देऊं नको!

**आ. स. बरवे.** हिमतबहादर नाटक.

---

## पाठ ३६ वा.



### समुद्र.

हे सागरा! तुझ्या अफाट विस्ताराकडे पाहून जों जों विचार करूं लागावें, तों तों नव्या नव्याच कल्पना मनांत येऊं लागून बुद्धीस अधिकाधिक चमत्कार भासतात, आणि आश्चर्यभरांत चित्त अगदीं थक्क होऊन जातें! ज्याप्रमाणे मनुष्यांच्या पिढ्यानपिढ्या एकामागून एक जन्मास येऊन कांहीं काळानें लागल्याच विलयास जातात, त्याप्रमाणें तुजवर हजारों लाटा एकावर एक येऊन भराभर बुजून नाहींतशा होतात, आणि त्यांच्याप्रमाणें यांच्या वास्तव्याची खूणदेखील मागें रहात नाहीं! तुझ्या लाटा साऱ्या पृथ्वीच्या किनाऱ्यावर आदळत आहेत, आणि ज्यांचें निकट सान्निध्य त्यांच्या वैरासमात्र कारणीभूत होतें, अशा देशांची तोंडातोंड करून तूं त्यांचें कलाकौशल्य व संपत्ति हीं परस्परांस देववितोस,

व येणेंकरून सर्व जगास तुझ्यामुळें सुखाचा व समृद्धीचा लाभ होत आहे.

तुझे देखावे तरी निरनिराळ्या समयीं किती विचित्र असतात! त्यांची शोभा व भव्यपणा हीं कोठवर वर्णावीं! कधीं वाऱ्याची हालचाल अगदी बंद होऊन तुझा सर्व विस्तार अगदीं निश्चल दिसतो; कधीं नुकताच सूर्योदय झाला असल्यामुळें क्षितिजाची कड रुप्यानें जणूं काय मढविलीच आहे अशी भासते; कधीं तोच सूर्य अस्तास जाऊं लागून संध्याकाळचें आकाश त्याच्या सोनेरी किरणांनीं देदीप्यमान झालेलें असते, व अशा वेळेस आरशाप्रमाणे स्थिर अशा तुझ्या पाण्यावर जेव्हां आकाशाची कमानच्या कमान शाबूत उठलेली असते, तेव्हां तर ती शोभा काय सांगावी! पण हीं सर्व सौम्य रूपें टाकून जेव्हां तूं आपलें उग्र स्वरूप धारण करतोस, जेव्हां काळ्या दाट ढगांनीं आकाशांत गाढ अंधार होऊन तुफानी वाऱ्यांच्या सोसाट्यांनीं तूं अगदीं खवळून जातोस, व तुझ्या प्रचंड लाटा उसळून मेघमंडळाशीं एकवट होऊं पाहतात, जेव्हां मृत्यु आपलें भयंकर आधिपत्य तुजवर चोहोंकडे गाजवीत असतो, जेव्हां अशा तडाक्यांत सांपडलेला बिचारा खलाशी भयानें गर्भगळित होऊन त्याचे सर्व प्रयत्न निष्फळ होतात, व त्याचे इष्टमित्र त्याजकरितां जागच्या जागीं हळहळत असतात, अशा भयंकर प्रसंगीं तुजकडे पाहण्याची कोणाची छाती आहे!

हे रत्नाकरा! इतकें झालें तरी हे सर्व खेळ केवळ तुझ्या पृष्ठभागावरचे! तुझें आंत जें विस्तीर्ण राज्य आहे त्यांत तर काय

काय चमत्कार असतील याची कल्पना तरी कोणीं करावी! तेथें जे मोठमोठाले खडपे व विशाल दऱ्या असतील, त्यांत जे नानाप्रकारचे हजारों प्राणी व वनस्पति असतील, त्या पाहिलेला कोण मनुष्य आहे! तसेंच रत्नें वगैरे ज्या कोट्यवधि सुंदर वस्तु तुझ्या तळीं लोळत असतील, त्यांचा तरी कोणास पत्ता लागेल काय?

याप्रमाणें विचार पुढें चालले असतां बुद्धि अगदीं कुंठित होऊन जाते. पण जेव्हां तुझ्या भरतीओहोटीविषयीं विचार करावा--की, जगाच्या आरंभापासून आजपर्यंत ज्या कधींही टळल्या नाहींत-- तेव्हां, ज्यानें आपल्या अपार सामर्थ्यानें तुला निर्माण केलें व तुझ्या मर्यादा अशा रेखून टाकल्या कीं, तूं एवढा उच्छृंखल खरा, परंतु त्यांचें उल्लंघन तुझ्यानें होऊंच नये, त्याच्या अगाध मोहम्याकडे लक्ष लागून विचारशक्ति गुंग होऊन जाते, व तिची गतिच पुढें होत नाहीं!

**वि. कृ. चिपळुणकर.** शाळापत्रक.

---

## पाठ ३७ वा.



### भुतें.

भुतांविषयीं चोहोंकडे ऐकूं येणाऱ्या गोष्टी सगळ्या निव्वळ गप्पा आहेत, असाच सिद्धान्त होतो. या म्हणण्याबर कोणी कदाचित् अशी शंका काढतील कीं, असें निखालस एकदम कसें म्हणावें?

जिकडे तिकडे साऱ्या जगभर ज्या भुतांच्या गोष्टी ऐकूं येतात, त्यांपैकीं पुष्कळ जरी लुच्चे किंवा भोळसर लोकांनीं सांगितलेल्या असल्या, तरी त्यांपैकी कांहीं तरी खऱ्या झालेल्या असाव्या. उगाच आगीशिवाय धूर कसा निघेल? हें म्हणणें सकृद्दर्शनीं बरेंच समंजस वाटतें; व कित्येक नामांकित ग्रंथकारांनीं असाच मुळमुळीत अभिप्राय देऊन ठेविला आहे. पण अंमळ विचार केला असतां कळून येईल कीं, अशा ठिकाणीं सगळ्या जगाचा अभिप्राय कांहीं उपयोगीं पडावयाचा नाही. 'पांचां मुखीं परमेश्वर' वगैरे म्हणी अशा ठिकाणीं बिलकूल लागू पडत नाहींत. एखाद्या रत्नाची परीक्षा करणें असतां ती जशी लोकांचा मोठा जमाव जमवून त्यांच्या बहुमतानें ठरविणें केवळ अप्रयोजक होईल, त्याचप्रमाणें जेथें बुद्धीच्या सूक्ष्मत्वाचें काम लागतें, तेथें सगळ्या जगाचे मत घेण्यांत कांहीं जीव नाहीं. पहिल्या उदाहरणांत रत्नपारख्याचें एकाचें मत जसें लक्षावधि मनुष्यांच्या मताहून ज्यास्त योग्यतेचें धरावयाचे, त्याप्रमाणेंच दुसऱ्या उदाहरणांत तत्त्वविवेचकाचें मत साऱ्या जगाहून भारी असें समजावें. पृथ्वी फिरते कीं अचल आहे, अटलांटिक महासागराच्या-पलीकडे भूमि आहे कीं नाहीं, या दोन्ही वादांत जसें सगळ्या दुनियेचे मत खोटें ठरून, व पोपमहाराजांचेंही आज्ञापत्र मधल्या मधेंच राहून, ग्यालिलिओ व कोलंबस हेच शहाणे ठरले, त्याचप्रमाणें आजपर्यंत हरएक गोष्टींत होत आहे. उघडच आहे, ज्याची दृष्टि शाबूत आहे, अशा एकट्या मनुष्याचें

पहाणें खरें, कीं शंभर आंधळे आहेत आणि पांचपन्नास डोळ्यांवर सारा आलेले लोक आहेत त्यांचें बहुमत खरें ? आतां हीच गोष्ट प्रस्तुतच्या वादास लावून पहा. लाखों लोक भुतांविषयीं अंधपरंपरेनें चालत आलेल्या गोष्टी सांगतात; कांहीं थोडेमात्र आम्हीं तीं पाहिलीं म्हणून सांगतात. पण हे लुच्चे, भोळसर, किंवा वेडगळलेले अशा प्रकारचे; पण वरील दोन्ही प्रकार ज्यांचे नाहींत, ज्यांचें मन नव्या आरशासारखे स्वच्छ, त्यांसमात्र कोणताच अनुभव प्रत्यक्ष घडत नाहीं. तेव्हां अर्थात् नकाराकडेच त्यांचा कल होतो. असो. तेव्हां पिशाचादिकांच्या गोष्टी साऱ्या जगभर जरी आहेत, तरी त्यांवरून कांहीं निष्पन्न होत नाहीं. कां कीं, मनुष्याच्या मनाचा हा धर्मच आहे की, डोळ्यांस जसे नानाप्रकारचे आभास होतात, त्याचप्रमाणें त्यासही व्हावे. म्हणजे डोळ्यांस जसें सूर्यबिंबाचें संध्यासमयीं प्रसरण व आरक्तता, अरण्यांतील मृगजल वगैरे अनेक आभास होतात, त्याचप्रमाणें मनासही होत असतें. हे भ्रम विचारांच्या योगानें मनुष्यास जसजसें यथार्थ ज्ञान प्राप्त होतें, तसतसे नाहींतसे होत जातात. पण हें जेव्हां नसतें, तेव्हां वरील आभासांचा मनुष्याच्या मनावर पूर्ण अंमल चालू असतो. जसें, लहानपणी, मादक पदार्थांचे सेवन केलें असतां, किंवा ज्वरसृष्टींत, मनुष्याला जे जे भास होत असतात, ते ते सर्व खरेच वाटत असतात; म्हणून त्यांतून सुटल्यावरही पाहिलेल्या सर्व गोष्टी खऱ्याच असें कोणी तरी म्हणेल काय? तरी याप्रमाणें अज्ञानाच्या वेळीं लोकांची एकंदर स्थिति

असत. खरेंखोटें निवडण्यापुरता त्या वेळेस लोकांच्या बुद्धीस पोक्त-पणा आलेला नसतो. असो. तर ज्या अर्थी भुतांविषयीं प्रमाण म्हणजे अशाच भ्रांतींत बुचकळत राहिलेल्या लोकांचें धरावयाचें त्या अर्थी अशांची संख्या केवढी असली, किंवा कधीं कधीं मोठ्या नामांकित ग्रंथकारांचेही तसेच समज झालेले असले, तरी तेवढ्यानेंच त्यांचीं मतें खरीं होतात असा अर्थ नाहीं.

असो! तर याप्रमाणें भुतांखेतांविषयीं जो बारीक रीतीनें विचार करील त्याचा एकंदर कल आमच्यासारखाच होईल. तो असा कीं, प्रत्यक्ष प्रमाण म्हणून त्यास बिलकूल मिळणार नाहीं. तसेंच ज्याच्या खरेपणावर त्याचा पूर्ण विश्वास आहे, असाही मनुष्य मीं भूत पाहिलें, असें प्रतिज्ञेवर सांगणारा त्यास अगदीं सांपडणार नाहीं. शिवाय इतकेंही न करतां प्रकृत विषयाविषयी जो आपणा-शींच वस्तुतः शोध करूं लागेल, त्यासही त्याचा शुष्कपणा पूर्ण कळून येईल. तो असा कीं, या सर्व अज्ञान लोकांच्या भ्रांति असून खरें पाहूं गेलें असतां त्यांत तथ्य हें मुळींच संभवत नाहीं. या असंभाव्यतेचीं कांहीं प्रमाणें सांगतों. एक हें कीं, भुतें जर दिसतात, तर जीं आपणांस माहीत आहेत तेवढींच कां दिसावीं? शंभरदोनशें वर्षांमागील एखादें भूत आतां कां दृष्टीस पडूं नये? तसेंच, मनुष्यांचींच तेवढीं भुते कां व्हावी? देह सोडून गेलेला आत्मा म्हणजे जर भूत, तर पशुपक्ष्यादिकांचाही तसा प्रकार दृष्टीस पडावा; कां पडूं नये? मग आमचा मेलेला घोडा किंवा कुत्रा भूत होऊन खिंकाळतो किंवा भोंकतो, असें कोणाच्या सांग-

ण्यांत येत नाहीं, हें कसें ? असो. तेव्हां यावरून उघडच दिसतें कीं, या सर्व ज्याच्या त्याच्या मनास भासणाऱ्या शुष्क भ्रांति आहेत. जें ज्या वेळेस मनांत फार भरले असतें, तें जसे स्वप्नांत क्षणभर प्रत्यक्ष दिसतें, किंवा अंमलाच्या गुंगींत जसा प्रकार होतो, तसाच कल्पनाशक्ति अनावर होऊन उच्छृंखल झाली असतां होतो. हा प्रकार मुलांत व अज्ञान लोकांत काय तो दृष्टीस पडतो याचेंही कारण तेंच. ज्याची विचारशक्ति कल्पनेहून प्रबळ झाली, त्याच्या भूत कधींही वाटे जाणार नाहीं ! आमच्या इकडच्या प्रांतांत भुतांविषयीं कोंकण फार प्रसिद्ध आहे. यावरून ' कोंकणचीं भुतें ' अशी म्हणही पडली आहे. पण हींच भुतें शहरांत वगैरे कधीं दृष्टीस पडत नाहींत, याचें कारण काय ? शेकडों साहेब लोक लोकवस्तीपासून दूर अशा बंगल्यांत किंवा तंबूंत निराळेच राहिलेले असतात, पण त्यांस कधींही पिशाचानें पछाडलेलें ऐकण्यांत नाही. ते रानें तोडतात, डोंगर पोंखरतात, पण कोणीही त्यांच्या वाटे जात नाहीं. त्यांच्या उग्र स्वरूपानें भुतांचाही थरकांप होतो कीं काय कोण जाणे ! असो. तेव्हां एकंदरींत सर्व प्रकार निव्वळ भीतीचे आहेत. ' भित्यापाठी ब्रह्मराक्षस ' या म्हणींत तरी हाच अर्थ सुचविला आहे की, भुतें, ब्रह्मराक्षस हे सर्व कल्पनेचे खेळ आहेत. सुविचाराचे योगानें ज्यानें तत्त्वशोध केला, त्यास भुतपिशाचादिकांची शंकाही मनांत यावयाची नाहीं, मग भीति तर कोठली ?

**वि. कृ. चिपळूणकर.** निबंधमाला.

---

## पाठ ३८ वा.



### नशीब.

प्रत्येक मनुष्याचें जीवित म्हणजे, कारणें आणि त्यांचीं कार्यें यांची एक सांखळी आहे, व म्हणून कारणाशिवाय कार्य, ज्याला व्यवहारांत " नशीब " म्हणून म्हणतात तें, कोणत्याही मनुष्याचे जीवितांत असणे शक्य नाहीं. सगळें विश्वच कार्यकारणभावानें बांधलें गेले आहे. तेव्हां दुनियेत कोठेंसुद्धां ज्याला " नशीब " म्हणून म्हणतात तसलें कांहीं नाहींच नाहीं. आम्हांस अगदीं नको असलेले एखादें संकट आम्हांवर आलें कीं, " काय करावें, माझें नशीब फुटलें " म्हणून दैवावर चरफडण्यांत कांहीं हांशील नाहीं. तुमचेवर आलेल्या संकटाचीं खरीं कारणें, तुमच्या स्वतःच्या अंतर्यामींच आहेत; त्यांस तेथून काढून लावा, आणि त्यांच्या उलट कारणांची तेथें स्थापना करा, कीं, तुमचें फुटकें नशीब नाहींसें होऊन तुमचें दैव उघडेल. हा न्याय शरीराच्या, मनाच्या आणि एकंदर मानवी जीविताच्या प्रत्येक स्थितीला एकसारखा लागू आहे. जी जी बरीवाईट स्थिति आम्हांस प्राप्त होते, ती ती आम्हीं स्वतःच बोलावून आणलेली असते. तें बोलावून आणणें आम्हीं जाणूनबुजून केलेलें असो, किंवा आमचे हातून न कळत झालेलें असो. आम्हीं स्वतः होऊन बोला-विल्याशिवाय, बरीवाईट कोणतीही स्थिति, आम्हांस प्राप्त

होणें शक्यच नाहीं. हें म्हणणें कित्येकांस विषतुल्य वाटेल, आणि त्यांचा यावर विश्वासही असणार नाहीं. पण याच मंडळीनें आपापलीं मनें शांत व स्वस्थ करून विचार केला, आणि विचार-रूपी शक्ति किती जबरदस्त व श्रेष्ठ आहेत, आणि त्यांचीं कार्यें तरी कशीं मुकाट्यानें आणि किती सफाईनें व सूक्ष्मपणानें, म्हणजे आमच्या मंदबुद्धीला न समजतां, सर्वत्र व एकसारखीं होत आ-हेत, वगैरे गोष्टींचें मनन केले कीं, मग त्याला आमचे म्हणण्याचा खरेपणा पटेल, आणि त्याला त्याची प्रचीतीही येईल.

आपणांस जी जी स्थिति प्राप्त होईल, तीपासून सुख किंवा दुःख करून घेणें, हें पूर्णपणे आमच्या हातांत आहे. या संसारांत घडणाऱ्या कोणत्याही गोष्टीपासून आम्हांस त्रास म्हणून कसा तो होऊंच नये, अशी जर आमची इच्छा असेल, तर आम्हीं आमचा पाया भक्कम केला पाहिजे. सगळ्या जगावर सत्ता चालवील इतकें आपलें मन आम्ही मजबूत केलें पाहिजे. आम्हीं पाहिजे तर जगावर सत्ता चालवावी, नाहीं तर त्याची ताबेदारी पत्करावी. आमचा पाया जितका मजबूत असेल, तितकें आमचे शरीर आणि मन हीं बळकट होतील; आणि त्या अगाधशक्ति ईश्वराशीं असलेलें आमचें ऐक्य आमच्या नित्याच्या आचरणांत आम्ही जितकें ज्यास्त दाखवूं, तितका आमचा पाया मजबूत झाला म्हणून समजावें.

पण हा तुमचा पाया जर सुटला, तर मग सृष्टींतील कोणतीही यःकश्चित् गोष्ट तुमची मान वांकवील, तुम्हांस त्रास देईल,

तुमचें पाहिजे तेव्हां व पाहिजे तितकें नुकसानही करील. मग तें नुकसान तरी तुम्ही मुकाट्यानें सोसा किंवा सृष्टीची एकंदर घटना केवळ आपलें कल्याणच करील अशी असतां, तिला व्यर्थ दोष लावून रिकामी कुरकूर व धडपड करण्याचें तरी सोडून द्या. एका सत्पुरुषानें म्हटलें आहे कीं, " ज्याचे मनाला कांहीं व्यंग नाहीं, ज्याचे मनांत कांहीं दोष किंवा कमतरता नाहीं, त्याला या सृष्टींतही व्यंग, दोष किंवा कमतरता दिसावयाची नाही. पण ज्याचे मनाला क्षतें व व्रण पडलेले, त्याला सृष्टिरचनेंतही जिकडे तिकडे क्षतें व व्रणच दिसावयाचे. "

आत्म्याचे डोळे म्हणजे मन. स्वतः मनालाच कावीळ झाली असली, म्हणजे बाकीच्या सगळ्या दुनियेला कांहीं झालेलें नसलें, तरीही तिला कावीळ झाल्याचा भास, त्या कावीळवाल्या मनाला होतो. माझें नशीबच फुटलेलें, हेंच वाईट, तेंच बिघडलेलें, सृष्टीची रचना पाहिजे तशी ईश्वरानें केलेली नाहीं, वगैरे निराशेचे आणि असंतोषाचे उद्गार आपले तोंडांतून जे लोक एकसारखे काढीत असतात, त्यांचे मनाला कावीळ झालेली आहे, म्हणून खास समजावें. या त्यांच्या असमाधानामुळें आणि कुरकुरीमुळें त्यांच्या मनांचा रोग उघडकीस येतो एवढेंच. त्यांला त्यापासून दुसरा कांहींही फायदा होत नसतो. तेव्हां त्यांनीं आपली कुरकूर सोडिली, तर निदान त्यांच्या मनांचें हिडिस, ओंगळ व रोगट स्वरूप तरी लोकांना दिसणार नाहीं. बरें, याच्या उलट ज्यांच्या आंतल्या डोळ्यांना कावीळ झालेली नाहीं, ज्यांचे मनांवर या

बाहेरच्या सुंदर व परिपूर्ण सृष्टीचें प्रतिबिंब जसेंच्या तसें, जराही बिघडल्याशिवाय पडत आहे, त्यांना या दुनियेंत असंतोषाला कारणच मिळत नाहीं. त्या मनाच्या काविळीमुळें पीडिलेल्या हताश माणसांची दुनिया अगदीं निराळी, आणि यांची दुनिया अगदीं निराळी.

वाचकहो, ही तुमच्या मनाची कावीळ बरी होऊं द्या, कीं आज जें जग तुम्हांस अपूर्ण व दोषयुक्त भासत आहे, तें लगेच परिपूर्ण व निर्दोष दिसूं लागेल. पूर्वी तुमच्या स्वप्नांतही नव्हतें इतकें सौंदर्य, याच जगांत तुम्हांस आढळून येईल. व मग कवींनीं वर्णिलेला तो स्वर्ग, तें नंदनवन, ते सर्व दिव्य लोक हीं कांहीं दुसरे कोठें नाहींत, तर तीं सारीं येथेंच, याच जगांत आहेत, अशी तुमची खात्री होईल. " न देखे रवि, ते देखे कवि " या म्हणीचा तरी अर्थ काय, कीं साधारण मनुष्यास सूर्याच्या प्रकाशानें ज्या गोष्टी दिसत नाहींत, असल्या गोष्टी याच जगांत कवीला दिसतात. उघड आहे, कवीचें मनच स्वयंप्रकाश झालेलें असतें. कवीचें तेज म्हणजे सूर्याला तेज देणाऱ्या परमात्म्याचें तेज. तेव्हां खऱ्या कवीपुढें किंवा खऱ्या महात्म्यापुढें, सूर्यप्रकाशाची किंवा खुद्द सूर्याची तरी मातब्बरी काय असणार ?

**न. बा. जोशी.** अनंताशीं साधर्म्य, ग्रंथमाला.

---

## पाठ ३९ वा.



### मृत्यु भयंकर कोणाला ?

मृत्यु न म्हणे हा भूपती । मृत्यु न म्हणे हा चक्रवर्ती ।
मृत्यु न म्हणे हा करामती । कैवाड जाणे ॥ १ ॥
मृत्यु न म्हणे स्वाधीन । मृत्यु न म्हणे पराधीन ।
सकळ जीवांसि प्राशन । मृत्युचि करी ॥ २ ॥
चारी खाणी चारी वाणी । चौऱ्यांशीं लक्ष जीवयोनी ।
जन्मा आले तितुके प्राणी । मृत्यु पावती ॥ ३ ॥
मृत्यु न म्हणे थोर थोर । मृत्यु न म्हणे हरिहर ।
मृत्यु न म्हणे अवतार । भगवंताचे ॥ ४ ॥

—दासबोध.

दुधानें भरलेल्या हौदांत एक विषबिंदु सांडावा, दारूनें भरलेल्या कोठारांत एक ठिणगी पडावी, धेनूंच्या खिल्लारांत एखादा व्याघ्र शिरावा, म्हणजे जसा त्यांचा सत्यनाश होतो, त्याप्रमाणेंच ऐहिक सुखामध्यें व वैभवामध्यें मृत्यु घुसल्यामुळें त्यांचाही सत्यनाश उडाला आहे. मृत्यूइतकें भयंकर दुसरें कोण आहे ? मृत्यूपेक्षां अधिक मोठा घात तो कोणता ? इहलोक नष्ट होण्याइतकी दुसरी हानि ती कोणती ? मृत्यूची अंधुक अंधुक मूर्ति जरी डोळ्यांसमोर उभी राहिली, अंतःकरणांत एकवार त्याचें यथातथ्य स्मरण जरी झालें, तरी तेवढ्यानें केवढाही धैर्यवान् प्राणी असो,

केवढाही शूर असो, केवढाही कर्तबगार असो, त्याचे हातपाय लटपटतात, त्याची उमेद खचून जाते, त्याच्या मनाची उडी जेथल्या तेथें मुरून जाते, त्याचे बेत थिजून जाऊन त्यांच्या बर्फाप्रमाणें शिळा बनतात, त्याच्या विकसित बुद्धिमत्तेपुढें धुकेंच पसरून दिशाभूल होते. किती भयंकर स्वरूप हें ! कोणी कितीही स्वेच्छाचारी असोत, कोणी कितीही पाषाणहृदयी असोत, ह्या मृत्यूसारखा स्वैर व पाषाणहृदयी आजपर्यंत कोणी झाला नाहीं, व पुढें होणारही पण नाहीं ! राव असो कीं रंक असो, लहान असो कीं थोर असो, स्त्री असो कीं पुरुष असो, अशक्त असो कीं सशक्त असो, पंडित असो कीं मूढ असो, शूर असो कीं भित्रा असो, वैद्य असो कीं रोगी असो, बाल असो कीं वृद्ध असो, सुष्ट असो कीं दुष्ट असो, गृहस्थ असो कीं संन्याशी असो, जनांत असो कीं वनांत असो, गुहेंत असो कीं राजवाड्यांत असो, सर्वांवर मृत्यूची झडप सारखीच ! त्याचे पाश पाहिजे तेथें, पाहिजे त्या वेळीं, पाहिजे त्याचा गळा गोंवावयास तयार असतात ! मृत्यूला काल नाहीं, वेळ नाहीं; शुभ नाहीं, अशुभ नाहीं; अमावास्या नाहीं, व्यतिपात नाहीं; हा सदासर्वदा तयारच ! त्याला गोहत्या नाहीं, ब्रह्महत्या नाहीं; स्त्रीहत्या नाहीं, बालहत्या नाहीं; त्याला पाप नाहीं, पुण्य नाहीं; त्याला विधि नाहीं, निषेध नाहीं; त्याला विचार नाहीं, अविचार नाहीं. मृत्यूची स्वारी केव्हां, कशी, कोंठें व कोणापुढें दत्त म्हणून उभी राहील ह्याचा नेम नाहीं.

तात्पर्य, प्राणी जन्मास आला—त्यानें शरीर धारण केलें कीं, त्यास ह्या भयंकर काळाच्या दाढेंत आज ना उद्यां, केव्हां तरी शिरलें हें पाहिजेच. तें ब्रह्मदेवासशुद्धां टळलें नाहीं. म्हणूनच आमच्या कविकुलगुरूनें म्हटलें आहे, " मरणं प्रकृतिः शरीरिणाम् " व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी, " जन्माच्या रूपाने मृत्युच ह्या लोकीं अवतार घेऊन आला आहे, " असे उद्गार काढले आहेत. हें जरी सर्व सत्य आहे, मृत्यु जरी इतका अपरिहार्य व इतका भयंकर आहे, तरी भयंकर कोणाला ? जे कर्तव्यपराङ्मुख होतात त्यांना. परंतु जे कोणी आपलें कर्तव्य उत्तम रीतीनें बजावून कृतकृत्य होतात, स्वधर्मनीति पाळून जे कोणी आपल्या जीविताचें सार्थक करतात, आपण कोण ? आलों कोठून ? आपलें कर्तव्य काय ? व आपणांस जावयाचें कोठें ? ह्याची ज्यांच्या अंतःकरणांत पुरी ओळख पटते, त्यांना मृत्यु हा मुळींच भयंकर नाहीं. एवढेंच नव्हे, तर तो आनंदाची खाण, सुखाचें सर्वस्व, शांतीचें स्थान, व विश्रांतीचें मंदिरच होऊन राहतो. मृत्यूचें रूपांतर स्वर्गारोहणांत होतें.

**कृ. ना. आठल्ये.** केरळकोकिळ.

---

## पाठ ४० वा.



## प्रसंग ही मित्राची कसोटी.

परम प्रिय, अत्यंत निरपेक्ष आणि माझ्या कल्याणासाठीं सदा दक्ष अशी ज्याविषयीं माझी समजूत, तो मोरोबा, माझा मित्र, काय किंमतीचा, आणि त्याच्यावर पुढें कोणताही भरंवसा आणखी ज्यास्त टाकणें कसें बिलकूल कामाचें नाहीं, या गोष्टीचा मी आपल्याशीच घटकाभर विचार करीत बसलो.

मोरोबा आजवर माझ्या कल्याणाविषयीं इतका कां तत्पर असे, व तो माझा परम प्यार मित्र, त्याच्या हातून मला वाटेल असेंच आचरण कां घडत आलें, या सर्वांचा संबंध आतां कसा नीट जुळूं लागला. माझी पोटची पोर म्यां एका थेरड्याच्या गळ्यांत, आणि त्याच्याजवळ पुष्कळ पैसा आहे एवढ्यासाठी, बांधावी हा विचार मोरोबाचा. पण ती ( बायको ) किंवा मी अशा गोष्टीला कदापि मान्य होणार नाहीं, ही गोष्ट मोरोबाला कशी कळली नाहीं कोण जाणे ! मनुष्य एकदां कोणत्याही गोष्टीविषयीं अत्यंत आतुर झाला, म्हणजे सारासारविचार व शक्याशक्यतेचा संभव ओळखणारी त्याच्यांतील अक्कल आपलें चंबूगवाळें उचलून पार चालती होते, हेंच खरें. मोरोबाला आपल्या यजमानाची मर्जी संपादावयाची असेल, किंवा कदाचित् त्याचे मनोरथ पूर्ण करून कांहीं डल्ला मारावयाचा असेल, पण तेवढ्याकरितां

माझ्या लाडक्या बगडीच्या जन्माचें वाटोळें करण्यास उद्युक्त होणें म्हणजे हा त्याचा केवढा अधमपणा! आणि त्यांतून मोरोबा म्हणजे माझा मित्र, प्रत्यक्ष भाऊ मानलेला! मित्र म्हणजे स्वतः-चाच एक अंश अशी समजूत सर्वत्र आढळते. या प्रपंचांत मित्र असा कांहीं एक पदार्थ आहे, म्हणून तर कित्येक वेळा समाधान वाटतें. सुखदुःखाच्या चार गोष्टी सांगून व ऐकून खच-लेली उमेद सांवरून धरणारा मित्राखेरीज अन्य कोण मिळणार आहे? आपल्या अंगीं काय चारदोन सद्गुण असतील, त्यांचा परिमळ फांकविण्याचें काम मित्राशिवाय दुसऱ्या कोणाच्या हातून घडणार? चुकूनवांकून एखादी गैर गोष्ट घडली, तर तिजवर पांघ-रूण घालणें फक्त एक मित्रच करूं जाणे! आणि संकटकाळ अथवा अडचणीचा प्रसंग ओढवला, तर त्या वेळीं हिम्मत देणारा व कूर्म-दृष्टि राखून आपला खांदा देण्यास पुढें सरसावणारा एका मित्रा-शिवाय दुसरा कोणी मिळावयाचा नाहीं. अशा अनेक कारणां-मुळें मी सदा मित्रासाठीं हपापलेला असे. सुखाचा उपभोग, दुःखाचे निवारण, सद्गुणाचें अभिनंदन, दुर्गुणाचा निषेध, संकट-काळचा खंबीर आसरा, लौकिकसंपादनाचा आधार, हिताची जोड, पुण्याकडे प्रवृत्ति वळवणारी, फार काय सांगावें, प्रपंचांतील दगदग व त्रास भासूं न देणारी साक्षात् देवता, म्हणजे काय ती एक मैत्री, असा अनुभव नसणारे दुर्दैवी या जगांत फारच थोडे असतील. शारी-रिक व्यंग किंवा पंचेंद्रियांपैकीं एखाद्या इंद्रियाची वाण एखादे वेळीं पत्करेल; पण प्रापंचिक वाण म्हणजे अर्थात् मित्राचा अभाव

खरोखर अगदीं दुःसह होय. हें कोणीही तेव्हांच कबूल करील. म्हणूनच मी सदा मित्रांचा भुकेला असे. मित्र म्हटला, कीं त्याला कोठे ठेवूं आणि कोठे नको, असे मला होई. पण जेव्हां ही मित्रांची संख्या बरीच वाढूं लागली, आणि साधारण परिचित मनुष्य असला की. लगेच त्याला मी मित्र मानूं लागलों, तेव्हां मला काळजीमात्र ज्यास्त लागत चालली. आज काय, अमका मित्र आजारी, उद्यां त्या मित्रावर संकट, परवां त्या तिसऱ्याची ही अशी हानि झाली, वगैरे ऐकिले म्हणजे मला चटपट लागून रहावी. असा प्रकार हरहमेश घडत असे; म्हणून, कुटुंब वाढूं लागलें. म्हणजे एकट्या कर्त्याला जशी पंचाइत ज्यास्त पडते, तशीच माझीही मित्रां-संबंधाने स्थिति होऊं लागली. याकरितां, आहेत त्या मित्रांपेक्षां ज्यास्त मित्र असणें बरें नव्हे, असा माझा निश्चय पूर्वीच झाला होता. पण मी पडलो भिक्षुक गडी. अठरा विश्वे दरिद्र आमच्याकडे आंतप्रांत भरलेले, आणि त्यात आणखी आम्ही शिष्ट, तेव्हां जरासा श्रीमंत, थोडासा ज्यास्त खटपटी, थोरांमोठ्यांच्या घरीं जाणारा-येणारा असा पाहिला, की त्याला मित्रांच्या माळेत ओढ-ण्याला मी जसा काय तिसऱ्या पायावर तयार. जरा खाऊन-पिऊन सुखी गृहस्थ पाहिला की, त्याच्याशीं घरोबा पाडण्याला आणि त्याची मित्रांत गणना करितां येईल अशी खटपट व दगदग सोसण्याला मी सदा जसा काय हपापलेला. मी मित्र संपादण्यांत तत्पर असें. किंवा तत्संबंधी माझी अनेक कारणांमुळें उत्सुकता विशेष, म्हणूनच मित्रांत मला खोटे असे फार लागत, व त्यामुळें

कैक वेळा मला वैतागही बराच येई. मी दशग्रंथी, सद्धर्मी, आचारशील, बालबोध, सगळें खरें. पण श्रीमंत किंवा सुखी लोकांना त्याचें काय? मी माझ्या परी होईल तितका त्यांचा स्नेह संपादन करीं; त्यांचे काम बिनखर्ची व्हावें म्हणून तळमळें; आज नाही पण प्रसंगानुसार आपली अडचण लहानमोठी कशीही असली तरी ती दूर होईल, या आशेवर अल्पस्वल्प तात्कालिक फायद्याकडे मी दुर्लक्ष करीं. पण त्यांचा ऐन वेळेस कांही उपयोग होत नसे, असे एकामागून एक पुष्कळ अनुभव मला आले. तेव्हांपासून मित्रांकरितां माझी हांव बरीच कमती झाली; तथापि एकदां स्वभाव बनला तो बनलाच. त्याप्रमाणें मी मित्र आणि मैत्री एतत्संबंधी माझे पूर्वीचे अनुभव एकीकडे गुंडाळून ठेवीं, आणि मित्र मित्र म्हणून धडपडत असे. वाई सोडल्यापासून पुण्यांत कांही मला म्हणण्याजोगे मित्र मिळाले नाहीत खरे; पण माझा मोरोबा म्हणजे मला एक परब्रह्म वाटे. मोरोबा श्रीमंत नव्हता किंवा म्हणण्यासारखी उच्च स्थितींतलीही त्याची राहणी नसे. विद्या, कीर्ति, द्रव्य, या तिहींपैकी कोणाचाच मोरोबास पाठिंबा नव्हता. आणि अशाच्या स्नेहापासून म्हणजे मला कांहीं प्राप्ति होईल, अशांतलाही प्रकार नसे. यामुळें मला वाटे, आमचा स्नेह—मोरोबाचा व माझा—खराखरा निरपेक्ष. माझा उपयोग त्याला नाही, आणि त्याचा मला नाहीं. उगीच जिवाला एक आपली विसांव्याची जागा असावी, म्हणून मोरोबाला मी अत्यंत प्रियमित्र समजत असें. पण मोरोबाची मैत्री सहेतुक असेल, म्हणजे अमुक एक कार्य साधण्यासाठीं त्यानें

माझ्याशीं हा स्नेह ठेविला असेल, ही कल्पनाही मला कधीं शिवली नाहीं.

**धनुर्धारी.** वाईकर भटजी.

---

## पाठ ४१ वा.



## देशाभिमान.

अलीकडे देशाभिमान या शब्दाचा ध्वनि अनेक ठिकाणीं व अनेक प्रसंगीं ऐकू येतो. जो उठला तो म्हणतो मी देशाभिमानी! देशस्थिति आहे तरी काय, याविषयींदेखील ज्यांनीं चांगला विचार केला नाही, तेसुद्धां आपणांस देशाभिमानी म्हणवून घेण्यास इच्छितात. परंतु या देशाच्या पंचवीस कोटी प्रजेपैकीं पुष्कळ खरे देशाभिमानी आहेत किंवा नाहीत, याविषयीं संशय आहे. लोकांस प्रिय तेवढेंच नेहमीं बोलणारा, हा खरा देशाभिमानी नाहीं. खोट्या समजुती अथवा वेडगळ आचार व विचार चालविण्याविषयीं यत्न न करितां डोळे मिटून त्यांप्रमाणे आचरण करणारा, अथवा आपले आचारविचारमात्र चांगले व दुसऱ्यांचे सर्व वाईट असें म्हणणारा, किंवा नेहमीं सरकाराविरुद्ध बोलणारा, हा खरा देशाभिमानी नव्हे. असले देशाभिमानी शतशः सांपडतात. असल्या लोकांपासून देशाचें खरें हित होईल,

असे समजणें चूक आहे. आपणांस भेसळ नाणें नको आहे, खरें नाणें पाहिजे आहे. आपणांस पोकळ अभिमानी नको आहेत. आम्हांस बरें वाटावें म्हणून केवळ आमच्या तोंडापुरतें गोड बोलणारे लोक आम्हांस नको आहेत. देशाभिमानाचें मिष करून आपलें हित साधणारे स्वकार्यसाधु आपणांस नको आहेत. ब्राह्मण व परभू, हिंदु व मुसलमान, हिंदु व पार्शी या परस्परांमध्यें द्वेष उत्पन्न करणारे आपणांस नको आहेत. देशाभिमान हा गुण फुकट येत नाहीं. ज्यास देशाभिमानी म्हणावयाचें, त्यास देशाची स्थिति होती काय व आहे काय हें समजून, त्याचें खरें हित कोणत्या उपायांनीं होईल, हें समजलें पाहिजे. इतकेंच नाहीं, तर निरपेक्ष बुद्धीनें ते उपाय करण्यास तो प्रवृत्त असला पाहिजे. मग ते उपाय लोकांस प्रिय असोत अथवा अप्रिय असोत. ते उपाय करण्यासाठीं पदराला खार लागला तरी, अथवा देह झिजविण्याचें कारण पडलें तरी, अथवा प्रसंगवशात् हालअपेष्टा सोसण्याचें कारण पडलें तरी, त्याची तयारी असली पाहिजे. आपले देशांत चांगल्या गोष्टी कोणत्या व वाईट कोणत्या, सत्य कोणतें व असत्य कोणतें, यांची निवड करून चांगल्याचें व सत्याचें दृढतर अवलंबन करणारा, व आपल्या देशांतील चांगल्या गोष्टींविषयीं व सत्याविषयीं अभिमान बाळगून व त्यांचें रक्षण करून जें जें हितकर अथवा सत्य दुसरे ठिकाणीं असेल, त्याचा स्वीकार करणारा तो असला पाहिजे. ज्या ज्या समजुती पोरकट आहेत. व ज्या ज्या चाली अपायकारक आहेत, त्या त्या चाल-

विण्यास यत्न करून सुधारणा करणारा तो असला पाहिजे. तात्पर्य, जें जें अहितकारक व असत्य त्याचा त्याग करणारा, व जें जें हित-कारक व सत्य त्याचे अवलंबन करणारा हा खरा देशाभिमानी आहे असें समजावें.

सत्य ही चीज आपले देशांत आहे व दुसरे देशांत नाहीं, ही समजूत, अथवा ती आपले देशांत नाहीं, दुसरे देशांतमात्र आहे, ही समजूत चुकीची आहे. ही गोष्ट मनांत न आणतां, अथवा सत्ताधीशांस गोड वाटावें म्हणून, आपल्या सर्व गोष्टींचा उपहास करणारे, अथवा परकीयांपासून ग्रहण करण्यासारख्या पुष्कळ गोष्टी असतां केवळ लोकप्रियता संपादन करण्याच्या हेतूनें त्या गोष्टींचा उपहास करणारे, खरे देशाभिमानी नाहींत. हे देशाचे हितकर्ते नसून देशाचे नुकसान करणारे आहेत, असें समजावें. वरील गुण ज्यांमध्यें आहेत तेच देशाभिमानी या नांवास पात्र आहेत. असे देशाभिमानी थोडे सांपडतात. असले देशाभिमानीमात्र पूज्य आहेत, असे समजावें. यांपैकीं इटलींतील प्रसिद्ध देशाभिमानी गारिबाल्डी हा एक होय. स्वदेशांत अधिकाऱ्यांपासून त्याचा छल होऊन त्यास स्वदेशत्याग करावा लागला; आप्त व इष्टमित्र यांस सोडून दूर जावें लागले; तेथेंही शत्रूंपासून त्रास होऊं लागला; खाण्या-पिण्याची पंचाईत पडूं लागली; प्रियपत्नी मेली. तात्पर्य, मनुष्यावर जे जे प्रसंग येऊन गुदरतात ते ते प्रसंग त्यावर येऊन गुदरले. तथापि धैर्य खचूं न देतां योग्य प्रसंग पाहून तो देशहिताकरितां आपला देह अर्पण करण्यास तयार झाला. त्याचे कृत्यांबद्दल

लोकांनीं त्यास नांवें ठेविलीं, परंतु त्याकडे लक्ष न देतां त्यानें देशसेवा केली; व संपत्ति मिळवून अथवा मान मिळवून स्वकल्याण करण्याचे जरी त्यास अनेक प्रसंग आले, तरी त्यांपासून तो अलिप्त राहिला. असले पुरुष विरळा सांपडतात. असले पुरुष ज्या देशांत जन्मास येतात तो देश धन्य; असले पुरुष ज्या माउलीच्या उदरीं जन्मास येतात ती माउली धन्य; अथवा ज्या स्त्रियांस असले पति प्राप्त होतात त्या स्त्रिया धन्य होत. असल्या पुरुषांचें चरित्र मुलांनीं वाचणें व आपल्या डोळ्यांपुढें ठेवणें हितकर नाहीं काय? त्यांची तसबीर डोळ्यांपुढें ठेवून त्यांचे गुणांची आठवण होण्यास साधन असणें चांगलें नाही काय? असो. याप्रमाणें थोर पुरुषांचे अंगांतील कोणते गुण मुलांनीं ग्रहण करावे, याविषयीं विचार झाला.

**शं. रा. हतवळणे.** सद्बोधमंदिर–सुशिक्षित स्त्री.

---

## पाठ ४२ वा.



## एका तत्त्वज्ञाची स्वोक्ति.

"अहो! मनुष्याचें ज्ञान फार फार झालें, तरी तें किती अत्यल्प! मीं आपला सारा जन्म ज्ञान संपादन करण्यांत घालविला ना? पण इतकें करून मला समजतें काय? सृष्टीच्या रहस्यांचा खुलासा लावण्याची उमेद धरून मी खोल खोल विचारांत जों जों शिरूं लागतों, तों तों माझी बुद्धि अगदींच गुंग होऊन

मला कांहींच कळेनासें होतें. पहिल्या पहिल्यानें माझी मति कांहींशी चालते खरी, पण माझें निश्चित ज्ञान तेवढेंच; त्यापुढें नुसत्या कल्पना बांधाव्या लागतात. एकूण अज्ञानदशेपेक्षां सज्ञानदशेंत मोठा विशेष म्हटला म्हणजे एवढाच कीं, सृष्टिकर्त्याच्या अपार योजनेचें आकलन होण्यास मनुष्याची बुद्धि किती पंगू आहे, याचा तींत असल्यानें पूर्णपणें सिद्धान्त होतो!

"आतां, सूर्याचें परिमाण व ग्रहांचीं अंतरेंही मला काढतां येतात. तसेंच, त्यांचे वेध घेऊन त्यांच्या गति वर्तविणें व मनास थक्क करणाऱ्या अशा त्यांच्या प्रदक्षिणांचे नियम सिद्ध करणें, ह्या गोष्टीही मला अगदीं सहज आहेत. हें सर्व खरें; परंतु त्यांची रचना कशी काय आहे, त्यांवर प्राणी वास करितात कीं नाहींत, करीत असले तर त्यांची जीवनस्थिति व राहण्याच्या सोयी कोणत्या प्रकारच्या आहेत, इत्यादींविषयीं माहिती माझी व अडाणी कुणब्याची सारखीच. पण हें फार दूरच्या अशा अंतरालांतील गोलांविषयीं झालें. ज्या पृथ्वीवर मी खुद्द राहतों तिच्या सृष्टिव्यवस्थेविषयीं तरी मला कितपत माहिती आहे? ज्या वायुजलादिकांस मूलद्रव्यें समजून पंचमहाभूतें अशी संज्ञा पूर्वापारपासून लोक देत आले, त्यांचेंही पृथक्करण करून त्यांच्या घटकावयवांस मीं नांवें दिलीं, हे खरें; पण अग्नीची दहनक्रिया कशी चालते, किंवा जलास प्रवाहीत्वधर्म कशामुळें आला आहे, इत्यादि गोष्टींचें उपपादन माझ्यानें करवेल काय? अग्नि व उदक हीं वस्तुतः काय आहेत, ह्या विचारसुद्धां कधीं मनांत न आणतां सर्व जग त्यांचें सेवन

करतें; त्यास वरील गोष्टीचा उलगडा पाडण्यास जशी मोठीच पंचाईत येऊन पडेल, त्याचप्रमाणें मलाही होतें; माझी कुशाग्रबुद्धि किंवा तत्त्वज्ञता हिची येथे यत्किंचित्‌ही गति न होतां, सारी माझी माझ्याचपाशीच राहते. पदार्थ निराधार असला कीं, तो जमिनीवर पडायचाच हा नियम सर्वत्र मी पाहतों; व शास्त्रकारांच्या उपपत्तीवरून मला असें समजलें आहे कीं, हें गुरुत्वाकर्षणाचें फल होय. पण हे समजूनही मला अधिक ते काय कळलें? ज्यास पूर्वी मी ‘पतन’ म्हणत होतो, त्यासच आतां ‘आकर्षण’ म्हणतो. एवढाच काय तो फरक! अवघ्या पदार्थमात्राची ज्या अतर्क्य व अदृश्य सूत्राच्या योगानें एका केंद्राकडे गति होत आहे, त्याच्या स्वरूपाचा बोध वरील शब्दानें मला यत्किंचित् तरी होतो काय? सृष्टिविषयक शास्त्रांत निष्णात झाल्यामुळे प्राणिवर्ग, उद्भिज्जवर्ग व खनिजवर्ग असे तीन मुख्य विभाग, तशाच अवांतर जाति व उपजाति, या सर्वांची निवडानिवड मला करतां येते. पण इतके परिश्रम करूनही हिरव्या गवताच्या एका पातीचा तरी पोषण-प्रकार माझ्यानें सांगवेल काय? मी फार फार सूक्ष्म विचार केला, तरी सृष्टिकर्त्या चतुर कारागिराचें जे मारू कलम वनपुष्पांस चित्रविचित्र रंगांनीं रंगवितें, त्याचा मला शोध लागेल काय? तसेच, माणिकावर व पाचेवर जे रंग झळकतात, व तऱ्हेतऱ्हेच्या शिंपांवर ज्या लकेरी मारतात, त्यांचें कारण तरी आजपर्यंत विचार करून मला काय उमगलें आहे? इतर प्राण्यांचें चातुर्य जे माझ्या नजरेस येतें, त्यास मी उपजतबुद्धि म्हणतो, व

मनुष्याच्या विचारशक्तीशीं ती कोणकोणत्या जनावरांचे ठायीं किती किती मिळू पाहते, याविषयीं माझा तर्क चालतो. परंतु एकंदरींत पाहतां, पशूस माझे मनोधर्म जितपत कळतात, तितपतच त्यांचेही मला कळतात, असें म्हणणें भाग येतें. जेव्हां पक्ष्यांचा थवा आकाशांत घिरट्या घालतांना मी पाहतों, किंवा एखाद्या दूरच्या प्रदेशाकडे त्यांचे कळप निघालेले असतात, तेव्हांचे त्यांचे संकेत-शब्द, पंडितांच्या भाषा जशा एखाद्या अक्षरशून्य मजुराला, त्याप्रमाणेंच मलाही अत्यंत गूढ होत. धर्मशास्त्रावरील ग्रंथांत जितकी त्यांची गति, तितकीच माझीही त्यांच्या वर्तननियमांत व व्यवस्थेंत होय.

“ हर हर ! एकूण ज्ञानाचा हव्यास धरून त्याच्या प्राप्तीस्तव सर्व जन्मभर जो मीं शीण केला, त्यासारखें सार्थक तें मला काय झालें ? माझी बुद्धि किती पंगू, व अज्ञान केवढें थोर, या गोष्टींचा पूर्ण प्रत्यय माझ्या मनास येऊन माझें क्षुद्रत्व मला स्पष्टपणें भासूं लागलें, इतकेंच कीं नव्हे ? शिव शिव ! मनुष्याच्या अंगीं पराकाष्ठेची विद्वत्ता आली, तरी आपला ज्ञानगर्व मिरविण्यास त्यास किती अत्यल्प अवकाश असतो ! त्याची बुद्धि वस्तुतः इतकी कोती असून व संपादिलेलें ज्ञानही तसेंच अपुरतें असून, नुसत्या भाषणाचा त्यानें गर्व वहावा व आपली योग्यता मोठी मानावी हा त्याचा केवढा मूर्खपणा ! ”

**कृष्णशास्त्री चिपळूणकर.** शालापत्रक.

---

## पाठ ४३ वा.



## आमच्या देशाचा प्राचीन इतिहास.

### भाग पहिला.

हिंदुस्थान देशाचा प्राचीन इतिहास मुळींच लिहिलेला नाहीं, अशी बहुधा सर्वांची समजूत आहे. खरें पाहिलें तर व्यवस्थित रीतीनें इतिहास लिहिण्याची चाल आमच्या लोकांत नव्हती. परंतु इतिहास अगदींच नव्हता, असें म्हणतां येत नाहीं. पुराणें हे ग्रंथ म्हणजे एक प्रकारचे इतिहासच आहेत. त्यांमध्ये काल्पनिक, अद्‌भुत आणि चमत्कारिक असें फार आहे. परंतु सर्व प्राचीन राष्ट्रांच्या इतिहासाची थोड्याबहुत प्रमाणानें हीच स्थिति आहे, असें आढळून येईल. आमच्या लोकांमध्यें थोडेंबहुत ऐतिहासिक इतिवृत्त कोठें लिहिलेलें असलें, तरी शक किंवा वर्ष नमूद करण्याची चाल नसे. यामुळें आमच्या जुन्या ग्रंथांतून जो थोडाफार इतिहास सांपडतो, तो असून नसल्यासारखा झाला आहे. मुसलमान लोकांमध्यें अखबार लिहून ठेवण्याची चाल फार होती, यामुळें त्यांच्या वेळापासून देशाचा संगतवार इतिहास सांपडतो. त्याच्या अगोदर म्हटलें तर ग्रीक लोकांनीं आणि त्यानंतर कित्येक बौद्धधर्मी चिनी प्रवाशांनीं इकडे येऊन त्या त्या वेळचें वृत्त लिहून ठेविलें आहे. त्यांतच आमच्या देशांतील राजांनीं ठिकठिकाणीं शिलालेख, ताम्रपट व इतर लेख यांमधून आपलें त्रोटक वृत्त लिहून ठेविलेलें

सांपडते. यामुळें सरासरीनें इसवी सनापूर्वींच्या सहाव्या शतकापासून–म्हणजे गौतमबुद्धाच्या धर्मसंस्थापनेपासून–मुसलमानांच्या स्वाऱ्यांपर्यंत आपल्या देशाचा इतिहास पुष्कळ संगतवार सांपडतो. यासंबंधाचे शोध अनेक इंग्रज ग्रंथकारांनी मोठ्या परिश्रमानें केले आहेत. त्यांतच त्यांना डॉ० राजेंद्रलाल मित्र, डॉ० भांडारकर, पंडित इंद्राजी, प्रो. पाठक, इत्यादि एतद्देशीय विद्वान् गृहस्थांचें फार साहाय्य झालें आहे. यामुळें थोड्या वर्षांनी हा इतिहास अगदीं वर्षवार व संगतवार तयार होईल, यांत शंका नाहीं.

याच्या पूर्वींचा इतिहास वेद, ब्राह्मणें, उपनिषदें, भारत, रामायण आणि इतर पुराणें यांमधून थोडाबहुत काढतां येतो; परंतु तो बहुतेक त्रोटक आणि कल्पनामय असणार. तथापि, या काळाच्या संबंधाच्या इतिहासाची सर्व देशांची स्थिति अशीच आहे. दुसऱ्या कित्येक देशांची गोष्ट लक्षांत आणून पाहिलें असतां एका प्रकारें आमच्याच देशाचा या काळांतला इतिहास ज्यास्त चांगला सांपडतो, असें अखेरीस म्हणावें लागेल.

तेव्हां आमच्या देशाचा प्राचीन इतिहास अगदींच नाहीं असें म्हणावयाचें कारण नाहीं. मागें सांगितल्याप्रमाणें इसवी सनाच्या पूर्वी सहाव्या शतकापासूनचा बराचसा संगतवार इतिहास आढळतो; आणि शोधक मनुष्याला उद्योग करून त्यांत नवीन शोधांची भर घालण्यास जागा आहे. शिलालेख, ताम्रपट, देवळांवरून वगैरे कोरलेले लेख, वगैरे ठिकठिकाणीं पुष्कळ आढळतात. ते सांप-

डतील तेव्हां हातचे जाऊं न देतां त्यांबद्दल ज्यास्त शोध करणें, हें प्रत्येक सुशिक्षिताचें कर्तव्य आहे.

बौध धर्मसंस्थापनेपासून आपले ग्रंथ पुष्कळ आहेत; परंतु ते बहुतेक सर्व धर्मसंबंधीं असल्यामुळें, आणि कांहीं केवळ सामाजिक स्थितीचे दर्शक आहेत यामुळे, त्या वेळचा संगतवार इतिहास त्यावरून काढितां येणे अशक्य आहे. परंतु त्यांवरून अनेक उपयुक्त कल्पना करितां येतात. आतां कोणी असें म्हणेल, कीं नुसत्या कल्पना करण्यांत काय अर्थ आहे? तर त्यावर उत्तर असें आहे की, असल्या गोष्टींच्या आरंभीं कल्पनाच व्हावयाच्या. मग त्या कल्पना खऱ्या की खोट्या, याची शहानिशा इतर प्रमाणांवरून होऊन त्या कल्पनांपैकीं ज्या विश्वसनीय ठरतील त्या राखून, ज्या खोट्या ठरतील त्या टाकावयाच्या. अर्थातूच ज्या कल्पना खोट्या ठरतील, त्या मग आपोआप नष्ट होतील. तेव्हां साधार कल्पना करणें कांहीं अनिष्ट नाहीं.

---

## पाठ ४४ वा.



## आमच्या देशाचा प्राचीन इतिहास.

### भाग दुसरा.

आपल्या पुराणादि जुन्या ग्रंथांतून अशा कल्पना आहेत कीं, उत्तरेकडे हिमालयांत किंवा त्याच्यापलीकडे देव राहतात. तिकडे

स्वर्ग आहे. हे देव आणि त्यांचे शत्रु दैत्य किंवा असुर यांच्यामध्यें प्राचीन काळीं निरंतर युद्धे होत. त्या वेळी देवांना साह्य करावयास भूलोकींचे पराक्रमी राजे जात. आतां, या कल्पनांमध्ये थोडें तरी तथ्य आहे, की सर्वच अद्भुत, खोट्या अशा आहेत? या अगदी खोट्या असतील, असे म्हणणे मुळीच योग्य होणार नाहीं. त्यांवर विचार करण्यासारख्या कल्पना बांधून त्यांतून सत्य उकळून काढितां येईल.

वेदधर्मी आर्यलोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वी पुष्कळ वर्षे ते आणि त्यांचे भाईबंद इराणी आर्यलोक हे वायव्य एशियेत एकत्र रहात होते. पुढे यांच्यामध्ये धर्मसंबंधानें भिन्न मत होऊन दोन पक्ष झाले. हे धर्मसंबंधी तटे विकोपास जाऊन दोन पक्षांत युद्धेही झालीं. असा प्रकार कित्येक वर्षे चालून वेदधर्मी आर्य सिंधुनदीकडे आणि हिंदुस्थानाकडे वळले, आणि पारशाचे पूर्वज इराणाकडे वळले. पुढे परस्परांस एकमेकांची आठवणही नाहीशी झाली. हीं भांडणे देवदानवाचीं युद्धे म्हणून आमच्या दंतकथांत प्रसिद्ध आहेत. हे देव कोण आणि दानव कोण? त्या वेळीं वेदधर्मी आर्यांना म्हणजे आमच्या पूर्वजांना देव किंवा सुर असे म्हणत; आणि पारशांच्या पूर्वजाना असुर, दानव, दैत्य, इत्यादि नावे देत. पुढें आमचे पूर्वज हिंदुस्थानच्या मैदानावर पसरल्यानंतर हिमालयांतल्या आणि त्याच्या वायव्येच्या हिंदुकुशपर्वतापर्यंतच्या प्रदेशांत पूर्वी आणि त्या वेळी रहाणारे लोक देव या नावाने मोडूं लागले. पुढें त्याच प्रदेशांस देवलोक, इंद्रलोक, स्वर्गलोक अशी नांवे पडलीं.

इंद्र म्हणजे सुराधिप, देवांचा मुख्य. परंतु हा शब्द ऋग्वेदांत राजा, राजाधिराज, अशा अर्थीं पुष्कळ स्थळीं योजलेला आढळतो. या इंद्राचीं असुरांजवळ युद्धे होत. म्हणजे अर्थात् पारशी लोकांचे जे पूर्वज त्यांच्यांपकी असणारे जे राजे त्यांच्याशीं, देव म्हणजे आमचे पूर्वज यांचे राजे म्हणजे इंद्र यांचीं युद्धें होत. प्राचीन काळी अगदी एकाच राष्ट्रांतल्या किंवा लोकांतल्या राजांची परस्परांत युद्धे होणे अशक्य नव्हते. या देवलोकीच्या इंद्रांना हे दानव किंवा असुर भारी झाले असतां, ते हिंदुस्थानांतल्या पराक्रमी राजांना साह्यार्थ बोलवीत. तेव्हां यावरून पुरूरवा, ययाति, दिलीप, दुष्यंत, दशरथ वगैरे राजे, आणि कृष्ण, अर्जुन वगैरे योद्धे देवलोकीं इंद्राला असुरांच्या विरुद्ध साह्य करण्यास जात, याचा खरा अर्थ काय हे लक्षांत येईल. पुरूरवा या राजाला इंद्रानें ऊर्वशी नांवाची अप्सरा दिली. म्हणजे अर्थात् तिकडली एक सुंदर स्त्री त्यानें मिळविली असाच अर्थ होय.

देवांचा मुलूख हिंदुकुश पर्वत, हल्लींचा पामीर नांवाचा प्रदेश, हिमालयांतला बराचसा प्रदेश इत्यादि ठिकाणीं पसरला होता, असें मानण्यास मुळींच चिंता नाहीं. कारण, चंद्रगुप्त, अशोक, कुमारपाल, विक्रमादित्य वगैरे थोर पराक्रमी राजे यांचें राज्य नेहमीं तेथपर्यंत पसरलेलें असे. प्राचीनकाळीं अफगाणिस्तान आणि त्याच्या उत्तरेचा आणि वायव्येचा प्रदेश हिंदुस्थानचा भाग गणला जात असे. या देवांच्या राज्याच्या वायव्येस असुरांचें राज्य असे. या असुरांना कित्येक ब्राह्मण अथवा वेदधर्मी आर्यही

मिळालेले होते. असुरांचा गुरु शुक्राचार्य हा ब्राह्मण. हा शुक्राचार्य, देवदानवांच्या युद्धांत जे असुर मरत त्यांस संजीवनी विद्येने पुन्हा जिवंत करी. परंतु देवांच्या पक्षाकडे जे मरत, त्यांना जिवंत करण्याची शक्ति देवगुरु जो बृहस्पति त्यास नव्हती. यामुळें त्यानें आपला पुत्र कच याला ती विद्या शिकण्यासाठीं शुक्राचार्यांकडे पाठविले. आतां देव आणि दानव हे युद्धांत मरत, आणि देवांना मृत्युलोकीच्या पराक्रमी राजांचें साह्य घ्यावे लागे, यावरून ते त्या प्रदेशांत राहणारे मनुष्यच होते, असे विचारान्ती दिसून येईल. शुक्राचार्य असुरांना जिवंत करी, म्हणजे त्यांच्या जखमा बऱ्या करून त्यांस पुन्हा उठवी. अशा प्रकारची शस्त्रवैद्याची विद्या ( Surgery ) त्यास अवगत होती. ती शिकण्यासाठीं देवांनीं आपल्या गुरुपुत्राला दैत्यगुरूकडे धाडलें. आमच्या लोकांना शस्त्रक्रिया अलीकडील काळांतही माहीत नव्हती, आणि हिंदुस्थानांत लढाईंत पडलेल्या लोकांची चांगलीशी काळजी घेण्याची चाल पूर्वीही नसे आणि अलीकडेही नव्हती, हें सर्वप्रसिद्धच आहे. तसेंच, शस्त्रक्रियेत—साधारणतः वैद्यकीत—वायव्य एशियेंतील आरब, तुर्क वगैरे लोक कुशल होते, असे इतिहासांत आढळतें. धर्मयुद्धे करणाऱ्या पश्चिम युरोपांतील ख्रिस्ती लोकांनीं वैद्यक आणि शस्त्रक्रिया या गोष्टी मुसलमानांपासून युरोपांत नेल्या, असें तिकडील इतिहासावरून दिसून येतें. तेव्हां देवांच्या गुरूचा पुत्र कच हा शस्त्रक्रिया किंवा जखमा बऱ्या करण्याची युक्ति शिकण्यासाठीं असुरांकडे जाऊन राहिला, ही गोष्ट खोटी नसावी. आपले

तरुण लोक परकी देशांत शिकावयास गेले असतां तिकडल्या स्त्रियांच्या प्रेमपाशांत सांपडून लग्नविधि करून येतील, अशी भीति आज जशी वाटते, तशी त्या वेळीही वाटत होती. कारण, शुक्रसुता देवयानी हिनें कचाला बहुतेक गंडा घातलाच होता; परतु तो दृढनिश्चयी म्हणूनच बचावला! असो. देवयानी हिला दानवांचा राजा वृषपर्वा याची मुलगी शर्मिष्ठा हिनें कूपामध्यें ढकलून दिले. तिला, देवांच्या पक्षाचा राजा ययाति हा मृगयेकरितां आला असतां त्यानें विहिरींतून काढून वांचविले. यावरून दानवाधिपति वृषपर्वा याचे आणि ययातीचे राज्य हीं जवळजवळच असलीं पाहिजेत. अर्थात् ययातीचा मुलूख हिंदुकुश पर्वताच्या दक्षिणेस हल्लींच्या अफगाणिस्तानांत कोठे तरी असला पाहिजे.

ही जी एका प्राचीन दंतकथेची संगति लाविली आहे, तीप्रमाणें दुसऱ्या अनेक कथांची संगति लावितां येईल. परंतु तसे करण्याचा उद्देश नाही. ही एक केवळ नमुन्यासाठीं गोष्ट सांगितली आहे.

रा. भि. जोशी. शालापत्रक.

# वाचनपाठमाला.

## भाग दुसरा.

## पुस्तक दुसरें.

### पाठ १ ला.

### धर्माची आवश्यकता.

पांडव वनवासास जाऊन द्वैतवनामध्ये प्रविष्ट झाल्यावर द्रौपदी आणि युधिष्ठिर यांच्यामध्ये संवाद झाला होता, त्याचे वर्णन महाभारताच्या वनपर्वामध्ये दिले आहे. द्रौपदी धर्मराजास म्हणते, " तुम्ही नेहमी धर्मास अनुसरून वागतां. धर्मासाठी भीमसेन, अर्जुन इत्यादि आपल्या बंधूंचा आणि माझाही त्याग कराल. धर्मापेक्षां श्रेष्ठ तुम्हांस कांही वाटत नाही. असें असून तुमची ही दुर्दशा. वनवासामध्ये नानाप्रकारच्या अडचणी व क्लेश तुम्हांस भोगावे लागतात! आणि दुर्योधन तर धर्मास एकीकडे सोडून, अधर्माचे आचरण करून साम्राज्यसंपत्ति भोगीत आहे. तर मग धर्माचा उपयोग काय? धर्म पाहिजे कशास? अधर्माने आचरण केल्यास त्यांत वाईट काय?"

त्यास धर्मराज उत्तर देतातः—

नाहं धर्मफलाकांक्षी राजपुत्रि चराम्युत ।

धर्मापासून मला फल प्राप्त व्हावें, अशी इच्छा धरून मी धर्माचरण करीत नाहीं.

अस्तु वात्र फलं मा वा कर्तव्यं पुरुषेण यत् ।
गृहे वा वसता कृष्णे यथाशक्ति करोमि तत् ॥ १ ॥

हे कृष्णे ! फल असो किंवा नसो, पुरुषाचें जे कर्तव्य—विशेषतः जें गृहस्थाचें कर्तव्य—तें मी यथाशक्ति करतो. फळासाठी धर्म करावा, अशाप्रमाणे मी धर्माचा विक्रा करीत नाही.

याप्रमाणे निष्काम धर्माचरण करणे हाच खरा मार्ग असें सांगून धर्मराज पुढे म्हणतातः—

अफलो यदि धर्मः स्याच्चरितो धर्मचारिभिः ।
अप्रतिष्ठे तमस्येतज्जगन्मज्ज्जेदनिन्दिते ॥ १ ॥
निर्वाणं नाधिगच्छेयुः जीवेयुः पशुर्जीविकाम् ।
व्याघातेनैव युज्येयुः न चार्थं कंचिदाप्नुयुः ॥ २ ॥

" हे अनिंदिते ! धर्मापासून कांहीं फळ नाही म्हणून त्याचा परित्याग करून अधर्मानें जर मनुष्यें वागूं लागली, तर हें जग कुठेंच आधार सांपडत नाहीं अशा अंधारांत बुडून जाईल; आणि मनुष्यास सुखप्राप्ति व्हावयाची नाहीं. पशूसारखे त्याचें जीवन होईल. त्यानें अंगीकारिलेल्या कार्याचा नाश होईल. आणि कोणताच इष्ट अर्थ प्राप्त व्हावयाचा नाहीं."

ज्यास जसें पाहिजे तसें तो करूं लागला, तर कशाचाच त्यावर आळा नाहीं किंवा बंधन नाहीं असें होऊन, कामक्रोधादिकांच्या योगे मनुष्यांचा परस्परांशी झगडा लागून, अहंतेच्या योगें एक दुसऱ्यास निष्ठुरतेने खालीं पाडण्याचा प्रयत्न करतो असें होऊन, कसलीच व्यवस्था नाही अशी स्थिति मनुष्यसमाजास प्राप्त होऊन, तो समाज नष्ट होऊन, पशु जसे आपापल्या गुहेमध्ये परस्परांपासून अलग राहतात, त्याप्रमाणे मनुष्ये राहू लागतील. सत्य आणि न्याय यांच्यावरती मनुष्यसमाज प्रतिष्ठित झाला आहे. त्यांचा नाश झाला तर त्या समाजाची इमारत ढांसळून पडेल. ' सर्वं सत्ये प्रतिष्ठितम् ' असे एक वाक्य आहे. सत्याच्या आधारानें सर्व कांहीं राहिले आहे. तेव्हां सत्य आणि न्याय यांस मनुष्याने झुगारून दिलें, तर समाज राहील कसा? आणि जितक्या प्रमाणानें ह्या दोन तत्त्वांचा प्रसार समाजामध्ये असेल, तितक्या प्रमाणानें दृढता आणि सुखसमृद्धि त्या समाजास प्राप्त होतात. सत्य, न्याय आणि दया अथवा प्रेम मनुष्यामध्यें नसलीं, तर निर्वाण म्हणजे मोक्ष अथवा प्रपंचामध्ये असून अत्यंत शांतीची अवस्था त्यास प्राप्त होणार नाहीं. हीं तत्त्वें नसून एखादा कारखाना काढला, किंवा राज्य प्राप्त करून घेतलें, तरी त्याचा नाशच व्हावयाचा. कारखान्यांत लागलेल्या मनुष्यांमध्यें परस्परांवर भरंवसा नसला, किंवा राजा प्रजेशीं न्यायानें वागत नसला, किंवा प्रजाही योग्य प्रसंगीं राजास साहाय्य करीत नाहीं असें झालें, तर तो कारखाना व तें राज्य चालेल तरी कसें?

म्हणून धर्माप्रमाणें आचरण झालें नाहीं, तर कोणताही अर्थ सिद्धीस जाणार नाहीं.

आतां तर हिंदुसमाजाला अशी स्थिति प्राप्त झाली आहे कीं, सत्य, न्याय आणि प्रेम यांचा प्रसार झाल्याशिवाय त्या समाजाची धडगत नाहीं. प्राचीन धर्मविधीवरील विश्वास उडाला, स्नानसंध्या सुटली, खाण्यापिण्याचे निर्बंध नाहींतसे झाले. द्रव्याची अनुकूलता असली म्हणजे पाहिजे तो परदेशप्रयाण करितो. आतां, स्नानसंध्या आणि खाण्यापिण्याचे निर्बंध हे केवळ वर्णधर्म आहेत; सत्य, न्याय आणि प्रेम इत्यादि शाश्वत धर्मांशी यांचा कांहीं संबंध नाहीं, असें जरी म्हटले, तथापि पूर्वींचे निर्बंध सुटले आणि त्यांबद्दल दुसरे कांहीं आले नाहींत, तर ही स्थिति भयावहच आहे. कारण, स्नानसंध्या व खाण्यापिण्याचे निर्बंध यांच्यायोगे सर्व प्रकारच्या नीतिवृद्धीस आवश्यक असें जे आत्मसंयमन, त्याचा संस्कार होत असे. आतां त्यांच्यावरील श्रद्धा उडाल्यामुळे तो संस्कार होत नाही असे झालें. शिवाय हा विश्वास नष्ट झाल्यामुळे खोट्याचाही प्रसार वाढला. कोणी पाहिजे तें खातो पितो, पाहिजे त्या मनुष्यानें शिजविलेले अन्न सेवितो, पण बाहेरून लोकांस आपण पवित्र आहो असें बुझावितो. तेव्हां त्याचेयोगें तर संयमनाचा प्रकार बुडाला तो बुडालाच, परंतु असत्यतेचा दृढ झाला, असें होतें. हें इष्ट आहे काय? जुने निर्बंध नाहींतसे झाले, तर मग शाश्वत धर्माचे दुसरे निर्बंध पूर्णपणें

मनुष्यास लावण्याचा प्रयत्न करावयास नको काय? म्हणजे सद्धर्माचा प्रसार करण्याविषयीं यत्न करूं नये काय?

तसेंच, हल्लींच्या स्थितीमध्यें आपणांस राजकीय सत्ता प्राप्त व्हावी, अशी इच्छा आमच्या मनांमध्यें प्रगट झाली आहे. तीस अनुसरून जे हक्क आम्हांस मिळाले व मिळत आहेत, त्यांची योग्य बजावणी करण्याकरितां सत्य आणि न्याय हे संस्कार आवश्यक नाहींत काय? शहराच्या व्यवस्थेची सत्ता आम्हांस प्राप्त झाली आहे; प्रांताच्या व्यवस्थेच्या संबंधाने कायदे करणें आणि दुसरे प्रकार यांविषयींही सत्ता प्राप्त होत आहे. ही सत्ता स्वार्थ सोडून निरपेक्ष राष्ट्रकल्याणेच्छा, सत्य आणि न्याय यांस अनुसरून आम्हीं बजाविली पाहिजे. नाहीं तर या नवीन हक्कांपासून आपले देशाचें कल्याण न होतां अकल्याणच होणार. शहरांत दिवे लावावयाचे त्यांपैकीं एक आपले घरासमोर लावावयाचा; खेड्यापाड्यांत करावयाचे रस्ते ते आपल्या घरावरून जातील अशी तजवीज करावयाची; असे प्रकार घडले असतांना ही नवीन मिळालेली सत्ता हानिकारकच व्हावयाची. तेव्हां अगोदर सद्धर्माचा प्रसार करण्याची योजना करून नंतर राजकीय हक्क मागण्यास प्रवृत्त झालें पाहिजे, किंवा दोन्हीविषयीं एकाच समयीं प्रयत्न झाले पाहिजेत. परंतु राजकीय हक्क मागणारे सद्धर्माच्या प्रसाराविषयीं यत्किंचित् तरी विचार करीत आहेत काय?

दुसरी गोष्ट सामाजिक सुधारणेची. याही ठिकाणीं धर्माचा संस्कार लागल्याशिवाय सुपरिणामाची प्राप्ति व्हावयाची नाहीं.

हलक्या जातींना वर काढणें हा जो उद्योग करितां तो श्लाघनीय आहे; परंतु हलक्या जाति वर चढावयास तयार असतात, पण त्यांच्या मनांमध्ये न्याय आणि समता इतकी कमी आहे कीं, त्यांच्याहून खालचे जातीला आपले बरोबरीस घ्यावयास, त्या तयार नसतात. इथेही समता आणि न्याय, हीं त्या जातीस वर काढण्यापूर्वी किंवा तत्समानकालीं शिकविण्याचा यत्न केला पाहिजे.

तसेच, तिसरी गोष्ट आपले देशाची संपत्ति वाढविणें, याविषयींची आहे. चोहोंकडे राष्ट्रामध्ये कारखाने उभे करावे, यांसंबंधी नवीन नवीन शोध लावण्याचीही योजना करावी, इत्यादि विचार आम्हांमध्ये उत्पन्न झाले आहेत. त्यांचेंही महत्त्व इतर गोष्टींसारखेच आहे. परंतु कारखाने व दुसऱ्या योजना यांच्यासाठी आवश्यक असा जो परस्परांविषयीं विश्वास, आणि शुद्ध मन आणि सत्य व न्याय यांस अनुसरून वागणे, यांचा संस्कार प्रथमतः लोकांस लाविला पाहिजे. तो संस्कार जर नसला, तर हे कारखाने आणि या योजना उदयास येणार नाहीत. तेव्हां याहीसंबंधाने पाहिले असतां धर्माची प्रवृद्धि करण्याचा उद्योग झपाट्याने चालविला पाहिजे.

सारांश, देशाची सर्व प्रकारे प्रगति व्हावयास सत्य, न्याय, राष्ट्रजनांविषयीं प्रेम हीं आपल्या लोकांच्या अंतःकरणामध्ये भिनून जातील, अशा प्रयत्नांची परम आवश्यकता आहे. परंतु जो उठला तो राजकीय हक्कांची गोष्ट प्रथम बोलतो, संपत्तिवृद्धीची नंतर, आणि त्यानंतर दीर्घकालानें समाजसुधारणेची. धर्मवृद्धीची तर

गोष्ट कोणीच काढीत नाहीं. हा चमत्कार काय? मला तर वाटतें कीं, ह्याची सर्वांचे अगोदर मोठीच आवश्यकता आहे.

आतां मनुष्य सहजस्वभावानें स्वार्थाकडे, अहंतेकडे फारच वळतो, आणि काम, क्रोध, इत्यादिक भावांस वश्य होतो; तेव्हां सत्य, न्याय आणि प्रेम यांची वृद्धि करणें हें कांहीं सोपें काम नव्हे. धर्मराजानें वर सांगितलेली निष्काम धर्मप्रवृत्ति अंतःकरणामध्यें उत्पन्न होणें ही सहजसाध्य गोष्ट नव्हे.

तेव्हां, ही गोष्ट साध्य करण्यास उपाय कोणते? एक तर सद्धर्माविषयीं श्रद्धा असावी; म्हणजे सत्य, न्याय, दया, दम आणि तज्जन्य शांति आणि समाधान यांची पुनः पुनः भावना करून त्यांचेविषयीं उत्पन्न होणारी जी साहजिक आवड ती दृढ करावी. ही गोष्ट दुर्बलतेनें सर्वांस साध्य होत नाहीं. म्हणून सद्धर्म हें ज्याचें स्वरूप, सत्य, न्याय आणि प्रेम हे पूर्णपणें ज्याचे गुण, जो परम दयाळू, जो सर्व विश्वाचा अधिपति, ज्याचा महिमा सर्व विश्वामध्यें अत्यंत रम्य स्वरूपानें नांदत आहे, जो सर्व पदार्थांच्या ठायीं आणि आमचे अंतःकरणाचे ठायींही वास करून सर्वांस उन्नत दशेप्रत नेत आहे, त्याला शरण जावें, त्याचें ध्यान करावें, त्याच्या आनंदाची, प्रेमाची भावना करावी. तोच माझा रक्षक असा अनन्यभाव अंतःकरणामध्यें दृढ करावा, हा या सर्वांस मुख्य उपाय आहे.

**डॉ० भाण्डारकर.** मनोरंजन.

---

## पाठ २ रा.



## पण लक्षांत कोण घेतो !

पुण्यास कसे चाबुकस्वार आहेत याची परीक्षा पाहण्याकरितांच कीं काय कोण जाणे, एकदां निजामानें, कोणाला आपल्या पाठीवर पाय टाकूं न देणारा असा दोन रिकिबींचा एक घोडा पुण्यास पाठविला. एका रिकिबीवरून चढतां न येणाऱ्या घोड्याला दोन रिकिबी लावीत असत. यावरून घोड्याच्या उंचीचा अदमास वाचकांनीं करावा. निजामानें ज्याच्याबरोबर घोडा पाठवून दिला होता, त्याजबरोबर श्रीमंतांना एक पत्र दिलें होतें. त्यांत लिहिलें होतें कीं, हें जनावर चांगल्यापैकीं आहे. परंतु कोणाला वर बसूं देत नाहीं; करितां आपल्या पदरच्या चाबुकस्वारांपैकीं याला कोणीं मऊ आणल्यास आमचेवर उपकार होतील. श्रीमंतांच्या पदरीं कांहीं थोडे थोडके चाबुकस्वार नव्हते. पण निजामाकडून आलेल्या त्या घोड्यानें सर्वांची अब्रू घेऊन सर्वांच्या पाठी मातीला लाविल्या. थोरले माधवरावसाहेब फार मानी, पुण्याची अब्रू चालली, या गोष्टीनें त्यांच्या मनाला फार फार वाईट वाटूं लागलें. ते स्वतः फार धाडसी. घोड्यावर बसण्याचा त्यांना मोठा अभिमान; तेव्हां आपण स्वतः या घोड्यावर बसून फेरफटका करावा व पुण्याची अब्रू राखावी, असेंही त्यांच्या मनांत घोळूं लागलें ! पुण्याची अब्रू न जाऊं देण्याबद्दल केवढा हा अभिमान ! नाहीं तर सध्यांची आमची पुण्याची मंडळी ! अब्रू राखण्याचें नांवच नको.

घालविण्याचेमात्र अटोकाट प्रयत्न चालले आहेत! असो. निजामाकडून आलेला घोडा कोणाला रिकिबीवर पाय ठेवूं देत नाहीं, हें पाहून अण्णा खासगीवाल्यांनीं श्रीमंतांना एके दिवशीं सांगितलें, " उद्यां मी घोड्यावर बसून फेरफटका करतों. एक मी तरी मरेन किंवा तो मरेल; पण त्याच्यावर बसून फेरफटका केल्याखेरीज त्याला मी पुण्यांतून जाऊं देत नाहीं." अण्णा म्हणतील तें करतील, याची श्रीमंतांना खात्री होती. अण्णांनीं मी त्या घोड्यावर बसतों असें सांगितल्यावर श्रीमंतांच्या मनांतली काळजी गेली. दुसरे दिवशी अण्णा कसा काय घोडा चालवितात, हें पाहण्याकरितां हजारों लोक जुळले. श्रीमंत स्वतः अण्णांची करामत पाहण्याकरितां आले. घोडा तयार करून आणिला. घोडा रिकिबीवर पाय ठेवूं देत नाहींना ? कांहीं चिंता नाहीं. आपण निराळ्याच रितीनें बसूं म्हणजे झालें, असा अण्णांनीं मनांत विचार करून, मोतद्दारांना घोडा धरून सावधगिरीनें उभे असा, म्हणून सांगितलें. अण्णा घोड्याच्या मागें पंधराएक हातांवर उभे राहिले, व तेथून धांवत येऊन त्यांनीं उडी मारली व ते अलगत घोड्याच्या पाठीवर स्वार झाले! वाचकहो, पायली दीडपायली रोजच्या आहाराच्या अण्णांनीं दोन रिकिबींच्या घोड्यावर उडी मारून स्वारी भरली, ती पाहून प्रेक्षकांना किती चमत्कार वाटला असेल ? अण्णा वर चढतांच घोडा मागच्या दोन पायांवर ताठ उभा राहिला. आतां आपल्याला हा खास पाडणार असें पाहतांच अण्णांनीं घोड्याच्या कानशिलावर एक चपराक लगावली. ज्या हातानें सहज

लीलेनें जाड अशा रुप्याच्या पंचपात्रीचा मुटका वळला, त्या हाताची त्वेषांतली चपराक काय विचारावी! तिनें त्या मस्त घोड्याच्या डोळ्यांतून रक्तच बाहेर काढले व वर गेलेले पुढचे दोन पाय मटकन भुईला लावविले. घोड्यानें पुढचे पाय जमिनीला टेकतांच अण्णांनीं टांच दिली; दोन घटका त्याला हवा तसा हिंडवून श्रीमंतांजवळ येऊन ते खालीं उतरले. जो तो अण्णांना शाबासकी देऊं लागला. खालीं उतरल्यावर अण्णांनीं घोड्याच्या मोतद्दारांस सांगितले कीं, अश्ववैद्याला दाखविल्याखेरीज त्याचा जेरबद सोडूं नका. अश्ववैद्यांनीं त्याला पाहिल्यावर सांगितलें की, अण्णांनी यावर बसून फेरफटका केला खरा, पण घोडा मारिला. त्यावर अण्णा म्हणाले, त्यानें माझ्या हातची चपराक खाण्याचा प्रसंग आणिला नसता, तर तो मेला नसता. जेरबद सोडल्यावर घोड्यानं आंग टाकलें व डोळे फिरविले. वाचकहो, पूर्वी अशा विलक्षण ताकदीचीं मनुष्ये आपल्या देशांत होती हे कांहीं दिवसांनी खरेदेखील वाटनासे होईल! पुढे कशाला, आजदेखील अशा गोष्टीवर विश्वास कसा ठेवावा, असे म्हणणारीं कांहीं माणसे आढळतात! पण सध्यां जे आपण मेषपात्र झालो आहोंत, ते असेच अधिकाधिक पुढे होत जाणार की काय. व हा मेषपात्रपणा टाकणे शक्य आहे की नाहीं. याचा विचार आपल्याला करायला नको काय? हा मेषपात्रपणा टाकला जाईल यांत काडीइतकी शंका नाही. पण प्रयत्न पाहिजे. श्रम करून भूक वाढविली पाहिजे; व खाल्लेलें अन्न पचविण्याकरितां श्रमच केले पाहिजेत.

**धुं. स. जोशी.** ऐतिहासिक लेख, प्रथमगुच्छ.

## पाठ ३ रा.



## तारुण्यचित्र.

राजपुत्र रासेलस याने निश्चय केला कीं, वागण्याच्या निरनिराळ्या तऱ्हांचा स्वतः अनुभव घेऊन त्यांतून विशेष सुखाची व उत्तम तऱ्हा कोणती हें निवडून काढावयाचें. मग प्रथम त्यानें असें मनांत आणिलें कीं, तारुण्य मुख्यत्वें सुखानुभवाचे वय होय. तर केवळ इच्छा तृप्त करणें हेंच आपलें मुख्य काम आहे, असें समजून, अनेक प्रकारच्या सुखांचा आस्वाद घेण्यांत जे सर्व वेळ घालवितात, अशा मनुष्यांच्या मंडळींत आपण शिरावें, व तो वर्तनक्रम कसा आहे हें पहावें. तो स्वतः तरुण, शहाणा व सधन असल्यामुळे चैनी तरुण मनुष्यांच्या मंडळीत शिरण्यास त्यास अगदी कठिण पडले नाही. परंतु त्या वर्तनक्रमाचा त्यास फारच लौकर कंटाळा व वीट आला; कारण त्या मंडळींत मसखरी पुष्कळ असे, परतु तीत खुबी किंवा मार्मिकपणा मुळींच नसे. कांहीं समर्पक कारण नसतां त्यांनी उगीच हसावें; खाणें, पिणे इत्यादि केवळ इंद्रियतृप्तीच्या ग्राम्य साधनांपलीकडे त्यांस कांहींच ठाऊक नव्हते. चातुर्य, कल्पनाशक्ति, युक्तिप्रयुक्ति इत्यादि मानसिक वृत्तींची ज्यांत गरज आहे, अशा वरच्या प्रतीच्या सुखांची ओळख त्या बापड्यांस स्वप्नींही नव्हती. त्यांची चाल छचोरपणाची व हलकट असे. नेमस्तपणा, व्यवस्थितपणा, मर्यादा इत्यादि आव-

श्यक गुणांचा ते मूर्खपणें उपहास करीत; परंतु कोणीं वजनदार मनुष्यानें त्यांकडे डोळे वटारून पाहिलें असतां ते दबत, व शहाण्यानें त्यांचा तिरस्कार केला असतां लाजून खालीं माना घालीत.

राजपुत्राने मनांत निश्चय केला की, ज्या वर्तनक्रमाची आपली आपल्यालाच लाज वाटते, त्याच्यायोगानें आपणांस कधींच सुख व्हावयाचे नाहीं. तसेच, त्याच्या मनांत आणखी असेंही आलें कीं, पूर्वी मनांत कांहीं उद्देश योजून, तो सिद्ध कसा होईल याचें कांहीं धोरण न धरतां वागणें, व यदृच्छेनें कधीं उल्हास पावणें व कधीं खेद पावणें, हे विचारशक्तिसंपन्न प्राणी जो मनुष्य त्यास उचित नव्हे. तो आपल्याशी म्हणाला, “ अहो, वास्तविक सुख म्हणतात, तें असें अनिश्चित व नश्वर नसावें; तर निश्चित व चिरस्थायी असेंच असलें पाहिजे.”

याप्रमाणें तो वर्तनक्रम अयोग्य समजून, तो टाकावयाचा निश्चय राजपुत्रानें स्वतः तर केलाच, परंतु त्या मित्रांची संगत सोडण्यापूर्वी शिकवणीच्या दोन गोष्टी सांगून त्यांचे कान उघडले तर उघडून पाहण्याचा यत्न केल्यावांचून त्यास राहवेना; कारण ते मित्र अविचारी होते तरी ते मनाचे मोकळे होते, व राजपुत्राशीं सौरस्यानें वागत असत; यामुळें त्यास त्यांचा कळवळा वाटला. मग एक दिवस तो त्यांस म्हणाला, “ मित्रहो, आपण ज्या रीतीनें आयुष्य घालवीत आहों, तिजविषयीं, व असे जर आपण वागलों, तर पुढें आपला परिणाम काय होईल, याविषयीं मीं शांतपणें विचार केल्यावरून मला असें दिसतें कीं, आपण

फार चुकत आहों. हल्लींच्याप्रमाणे वागण्यांत मोठें सुख होतें, असें आपण समजतों; परंतु वास्तविक पाहतां यांत आपला फार तोटा आहे. पहा, मनुष्यानें आपले तारुण्य असें खर्चिलें पाहिजे कीं, त्यास उतारवयांत दुःख व पश्चात्ताप हीं होणार नाहींत. जो विचार करीत नाहीं, त्यास शहाणपण कदापि येणे नाहीं. ज्याचा सर्व काळ थट्टामस्करींत व हुच्चेपणा करण्यांत जातो, तो शेवटपर्यंत अज्ञानच राहतो. तसेच, खाण्यापिण्यांत अनियमितपणे वागण्यानें घटकाभर जिवास हुषारी वाटून सुख झाल्यासारखे वाटतें खरें; परंतु तेणेकरून आयुष्य कमी होतें, किंवा अनिवार्य रोग जडतात. मित्रहो, आपण हे मनांत आणिले पाहिजे की, तारुण्य हें फार थोडा वेळ राहणारें आहे, चिरकाल राहणारे नाही. त्याची धुंदी अंगांत आहे तोपर्यंत हे ख्याली-खुशालीचे क्षुल्लक विषय गोड वाटतात; परंतु ती धुंदी निघून गेली, म्हणजे हेच विषय आपणांस अगदीं बेचव वाटू लागतील, व त्यां-पासून आनंद न होतां उलटा त्रास होईल. उतारवयांत मनुष्यास समाधान वाटण्याचे साधन म्हटले म्हणजे, परोपकार करणें व सज्जन आणि सुज्ञ पुरुषांत बोज असणे हेच होय. तर मित्रहो, आपण अद्यापि वाहवलो नाहीं तोंच आज सावध व्हावें व आपणांस पुढे उतारवय येणारें आहे, हे मनांत आणून आतां-पासून वागूं लागावे यांत शहाणपण आहे. नाही तर ही वेळ अशी अविचारांत निघून गेली, म्हणजे पुढें उतारवयांत आज केलेली मूर्खपणाचीं कृत्ये आपल्या जिवास खाऊं लागतील. आजच्या

अव्यवस्थित आहारविहारानें अंगांतील आरोग्य व शक्ति गमावून चिकटवून घेतलेल्या रोगांपासून मेरे तों पीडा सोसावी लागेल, व ती स्थिति फारच भयंकर आहे."

राजपुत्र असें भाषण करीत असतां हा काय बडबड करतो, असा विस्मय वाटून ते एकमेकांच्या तोंडांकडे टकटकां पाहूं लागले. सरते शेवटीं रहावेनासें होऊन त्या सर्वांनीं एकदम खद-खदां हासण्यास आरंभ केला. तेव्हां रासेलस खिन्न होऊन निमूट-पणे तेथून चालता झाला.

आपण ज्या गोष्टी बोललो त्या सर्व खऱ्या होत्या, व आपल्या मनांतला हेतु त्यांचें कल्याण करण्याचा होता, अशी त्याच्या मनाची पक्की खातरी होती; तथापि त्या छचोर लोकांनीं जो त्याचा उपहास केला त्यापासून त्यास वाईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

**कृष्णशास्त्री चिपळूणकर.** रासेलस.

---

## पाठ ९ था.



## प्रमाणांत सुख असतें.

आपल्या डोक्यांत कांहींसा लोण्यासारखा, पण त्याच्यापेक्षां फार थिलथिलित असा एक पातळसर पदार्थाचा गोळा आहे. त्याचाच शेपटासारखा एक भाग मागल्या बाजूस पाठीच्या

कण्यांत गेला आहे. ह्या सर्वांस आपण मेंद् म्हणतों. ह्या मेदूंतून त्याच पदार्थाचे अत्यंत सूक्ष्म असे तंतु शरीराच्या सर्व भागांतून गेलेले आहेत. त्या सर्वांची गणना करूं म्हटलें, तर कित्येक कोटि होईल ! एक पेलाभर पाणी घेऊन त्यांत अत्यंत सूक्ष्म जरी खडा टाकला, तरी पाण्याच्या सर्व परमाणूंस धक्का बसून गति उत्पन्न होते; त्याप्रमाणें या तंतूंच्या शेवटांस यत्किंचित् धक्का लागला असतांही त्या पातळ पदार्थाच्या परमाणूंत गति उत्पन्न होऊन डोक्यांतील मेदूत जाते, व त्या ठिकाणी सर्व मेद्मध्ये पसरते. याप्रमाणें मनाची जागरूक अवस्था प्राप्त होण्यास, ह्या ज्ञानतंतूमध्ये गति उत्पन्न होणें किंवा गतीत फेरफार होणें ह्या गोष्टींची आवश्यकता आहे. एखाद्या पदार्थाच्या आघातानें जेव्हां ज्ञानतंतूंत गति उत्पन्न होऊन ती मेदूंत जाऊन पोहोचते, तेव्हां त्या पदार्थाचें आम्हांस ज्ञान होते. ह्यासंबंधाने एकदोन उदाहरणे देतों, म्हणजे नीट समज पडेल. आपणांस वास येतो म्हणजे काय होते? सुवासिक पदार्थांचे परमाणु हवेंत चोंहीकडे उडत असतात. त्यापैकीं कांहीं आपल्या घ्राणेंद्रियावर आदळतात. त्याच्यायोगानें उत्पन्न झालेली गति जेव्हां मेदूंत जाऊन पोहोचते, तेव्हां आपणांस त्या पदार्थाचे ज्ञान होते. त्याचप्रमाणे दोन पदार्थांचा आघात एकमेकांवर होऊन उत्पन्न झालेल्या नादाच्या लाटा जेव्हां आपल्या कानांतील पडद्यांवर आदळतात, तेव्हांच आपणांस ध्वनीचें ज्ञान होतें. ह्या तंतूंच्यासंबंधानें असा नियम आहे कीं, त्यांत नियमित प्रमाणांत गति उत्पन्न झाल्यास ती

सुखावह होते. त्या प्रमाणाचें उल्लंघन झाल्यास ती स्थिति दुःखकारक होते. कस्तुरीचा परिमल माफक रीतीनें घेतल्यास सुख होते; परंतु बेताबाहेर घेतल्यास दुःख होतें. दुसरा एक नियम असा आहे कीं, एकदां एखाद्या पदार्थाचा आघात आपल्या इंद्रियांवर होऊन तत्तूंत एकवार गति उत्पन्न झाली, आणि तिच्यावर अवलंबून असणाऱ्या मनोवृत्तीचा एकदां उद्भव झाला, व त्याच पदार्थाचे आघात एकसारखे होत राहिले, तर कांहीं वेळाने त्या मनोवृत्तीचा भासच होणार नाहीं. एकच वृत्ति सर्वकाळ असणे आणि कांहीं वृत्ति नसणे हीं दोन्हीं सारखीच आहेत. जे लोक एकाच प्रमाणात असलेल्या थंड हवेत राहतात, त्यांस थंड हवेचा भास कांहींच होत नाहीं. थंड हवेचा भास होण्यास उष्ण हवेचाही अनुभव पाहिजे. त्याचप्रमाणे ज्ञानतंतूंतील गतीवर जर मनोवृत्तीचा उद्भव आहे, तर निराळी मनोवृत्ति उद्भवण्यास त्या गतींत बदल झाला पाहिजे. व तो होण्यास आघात करणाऱ्या पदार्थातही बदल झाला पाहिजे. त्याचप्रमाणे तिसरी अशी गोष्ट आहे की, कांहीं पदार्थ इंद्रियांस निसर्गतःच मानवत नाहींत; करितां ते अप्रिय असतात. उदाहरणार्थ, एखादे कडू फळ घ्या. त्याची रुचि जिभेला लागतांच ते अप्रिय वाटून दुःख होतें. ह्या ठिकाणी आघाताच्या कमीज्यास्तीपणाकडे कांहीं संबंध नसून ते पदार्थच जात्या त्या इंद्रियाला मानवत नाहीत. ह्यावरून पाहतां इंद्रियद्वारें सुखप्राप्तीचा भास होण्यास दोन गोष्टी मुख्यत्वेंकरून लागतात. एक ज्ञानतंतूत गति उत्पन्न होणें, किंवा

गतींत बदल होणें; व दुसरें, एकच गति सारखी फार काळ न राहणें. म्हणजे आपल्या वर्तनांत अशी तजवीज असली पाहिजे कीं, आपल्या ज्ञानतंतूंस माफक रीतीनें उद्दीपन मिळेल. त्याचप्रमाणें एकाच प्रकारचें उद्दीपन कायम राहणार नाहीं, हेंही पाहिलें पाहिजे. ह्यावरून पाहतां हा इंद्रियभोग कांहीं प्रमाणानेंच घेतला पाहिजे. तो सततही घेऊन उपयोगी नाहीं. त्याचप्रमाणें निसर्गतः अप्रिय पदार्थांचा त्याग केला पाहिजे. एकंदरीत ह्या नियमास अनुसरून आपलें वर्तन असल्यास ह्या जगांत आपल्यास पुष्कळ सौख्य आहे, असें दिसून येईल.

**केशव गोविंद पटवर्धन.** ग्रंथमाला-सुख.

---

## पाठ ५ वा.



## कुंतीचें मागणें.

दुःखें एकामागून एक आणि लगेहात येतात. तीच गोष्ट सुखांची होते. दुःख एकटें येत नाहीं; आपले रुंवगडेसोबती असतील नसतील, तितक्या सर्वांनिशीं मनुष्यावर चाल करून यावयाचें, हा दुःखाचा परिपाठ. सुखाचाही मला आतां तसाच अनुभव येऊं लागला. दुःखाचा पोटभर अनुभव घेण्यासाठींच माझा अवतार, असें वारंवार मला वाटत असे; ईश्वर अखिल जगताचा नियामक आणि दयेचा अर्णव, तो मला विसरलेला, मला पाठमोरा

झालेला आणि मजविषयीं निष्ठुर व निर्दय बनलेला, असें मला हमेश वाटत असे. मीं इच्छावें, मीं मागावें, किंवा मला हवें असे, त्याच्या अगदीं उलट ईश्वराकडून मला मिळावयाचें, हा जणूं काय आजपर्यंत एक ठरीव सिद्धान्त होता; पण तें सर्व आतां बदललें! ईश्वरानें आजवर उपेक्षा केली त्याचें उट्टें निघण्याची वेळ आली, असा आतां मला अनुभव येऊं लागला. माझ्या बाळ्याला महिना दीडशें रुपयांची इंग्रजसरकारची नोकरी लागली. वर्षभर आपला प्रपंच चालावयाचा तर दोन अडीचशें रुपये सालीना किफायत झाली, म्हणजे चंगळ उडाली असें मला वाटे. पण माझा मुलगा महिना दीडशें रुपये मिळवूं लागला, व दीडशेंचे आठशें व्हावयाचे असेंही मला कोणी कोणी सांगत. यामुळे मी किती तरी फुगत असें. मनोराज्य हांकण्यांत मी दंग होऊं लागलों. या माझ्या मनोराज्यात मी किती तरी मनसुबे करीत असें. माझी बगडी श्रीमंताच्या पदरीं पडली. मला खर्च आला नाहीं. जांवई घराणेदार, श्रीमंतींतला व वयानें आणि रूपानें माझ्या मुलीला अनुरूप. लग्नसोहळा मोठ्या थाटानें झाला. थोरामोठ्यांचा हा त्रिंबकभट सोयरा; तेव्हां माझें मन रिकाम्या पुशारक्या भारी मारीत असे. संपत्ति माझ्या बगडीच्या सासऱ्याची आणि नवऱ्याची; पण त्यांच्या घरच्या दागिन्यांची, त्यांच्या राहत्या सुंदर आणि टोलेजंग हवेलीची, त्यांच्या मळ्याटळ्याची आणि इतर जमीनजुमल्याची धन्यता मला वाटूं लागे. मी म्हणजे आजवर कोणाला महत्त्वाचा माणूस वाटत नव्हतों. माझ्या विद्वत्तेचें कधीं

कोणास कौतुक वाटले नाही. माझ्या बालबोध वर्तनाचे किंवा माझ्या आंगच्या कैक सद्गुणांचे चाहते मला आजवर कोणी भेटले नव्हते. नुसते चाहते भेटले नाहीत एवढेंच नव्हे, तर नुसते गुण पाहणारेही कोणी नव्हते. पण आतां तो मनु बदलला. आपल्या सोयऱ्यांची योग्यता लहानसहान नाही; घराणे बालबोध, माणसे सज्जन व कुलीन, इत्यादि गोष्टी माझ्या बगडीच्या सासरची माणसे लोकांस सांगत. माझी स्तुति करणारे बरेच लोक भेटू लागले. असा चोहोकडे एकदम फेरबदल थोड्याच दिवसांत होऊन गेला. त्यामुळें मला पुष्कळ विचार सुचून या जगांतल्या भोदूपणाची मोठी मौज वाटे. मनुष्याच्या हातांत मोहबत दाखविण्याचें किंवा भीति वाटावयास लावण्याचें सामर्थ्य नाही, तर त्या माणसाचें जिणें केवळ व्यर्थ होय! बाळयाच्या नौकरीमुळे आणि आमच्या व्याह्यांच्या श्रीमंतीच्या योगानें माझ्या हाती मोहबत आणि भीति या आहेत असे लोकांस वाटायला लागले. आणि खरेंच, या जगांतला सर्व व्यवहार मोहबत आणि भीति यांच्या तत्रांवर चालला आहे, असे म्हटले तरी चालण्यासारखें आहे. पैसा आणि सत्ता यांच्यावर माणसाची किंमत जगांत होत असते, ही गोष्ट खरी आहे. मिळून सांगण्याचें तात्पर्य हें की, त्रिंबकभट व्याह्यांच्या श्रीमंतीमुळें आणि चिरंजिवाच्या नौकरीने जगांतल्या मान्यतेस पात्र आहे, असे ठरूं लागलें; त्याच्या दशग्रंथी विद्वत्तेचें किंवा सज्जन-स्वभावाचें आणि रसाळ व बालबोधी वर्तनाचे कोणास कांहीं वाटत नव्हतें, तें आतां वाटूं लागलें. इकडे हा असा फरक लोकरीतींत

पडला, तोच माझ्या वृत्तींतही आढळूं लागला. मला ईश्वराची आठवण होईनाशी झाली. पदोपदीं ईश्वरा, ईश्वरा, अशी हांक माझें मन मारीत असे; पण तेंच आतां त्या ईश्वराला विसरूं लागलें. संकटकाळीं, विपदवस्थेंत मनुष्य ईश्वराची करुणा भाकतो किंवा आठवण ठेवितो, तितकी अनुकूळ काळांत ठेवीत नाहीं, हा मोठा चमत्कार आहे. श्रीभगवान् एकदां कुंतीस म्हणाले, ' मी प्रसन्न झालो आहे, काय पाहिजे तो वर माग! ' ' कृष्णा, मागेन तो वर देशीलना ? ' असे कुंती वारंवार बजावून विचारूं लागली. तेव्हा श्रीकृष्णालाही वाटलें, कीं ही काय वर मागणार कोण जाणे. पण मनाचा निर्धार करून परमात्मा कुंतीस म्हणाला, ' कांहीं चिंता नाहीं. वाटेल तो वर माग. ' तेव्हां कुंतीनें सांगितलें, ' देवा, मला सदा विपत्काळ दे. ' हें ऐकून श्रीकृष्णाला फार वाईट वाटलें; आणि निषेधून कुंतीस देव बोलले, ' कुंती, तुला हवा तो वर देण्यास मी सिद्ध असतां त्वां हें काय मागितलें ? ' कुंती म्हणाली, ' कृष्णा, विपत्काळीं ईश्वराचें स्मरण होतें आणि त्याची सेवा घडते, तशी सुखाच्या काळांत घडत नाहीं. ' मला कुंतीचें म्हणणें अगदी खरें वाटतें. मी माझ्या मनाला ओढओढून ईश्वरचरणांकडे नेई, पण तें तेथें राहतें आहे कशाला ? मनोराज्याचा खोटा राज्यकारभार हांकीत बसण्याचा त्या मनाला ओढा; खोट्या आणि दिखाऊ अभिमानाकरितां त्या मनाची धडपड. मी आपली आशा चेपीत चेपीत आणून तिला अगदी ताब्यांत ठेविलें होते. पण ती एकदम आतां तुफान झाली. मीं गर्व वहावा असा मला कधीं म्हणण्यासारखा

प्रसंगच आलेला नव्हता. बिनचूक कधीं कोठें पट्टीचें म्हणणें माझें झालें, किंवा आदरपूर्वक विद्वान् ब्राह्मण म्हणून मला आमंत्रण आलें, किंवा कोठें सभेंत माझा गौरव झाला, म्हणजे मला धन्यता वाटावयाची. पण आतां काय? जिकडे तिकडे अभिमान वाटणाऱ्या व गर्व वाहूं लागणाऱ्या गोष्टी मला दिसूं लागल्या. तरी आपल्या परी होईल तितकें करून हे माझे मनोविकार लोकांस दिसूं नयेत, म्हणून ते झांकण्याची मी पुष्कळ खटपट करीं. गर्वाची सावलीसुद्धां मजवर पडावयाला नको, असें मला वाटे; कारण गर्वानें मनुष्य फुगूं लागलें, कीं समजावें पडल्या काळाचें निशाण फडकावयास लागलें म्हणून, असा मला इतरांच्या गर्वावरून अनुभव कळला होता. मी ईश्वराच्या भीतीच्या योगानें, गर्व तरारून उठे त्याला आवरून धरीत असें. आतां मी ईश्वराला विसरूं लागलों तर पुनः न जाणों ईश्वर कोपेल, या भीतीनें ईश्वरसेवेकडे मनाला मी ओढून नेत असें. लोक मला मूर्ख किंवा गर्विष्ट अगर पूर्वपद विसरलेला, असें म्हणतील, या भीतीनें माझ्या आचरणांत व बोलण्यांत मी मोठा संभाळून वागूं लागलों. म्हणजे साहजिकपणा माझ्या ठायीं आजवर होता तो आतां नाहींसा झाला आणि 'मुद्दामपणा'-कडे सारें साम्राज्य गेलें.

धनुर्धारी. वाईकर भटजी.

---

## पाठ ६ वा.



## सुख आणि कीर्ति.

**कीर्ति पाहतां सुख नाहीं । सुख पाहतां कीर्ति नाहीं ॥**

—रामदास.

कोणत्याही गोष्टीची व्याख्या मनुष्यें आपल्या समजुतीप्रमाणें करीत असतात; आणि त्यांचें वर्तन त्याप्रमाणें भिन्न भिन्न प्रकारचें होतें. "भाग्यवंत" ह्या शब्दाचा अर्थ साधारणपणें सगळे लोक जो समजतात, त्याहून तुकाराममहाराजांचा अर्थ अगदीं वेगळा होता. "भाग्यवंत म्हणो तयां, शरण गेले पंढरीराया," असें त्यांनीं म्हटलें आहे. त्याप्रमाणें "सुख" शब्दाची व्याख्याही समजुतीप्रमाणें बदलत असते. वास्तविक पाहिलें असतां सुख सर्वांस पाहिजे असतें. सुख नको असा प्राणी सांपडावयाचा नाहीं. परंतु समजुतीच्या भिन्नत्वामुळें असा चमत्कार होतो की, सुख संपादण्याकरितां माणसें, एकमेकांशीं अगदीं विरुद्ध अशा क्रिया करीत असतात. कृपण मनुष्य कवडीकरितां प्राण खर्चीत असतो, आणि उदार मनुष्य याचकांना धन वांटीत असतो. ह्या दोन क्रिया परस्परांशी अगदीं विरुद्ध आहेत. तरी, त्यांचा हेतु—त्यांचे बीज—एकच आहे. तें काय ? तर सुखसंपादन. कृपणास वाटत असतें, आपणास द्रव्यसंचयानें सुख होईल; आणि उदारास वाटत असतें, आपणास दानधर्मांत सुख होईल. एक-

दरींत पर्यवसान एक. असा प्रकार आहे. ह्याकरितां आपण शब्दांच्या व्याख्या ज्या समजतों, त्या बरोबर आहेत कीं नाहीत, हें माणसांनीं आधीं चांगलें पाहिलें पाहिजे.

प्रकृत विषय सुख आणि कीर्ति हा आहे. ह्या विषयाचा पोक्त विचार केला म्हणजे सहज लक्षांत येईल कीं, सुखापेक्षां कीर्ति श्रेष्ठ आहे. कां की, कीर्तीमध्यें माणसास सुख सांपडते, असा पुष्कळ अनुभव आहे; पण सुखांत कीर्ति सांपडते असें कधीं कोणाच्या प्रतीतीस आलें नाहीं. ज्या माणसांनीं नुसत्या सुखाची हांव धरिली, तीं ह्या लोकीं अपयशास आणि कधीं कधीं अत्यंत दुःखास पात्र झाली आहेत. आणि ज्यांनीं कीर्तीची कांस धरिली, ते ह्या लोकीं फार वंद्य होऊन, आनंदानें कालक्रमण करून, मागें नांव ठेवून, निघून गेले आहेत. ह्यांचीं उदाहरणें इतिहासपुराणांत प्रसिद्धच आहेत

ह्या विषयाचा विचार करितांना असे वाटतें कीं, सुख ह्याचा अर्थ इंद्रियांच्या इच्छा तृप्त करणे असा आहे; आणि षड्रिपूंचें दमन करणे—आपल्या सगळ्या कुवासना मोडून टाकणें—हेंच कीर्तीचें साधन आहे—अथवा हीच कीर्ति आहे, असें सत्पुरुष समजतात. आणि तेंच खरें आहे. ह्याची पुरती समजूत होण्याला एक उदाहरण बस्स आहे. तें उदाहरण साक्रेतिसाचें घ्या. हा साधुपुरुष कोणत्या प्रकारें प्राणांस मुकला, हें सर्वांस ठाऊक आहे. तो पुरुष खरोखर अपराधी नव्हता. एवढेच केवळ नव्हे, तर

पापभीरु आणि देवभक्त होता. त्यानेंच स्वतः एकदां असें सांगितलें कीं, माझ्या मनांत अनेक पापवासना उद्भवतात, तरी त्यांचें दमन करून, मी आपल्या मनोदेवतेच्या आज्ञेप्रमाणें वागतों; आणि त्यांत कितीही कष्ट झाले तरी ते मला कष्टसे वाटत नाहींत. आणखी खरोखरच त्याला त्याचे मित्र तुरुंगांतून पळून जाण्यास मार्ग दाखविण्यास आणि त्यास साह्य करण्यास तयार असतां त्यानें त्यांचें एकिलें नाहीं. तें कां ? तर त्याच्या योगानें आपल्या देशांतला कायदा मोडण्याचे पाप आपले हातून होईल, आणि तें देवास आवडणार नाहीं असें त्यास वाटत होतें, आणि त्याच्या योगानें चित्तास अस्वस्थता प्राप्त होईल, असें त्याला ठाऊक होतें. त्याकरितां त्यानें दैहिक कष्ट आपण होऊन सोशिले. अशीं आणखी किती एक साधूंचीं उदाहरणें देतां येतील. पण ह्यास साधूंच्याच गोष्टी पाहिजेत असें नाहीं. सामान्य व्यवहारांत सामान्य माणसेंदेखील कमज्यास्त प्रमाणानें तेंच करीत असतात. मातापितरें मुलांचें बरें करण्यास नानाप्रकारचे क्लेश सोशितात. पंचाग्निसाधनासारख्या आराधना जे कोणी करीत असतात, त्यांस क्लेश होत नसतात असें नाहीं. क्लेश होतच असतात. परंतु त्यांची दृष्टि परमार्थाकडे असते, मोक्षसुखाकडे असते; तें मोक्षसुख खचित प्राप्त होईल अशी त्यांच्या मनास आशा असते. तिने जें सुख होत असतें, त्याच्यापुढें ते क्लेश कांहीं नाहींतसे वाटत असतात. आणखी, तें सत्कर्म असतें, देवाकडे ओढा ठेवल्याचें लक्षण असतें, तेव्हां त्यांची कीर्ति सहज होते.

शिवाय, सुख आणि कीर्ति ह्या दोहोंपैकीं कोणत्या ना कोणत्या तरी एकाची निवड करावयाची वेळ येते, तेव्हां, सुखाकडे न पाहतां कीर्ति साधणें हें मोठें शहाणपण आहे, असें समजण्याचा परिपाठ फार प्राचीन काळापासून आजपर्यंत, सर्व प्रकारच्या लहानमोठ्या माणसांत पडला आहे. अगदीं लहान मूल, घे म्हटल्याशिवाय पदार्थास हात लावीत नाहीं, ह्याचें मोठें कौतुक वाटतें. एखादा चोर पश्चात्ताप पावून आपल्या चोरीस आपण होऊन कबूल होतो, त्याविषयीं लोकांस बरें वाटते. एखादा राजा, आपल्या सोईकडे न पाहतां आपल्या गरीब प्रजांच्या सुखाकरितां परिश्रम करितो, त्याजविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न होते. अत्यंत दुःखित मनुष्य दृष्टीनें पाहणें हेदेखील एक प्रकारचें दुःख आहे. असे असतां, आपल्या परलोकवासी महाराणी विक्टोरिया ह्या आपण होऊन, आपला राजवाडा सोडून गरिबगुरिबांच्या झोंपड्यांत जाऊन, त्यांतील दुःखितांचा समाचार घेत असत; ह्यावरून त्यांचे फार स्तुतिस्तोत्र होत असतें. ह्या सगळ्या गोष्टीवरून असें उघड आहे कीं, एका प्रकारीं सुख हें कीर्तीचें मोल आहे. तें खर्चिल्याशिवाय माणसास कीर्ति मिळत नाहीं.

समर्थांच्या म्हणण्याप्रमाणें सुखाचा संबंध देहाशी आहे, कीर्तीचा मनाशीं आहे, असें दिसतें. सुखानें शरीरास समाधान होतें, कीर्तीनें अंतःकरणास होतें. सुख म्हणजे देहाच्या हौशी पुरवावयाच्या, आणि कीर्ति म्हणजे अंतःकरणाच्या हौशी पुरवावयाच्या. ह्यांत देह नाशवंत आहे—क्षणिक आहे, त्याच्या

हौसा नीच असतात. त्या पुरविल्यानें सुख होतें, आणि दुःखही होतें. तें " सुख पाहतां जवापाडें, दुःख पर्वताएवढें " असें असतें. आणि विचाराच्या किंवा अंतःकरणाच्या हौसा पुरविणें ह्यानें जें दुःख होतें, त्याचें वर्णन उलट प्रकारानें करायास पाहिजे. म्हणजे, " दुःख पाहतां जवापाडे, सुख पर्वताएवढें. " असें कां होतें, ह्याचें कारण स्पष्ट आहे. तें हें कीं, ह्या प्रकारच्या सुखाचें पात्र म्हटले म्हणजे शरीर, तें अल्पायु; आणि सुखाचें स्थान म्हटले म्हणजे मन, अंतःकरण, आत्मा; तो चिरायु आहे.

पहिले बाजीराव पेशवे शेतांतलीं कणसें तोडून घोड्यावर बसल्या बसल्या खात होते. इंग्लंडचा आल्फ्रेड धि ग्रेट हा राजा, आपलें सगळें मोठेपण एकीकडे ठेवून, एखाद्या मजुराप्रमाणे सुताराचे काम करीत असे. रशियाचा बादशहा पीटर धि ग्रेट हा, सगळा लोकापवाद सहन करून, आपल्या प्रजाजनांस, आपल्या स्वतःच्या उदाहरणानें सामाजिक सद्रीत शिकवीत असे. बुद्ध, तुकाराम, रामदास, महंमद इत्यादि महापुरुषांचीं चरित्रें पाहिलीं, तर हेंच तत्त्व दिसून येणार आहे कीं, समर्थांनीं उपदेश केला आहे त्याप्रमाणे " सुखा अंग देऊं नये " हें व्रत त्यांनी आचरिलें, म्हणूनच त्यांची कीर्ति जगामध्ये अजरामर झाली आहे. हे नमुने होऊन गेले आहेत. ते कित्ते आहेत. ते सर्वांच्यापुढें ठेविलेले आहेत. जे वळवितील, ते पूर्वोक्त व्यक्तींप्रमाणें कीर्तीस पात्र, जनांस मान्य आणि परमेश्वरास प्रिय होतील; आणि जे चुकतील ते मुकतील. रामदास, तुकाराम

इत्यादि महात्मे गरुड होते; ते आकाशांत उंच उडाले. तितकें जरी सर्वांस उडतां आलें नाहीं, तरी पोपटांसारखे जे कोणी लहान असतील, त्यांनीं यथाशक्ति उड्डाण करणें हें त्यांच्या स्वाधीन आहे. तेवढें त्यांनीं करावें, म्हणजे झालें.

वि. कों. ओक. बालबोध.

---

## पाठ ७ वा.



# एक आर्यधर्मवीर.

[ श्रीमद्रामकृष्ण परमहंस म्हणून एक साधुपुरुष नुकते बंगाल प्रांतांत होऊन गेले. ते इ. स. १८८६ त समाधिस्थ झाले. त्यांची शिष्यशाखा फार मोठी आहे तींत अनेक पदवीधर असून त्यांनीं आपल्या परमपूज्य गुरूंच्या आज्ञेवरून संन्यासवृत्तीनें राहून, खऱ्या आर्यधर्मतत्त्वांचा प्रसार या देशीं व परदेशीं करण्याचें पवित्र काम आज अनेक वर्षे चालविलें आहे. त्यांनीं अनेक संस्था येथें व अमेरिकेंत स्थापन करून लोकसेवा चालविली आहे. परमहंसांच्या शिष्यांत स्वामी विवेकानंद हे शिरोमणि होत. सन १८९३ सालीं अमेरिकेंत शिकागो शहरीं सर्व जगांतील कारागिरांच्या पदार्थांचें भव्य प्रदर्शन झालें. त्या वेळीं तेथें सर्व जगांतील प्रचलित धर्मांच्या प्रतिनिधींची मोठी सभा भरली होती. त्या धर्मसभेला आर्यधर्माचे प्रतिनिधि म्हणून विवेकानंद स्वामी आपल्या मित्रमंडळीच्या आग्रहावरून गेले. तेथें त्यांनीं आपल्या रसाळ व प्रासादिक वाणीनें आर्यधर्माचें श्रेष्ठत्व स्थापन करून दिग्विजय केला. तीच मनोरम हकीकत पुढील उताऱ्यांत आहे. ]

विवेकानंद हे संन्यासी होते, परंतु आपल्या पूर्वपद्धतीस अनु-

सरून केवळ एका छाटीवर आणि तुंब्यावर यांचा निर्वाह होणें कठिण होतें; कारण यांचें इच्छित कर्तव्य आणि आपल्याकडील इतर संन्यासी यांचे कर्तव्य यांत दोन ध्रुवांइतकें अंतर होतें. अर्थात् दोघांच्या योगक्षेमांत आणि दिनचर्येंत तितका फरक पड-णारच. तेव्हां प्रसंगविशेषी कोट, पाटलून वगैरेंचा जुन्या संन्या-श्यांकडून होणारा अनादर या नव्या तऱ्हेच्या संन्याश्याकडून न होतां उलट त्यानें त्यांचा स्वतांच सादर स्वीकार करावा, यांतही फारसें नवल नाहीं. असो. पुढील प्रवासांत निभावण्यास अवश्य लागणारी वस्त्रादि सामुग्री स्वीकारून विवेकानंदांची स्वारी योग्य मुदतींत अमेरिकेस जाऊन पोहोचली. अमेरिकेंत जगद्धर्मपरिषदेपुढें हिंदुधर्मावर बोलण्यास एक हे स्वामीच होते; तथापि शिकागो येथील धर्मपरिषदेंत हिंदूंचा प्रतिनिधि म्हणून जाणें, इतकाच आपला कार्यभाग नसून सुधारणेच्या अत्युच्च शिखरावर चढून बस-लेल्या पदार्थवादी अशा पाश्चात्त्यांस हिंदुधर्माची खरी खरी किंमत पटवून त्यांच्या मनांत हिंदुधर्म, हिंदुलोक, हिंदुस्थान, यांसंबंधीं आदर उत्पन्न करणें, हेंच आपलें सर्वांत मोठें कर्तव्य, असें विवेकानंद समजत असत. त्यामुळें शिकागो येथील जगद्धर्मसभेस जाण्याची संधि म्हणजे एक शुभ शकुनच असें त्यांस वाटलें. स्वामी अमेरिकेंत जाऊन पोंचल्यावर त्यांजवळील द्रव्यसंचय फारसा मोठा नसल्यामुळें तो लवकरच संपुष्टांत आला; तथापि स्वामींच्या अलौकिक वक्तृत्वप्रभावामुळें त्यांना लवकरच अमेरि-केंतही साहाय्यकारी मंडळ मिळालें. त्यांची तेजस्वी मुद्रा, भव्य

शरीर आणि मोहक संभाषणपद्धति इत्यादि गुणांनी अमेरिकेंतील लोकांवर त्यांची चांगलीच छाप बसली. पुष्कळ धर्माधिकारी व इतर तत्त्वविचारी विद्वान् त्यांजकडे येऊं जाऊं लागले; व त्यांपैकींच एका बाईनें स्वामींच्या तूर्तातूर्त योगक्षेमाची सर्व जबाबदारी पतकरली. स्वामीची कीर्ति वसंतांतील पुष्पपरिमलाप्रमाणें इतस्ततः पसरूं लागली. होतां होतां धर्मसभेत स्वामींना निरनिराळ्या देशांतून येणाऱ्या तत्तद्धर्मप्रतिनिधींचे स्वागत करण्याचा बहुमान देण्यांत आला; आणि सर्वसामान्य धर्म तयार करितां येईल काय, व तो कसा होईल, अशा प्रकारचा स्वामींनी आपला मुख्य विषय घ्यावा, अशी त्यांस विनंती करण्यांत आली. स्वामींनी आपणांकडे आलेलें हे काम उत्तम प्रकारें बजावलें. ते प्रथम जेव्हा स्वागतार्थ उठले, त्या वेळीं त्यांनीं आपल्या फारच लहान परंतु अत्यंत चटकदार व समयानुरूप आवेशयुक्त भाषणाने तेथे जमलेल्या विस्तृत श्रोतृसमूहास अगदी चित्राप्रमाणे तटस्थ करून सोडलें. त्या तेवढ्याशाच त्यांच्या भाषणाने अमेरिकन लोक इतके मोहून गेले कीं, त्यांच्या मुख्य भाषणाच्या दिवशी त्या विस्तृत सभांगणांत मुंगीस शिरण्यास वाव न सांपडे इतकी गर्दी जमली; शिवाय हजारों लोक, प्रवेश होत नाही म्हणून निराशेने परत गेले. विवेकानंदांचें भाषण सायंकाळीं चोहोंच्या पुढें होतें. त्यांच्या अगोदर जे अनेक विख्यात वक्ते बोलून गेले होते, त्यांच्यापुढें श्रोतृसमाज बेताचाच होता; परंतु विवेकानंदांच्या भाषणाची वेळ येतांच लोकांच्या झुंडीच्या झुंडी सभेंत येऊन भरल्या आणि

जागेकरितां अतिशय झटापटी उडूं लागल्या. स्वामी बोलावयास उठतांच त्यांचा टाळ्यांच्या गजरांनीं मोठा गौरव करून लगेच त्यांचें भाषणामृत सेवन करण्याकरितां श्रोत्यांनीं पूर्ण शांतीचा अवलंब केला. त्या शांत व गंभीर श्रोतृमहासागरावर, विवेकानंदांच्या सुविचारामृतस्रावी पूर्णचंद्राने, आश्चर्याच्या एकापेक्षां एक मोठमोठ्या लाटा उत्पन्न करून आनंद आणि समाधान यांची भरती आणली. त्यांचे प्रासादिक वक्तृत्व, उंच व मधुर स्वर, यथान्याय विषयविवेचन, सुबोध आणि आवेशयुक्त अशी इंग्रजी भाषा व अर्थानुरोधी अभिनय इत्यादिकांचा तेथील श्रोतृसमूहावर विलक्षण परिणाम झाला. ज्याप्रमाणें अर्जुनाच्या अस्त्रांनीं कुरुवीर स्तंभित झाले होते, त्याचप्रमाणें विवेकानंदांच्या भाषणानें तेथील श्रोत्यांची स्थिति झाली; आणि त्या दिवशीं त्या धर्मांगणावर विवेकानंद हे विजयी झाले. हा त्यांचा विजय तात्कालिक नसून चिरकाल टिकला. धर्मसभा संपली, तरी अमेरिकेंत विवेकानंद इतके गाजले की, निरनिराळ्या ठिकाणच्या लोकांनीं आपल्यास त्यांच्या संगतीचा लाभ मिळावा म्हणून चढाओढीनें प्रयत्न चालविले. तेथील वर्तमानपत्रे व मासिक पुस्तकें, विवेकानंदांस ' हे केवळ ईश्वराचा अवतार, ' ' शिकागो येथील जगद्धर्मपरिषदेचें शिरोभूषण, ' ' धर्ममतयुद्धांतील अद्वितीय योद्धा, ' ' अलौकिक वक्ता, ' वगैरे विशेषणांनीं गौरवूं लागलीं. असो. प्रथम प्रयत्नास असें अकल्पित यश आलेलें पाहून विवेकानंदांनीं अमेरिकेंत वेदान्तशिक्षणसंस्था कायमची करण्याचा प्रयत्न केला,

आणि त्यांच्या एकदोन वर्षांच्या अव्याहत प्रयत्नानें त्यांचा हेतु चांगलाच सिद्धीस गेला. अमेरिकेंत सध्यां आपणांस हिंदु म्हणविणाऱ्या स्त्रिया व पुरुष बरेच असून, कांहींनीं संन्यास घेऊन आमरण वेदान्ताचें अध्ययन व अध्यापन यांतच वेळ घालविण्याचे व्रत दृढ चालविलें आहे! कलियुगाच्या वाढत्या कलेंत जन्म पावलेल्या खिरती, महंमदी वगैरे धर्मांच्या अनुयायांच्या चिरवक्रदृष्टीस पात्र झालेल्या, आमच्या सनातन भारतधर्मांतील मूर्तिपूजादि प्रकारांचें 'धर्मोपकरण' या मथळ्याखाली स्वामीनी असे सुंदर समर्थन केलें कीं, फिरून त्या गोष्टीबद्दल त्यांच्यापैकी कोणाचीही ब्र काढण्याची छाती होऊं नये. त्यांनी खिस्तादिकांच्या धर्मांतही प्रकारांतरानें मूर्तिपूजा कशी वास करीत आहे, हेही तद्धर्मानुयायांस चांगलें दाखवून दिले. याप्रमाणे सनातन भारतधर्माचे कर्मोपासनाज्ञानरूप त्रिविध स्वरूप, हठयोग, भक्तियोग, राजयोगादि मुख्यांगांसह तेथील लोकांस समजावून देऊन त्याची सर्वांगसुंदरता त्यांच्या प्रत्ययास विवेकानंदांनी पूर्णपणे आणून दिली.

**श्रीसरस्वतीमंदिर.**

---

## पाठ ८ वा.



### इतिहास.

'इतिहास' या शब्दाचा सरळ अर्थ 'मागें येणेंप्रमाणें झालें' असा होतो, व गतकालीं घडलेल्या गोष्टींच्या वृत्तांताला इतिहास

असें म्हणतात. इतिहासानें मनुष्यजातीच्या शहाणपणांत प्रतिपिढीस भर पडत चालली आहे. इतिहास गतकालाच्या गोष्टींना वाङ्मयामध्यें अमरपद देतो व पूर्वजांचा अनुभव नवीन नवीन पिढ्यांचे मदतीस आणून त्यांवर उपकार करीत असतो. सुखप्राप्तीसाठीं मनुष्य नानाप्रकारच्या घडामोडी नेहमीं करीत असतो, पण ईश्वराचे दृष्टीनें ज्यांची योग्यता ज्यास्त ठरते, त्यांनाच ज्यास्त व चिरकालीन सुख प्राप्त होतें. याचे प्रत्ययाची माहिती इतिहास आपलेपुढें मांडितो व तीपासून काय शिकावें, हेंही शिकावितो. एकंदर मनुष्यजातीची स्थिति पूर्वीं कशी होती व सद्यःस्थितीशीं तिचा संबंध काय, हें कळण्याचें साधन इतिहास होय. इतिहासाचें असें महत्त्व असल्यामुळें प्रत्येक सुधारलेल्या लोकांच्या भाषेंत इतिहासग्रंथ, ऐतिहासिक पण कल्पनेच्या रंगांनी खुलविलेल्या कथा, ऐतिहासिक पुरुषांचीं गद्यपद्यात्मक चरित्रें व चटकदार ऐतिहासिक गोष्टी, यांचा भरणा मोठा असतो; म्हणून चांगल्या इतिहासकाराला केवळ त्याच्या स्वतःच्या देशाचाच नव्हे, पण सर्व मनुष्यजातीचा उपकर्ता समजत असतात.

एक जगाचा अनुभव मिळविलेला व एक अनुभवशून्य असे दोन माणूस घेतले, तर त्यांच्या कर्तबगारीमध्यें फार अंतर दिसून येतें. अनुभवी मनुष्य स्वहितदक्ष आणि स्वार्थ साधण्यास समर्थ असतो; परंतु अनुभवशून्य मनुष्य खुळचट, कार्य साधण्याचे कामीं दुर्बळ, वेळाचें सार्थक न करणारा, चांगल्या लोकांच्या दयेवर ओझें घालणारा, मतलबांनीं फसणारा, असा आपण पाहतों.

हीच स्थिति जगाच्या इतिहासाच्या ज्ञानासंबंधानें आहे. जगाच्या इतिहासाच्या ज्ञानाचें शिक्षण घेणारे लोक हुषार, मोठे कार्यकुशल व मोठे मोठे व्याप उचलणारे असल्यामुळे त्यांची इतर लोकांवर छाप पडते व इतर लोक त्यांच्या वर्चस्वाखालीं येतात. जगाच्या इतिहासाकडे दुर्लक्ष करणे यासारखी राष्ट्राला हानिकारक अशी कोणतीही दुसरी गोष्ट नाही. आज जीं राष्ट्रं आपल्याला मोठ्या वैभवामध्ये दिसतात, त्यांचा इतिहास पाहिला असतां, त्यांनीं आपल्या कृतीमध्ये जगाच्या पूर्वेतिहासापासून मिळणाऱ्या शहाणपणाचा चांगला उपयोग केला, म्हणूनच त्यांचा मोठा उत्कर्ष होत गेला, असे आपल्याला आढळून येईल.

इतिहासाचा व स्वदेशभक्तीचा फार निकट संबंध आहे. ज्या लोकांचे इतिहासाकडे लक्ष असतें, त्यांना स्वतःच्या राष्ट्रांत जे चांगले चांगले होऊन गेले, त्या लोकांचा व त्यांच्या कृतींचा योग्य अभिमान असतो. तसेच, आपले राष्ट्राकडून कांहीं वाईट गोष्टी झालेल्या असल्या, तर त्यांबद्दल त्यांना शरमही वाटत असते. तसेच, दुसऱ्या राष्ट्रांपासून जें कांहीं शिकण्यासारखे असते ते, ते लोक आपली राष्ट्रीयता न गमवितां शिकत असतात. अशा लोकांचें, दुसऱ्या राष्ट्रांपैकीं आपले हितचिंतक कोण, व अहितचिंतक कोण, परच्छिद्रान्वेषी कोण लोक आहेत, गळेकापू कोण आहेत, इकडे चांगले लक्ष असते. तसेंच, जर त्यांचे स्वातंत्र्य हरण करण्याचा अगर कोणत्याही प्रकारानें त्यांच्या राष्ट्राला अपायकारक असा घाट कोणी परकी दुष्ट लोकांनी घातला,

तर ते सावधपणें मोठी मुर्दुमकी करून, आलेल्या संकटांतून पार पडतात; परंतु जे लोक इतिहासाकडे लक्ष देत नाहींत, त्यांची फार दुर्दशा होत असते. आपल्या राष्ट्रामध्यें खरोखरी अभिमान बाळगण्यासारखें काय व त्याग करण्यासारखें काय, हे त्यांना कळत नसतें; परकी लोकांना सरसकट वाईट समजून व त्यांचा तिरस्कार करून ते त्या सगळ्यांच्या रोषाला पात्र होतात, किंवा सगळ्यांना सरळ व साधुशील असें समजून त्यांपैकी जे छद्मी व दुष्ट लोक असतील त्यांच्या जाळ्यांत सांपडतात. परकी लोकांपासून आपणांस काय घेण्यासारखे आहे, इकडे त्यांचे लक्ष नसतें. यामुळें त्यांना जगाच्या अनुभवाचा फायदा न मिळतां ते मागसलेले राहतात; किंवा राष्ट्रीयतेचा अभिमान नसल्याने असले लोक जें नवीन व परकीय दिसेल त्याची नक्कल करून आपल्या राष्ट्रीयतेचा पूर्ण नाश करण्यास आपणच कारण होतात.

श्रीसरस्वतीमंदिर.

---

## पाठ ९ वा.



### नियमितपणा.

पुष्कळांना काम वेळचे वेळीं करवत नाही, यामुळे त्यांचा अतिशय तोटा होतो. वक्तशीर काम न करणारा मनुष्य जितकी मेहनत घेऊन एखादें काम करतो, त्याच्या दुप्पट काम, तेवढ्याच वेळांत

आणि निम्या श्रमानें नियमित वेळीं काम करणारा मनुष्य करतो; आणि त्याच्या कामापासून त्यास व दुसऱ्यांसही संतोष होतो. आपल्याकडील जुन्या कारागीर वगैरे लोकांत ही अनियमितपणाची खोड फारच आढळते. एखाद्या जुन्या चालीच्या चितार्‍यास पंधरा दिवसांच्या मुदतीनें एक तसबीर तयार करून आणण्यास सांगा, पंधरवड्याचे ठिकाणीं त्यानें त्या कामास चार महिने न लाविले तर मग त्याचें कसब तें काय राहिलें? तसबिरीच्या मालकानें त्याच्या घरीं खेटे घालीत राहावें, आणि त्याने 'हो हो, उद्यां देतों,' असें म्हणतच असावे. या लोकांना वाटत असतें की, दुसऱ्यांनीं आपल्या घरीं असे हेलपाटे घातल्याशिवाय आपला नांवलौकिक वाढणार नाहीं, आणि आपणांस पैसाही मिळणार नाहीं. एका गिऱ्हाइकास असा त्रास दिल्याने दुसरी दहा बुडतात, या तत्त्वाकडे ते लक्ष पोचवीत नाहींत. अनियमितपणानें काय काय तोटे होतात, याचा अनुभव बहुतेकांस आहेच. विद्यार्थ्यांचें तर अशा संवईनें फारच नुकसान होतें; कारण, कोणत्याही बऱ्यावाईट संवयी ताबडतोब जडतात त्या याच वयांत. या वयांत लागलेली खोड मोठेपणीं घालविणे अतिशय अवघड काम आहे. रोजचा नेमून दिलेला अभ्यास आळसामुळें पुढें ढकलल्यानें ऐन परीक्षेच्या वेळीं कामाचा बोजा पडून आजारी पडलेले बरेच विद्यार्थी आपणांस सांपडतील. ही खोड मोठेपणीं फार नडते. काम वक्तशीर न झाल्यानें किती वेळ फुकट जातो, याची कोणास फारशी कल्पना नाहीं. नेहमींचीं कामें नियमित-

पणें वेळचे वेळीं झालीं, म्हणजे कोठेंही घोंटाळा न होतां अवांतर व्यवसायांना मुबलक वेळ मिळतो.

ठरल्या वेळीं काम न केलें, तर कामाची चालढकल करण्याची संवय लागते. एखाद्याला पुष्कळ उद्योग असले आणि त्यानें आज करावयाचें काम उद्यांवर टाकले, तर तें चालण्यासारखें आहे. परंतु ज्यांस फारसें काम नाहीं असेच लोक आपल्या नित्याच्या कामांत चालढकल करतांना आढळतात. याचे कारण असें दिसतें कीं, मनुष्याला उद्योग कमी असला, म्हणजे आंगांत आळस वाढतो, आणि 'करून टाकूं घटकाभऱ्याने,' असे म्हणण्या-खालीं सर्व वेळ जातो. घटकेमुळें दिवस, दिवसामुळें वर्ष फुकट जाऊन सगळ्या आयुष्याचा नाश होतो. " श्वः कार्यमद्य कुर्वीत पूर्वाण्हे चापराण्हिकम्। न हि प्रतीक्षते मृत्युः कृतमस्य न वा कृतम् ॥" असें एक संस्कृत-वचन आहे. याचा अर्थ असा कीं, उद्यांचे कार्य आज करावें, आणि दुपारचें सकाळीच उरकून टाकावें. कारण मृत्यु आला म्हणजे तुमचें काम झालें किंवा न झालें, हें तो पहात नाहीं. स्कॉटलंडचा जेम्स राजा सन १४३६ च्या फेब्रु-वारींत फोर्थची खाडी ओलांडून पर्थ शहरी चालला असतां वाटेंत हायलंडर्स (पर्वतनिवासी) लोकांची एक बाई त्याजकडे येऊन त्याला मारण्याचा झालेला कट त्यास सांगूं लागली; पण त्यानें तिजकडे लक्ष दिलें नाहीं. दुसरे दिवशीं ती पुन्हा पर्थ शहरीं त्याजकडे गेली; परंतु राजानें 'उद्यां सकाळीं ये' म्हणून सांगितलें. नंतर दोन तासांनींच सर रॉबर्ट ग्रॅह्यामनें राजाचा खून केला.

आपल्या इतिहासांतही हुबेहूब असेंच उदाहरण आहे. ज्या दिवशीं श्रीमन्नारायणराव पेशवे यांचा वध झाला, त्याच दिवशीं श्रीमंतांची स्वारी सकाळीं दर्शनास पर्वतींस गेली असतां मागें वाड्यामध्यें आनंदीबाईच्या पुठ्यांतील दासी गजाऊ, आणि तुळाजी पवार ह्यांची बरीच धांदल झाल्याचें चाफाजी टिळेकर ह्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें. व श्रीमंतांच्या जिवावर संकट येण्यास आतां क्षणाचाही अवधि राहिला नाहीं, असें त्याच्या मनानें घेतलें. म्हणून तो तसाच धांवत धांवत पर्वतीवर जाऊन श्रीमंतांस भेटला. श्रीमंत पायऱ्या उतरत होते. तेथेच त्यानें 'आज वाड्यांत कांहीं गडबड असून आपल्या जिवावरचा प्रसंग असावा, असें सांगितलें. तेव्हां बरोबर हरिपंत फडके होते त्यांजकडे पाहून श्रीमंत म्हणाले कीं, "तात्या ऐकलेंतना? काय हा मजकूर आहे?" फडक्यांनीं विनंती केली की, "श्रीमंतांचें भोजन आटपेपर्यंत मीही भोजन करून वाड्यांत येतों व सारा बंदोबस्त करतो." पण तात्या आले तोंपर्यंत वाड्यांत सर्व कारभार आटोपला-सुद्धां! ही गोष्ट सर्वत्र महशूरच आहे. हेंच जर तात्यांनीं ढकलाढकलीचें काम केलें नसते, व 'उद्यांचें काम आज करावें,' हा नियम पाळला असता, तर नारायणरावासारख्या राजबिंड्याचा बळी पडला नसता. 'पाहूं या घटकाभऱ्यानें,' असें म्हणणारांनीं ह्या एका तासाचा परिणाम किती भयंकर झाला, हें नीटपणीं ध्यानांत ठेवावें. तेव्हां आपण उद्यांवर काम टाकावयाचें तें खरी कोणच्या आधारावर? वेळ झपाट्यानें जात आहे, आणि स्वतांच्या

जाण्याची कोणी एका घटकेची खात्री देऊं शकत नाहीं; अशा स्थितींत कर्तव्यांत सुस्ताई करणे फार वेडेपणाचें आहे. शिवाय यापासून आपला दोन प्रकारें तोटा होतो; एक, कामांत सगळी अव्यवस्था होऊन जाते. कामाची शिस्त एकदां बिघडली म्हणजे किती त्रास होतो, याची कल्पना तशा स्थितींत असणाऱ्या मनुष्या-खेरीज इतरांस यावयाची नाहीं. दुसरा तोटा म्हटला, म्हणजे गेलेली संधि परत न मिळणें हा होय. वनस्पती, फळफळावळ वगैरे जिनसा मिळण्याचे ऋतु ठरलेले असतात. विद्या लहान वयांतच करावयाची असते; पाऊणशें वर्षांचा म्हातारा ती जर करूं लागेल, तर त्यास ती साधणे नाही. तरुण असतांच शरीर कमवावयाचें असतें. " अंगं गलितं पलितं मुण्डं, दशनविहीनं जातं तुण्डम् ! " अशा स्थितींत तें साध्य नाहीं. वृद्धपणच्या अनेक गोष्टी. तरुणपणीं करतां येत नाहींत. प्रत्येक गोष्टीचा जो काल ठर-लेला आहे, त्या वेळीं ती झाल्यास फायदा होण्याचा संभव असतो; नाहीं तर जन्मभर दुःखांत आणि कष्टांत दिवस काढले, तरी ती संधि—तो फायदा—मिळणें नाहीं. तेव्हां, आजचें काम उद्यांवर टाकल्यापासून आपलें फार नुकसान आहे. कॉटन कवि म्हणतो, " 'उद्यां' हें कालमान कोठेंही सांपडत नाहीं. कदाचित् सांपडलें, तर एखाद्या मूर्खाच्या पातड्यांत सांपडेल. शहाणा मनुष्य या शब्दापासून अलिप्त असतो. व जे लोक याचा उपयोग कारितात त्यांची तो संगतिही धरीत नाहीं." कामांत चाल-ढकल करणारांचें क्रमण कशा प्रकारचें असतें, याचें एडवर्ड यंगनें

फार मजेचें वर्णन केलें आहे. तो म्हणतो, " तीस वर्षांचें वय झालें म्हणजे 'मी मूर्ख तर नाहींना?' अशी शंका मनुष्याला उद्भवते. चाळिशी उलटल्यावर 'आपल्या हातून खरोखर मूर्खपणा झाला,' हें तो उमजतो व आपले बेत सुधारण्यास लागतो. पन्नाशीची झुळूक लागली कीं, जिच्या योगानें आपला एवढा बदलौकिक झाला, त्या दिरंगाईच्या संवयीबद्दल संतापतो, निश्चयानें चालावें असा शहाण-पणाचा संकल्प करतो, खूप विचार करून निर्धारही करतो, पुन्हा अगदीं दृढनिश्चय करतो; नंतर मरतो तो जशाचा तसाच."

सारांश, मनाचा एकनिश्चय नसल्यामुळें आंगांत आळस शिरतो, झोंप वाढते, काम वेळचे वेळीं होईनासें होतें; नंतर कामांत चाल-ढकल व्हावयास लागते, आणि शेवटीं सर्व अव्यवस्था होऊन जीविताची दैना दैना होते!

द. मो. लोहोकरे. वेळेचें महत्त्व आणि व्यय.

---

## पाठ १० वा.



## गोविंदरावांचें आपल्या मुलास पत्र.

### भाग १ ला.

मुला, तुझें पत्र वाचून मला फार आनंद झाला. पत्र फार चांगलें आहे. तूं आपल्या नवीन जागेचें वर्णन फार चांगल्या प्रकारें केलें आहेस. औरंगाबाद पाहिल्यास मला फार वर्षे झालीं.

मी बहुतेक विसरून गेलों होतों. परंतु तुझ्या वर्णनानें तें शहर पुनः अगदी माझ्या डोळ्यांसमोर उभें राहिलें. यावरून मला असें वाटावयास लागलें आहे कीं, तूं जर लिहिण्याचा अभ्यास ठेविशील, तर तुला लिहिण्याची कला बरी साधेल. तुला ग्रंथकर्तृत्वाची फार आवड आहे. ती पुरवून घेण्याला तुझा सध्यांचा व्यवसायही फार साहाय्य करणारा आहे. ग्रंथकाराचा धंदा स्वतंत्रपणें करून आपला व आपल्या कुटुंबाचा निर्वाह चालवूं असें कोणी म्हणेल, तर तशी त्या धंद्याची स्थिति आपल्या देशांत आली आहे, असें मला वाटत नाहीं. उदरनिर्वाहाचा म्हणून दुसरा कांहीं तरी धंदा करून अपल्या फुरसतीच्या किंवा विश्रांतीच्या वेळीं वाचन व लेखन हीं करावीं यांतच फायदा आहे. आपल्या विश्रांतीच्या वेळीं मन जसें प्रफुल्लित असतें, तसें तें इतर कोणत्याही वेळीं नसतें; व मन प्रफुल्लित असतांना वाचलेलें पुस्तक जितकें लवकर मनांत उतरतें, किंवा मनांतले विचार जितक्या सुंदरपणें लेखणींतून उतरतात, तितक्या लवकर व तितक्या सुंदरपणे दुसऱ्या कोणत्याही वेळीं उतरत नाहीत, याचा अनुभव तुला आतां आलाच असेल. मनाची सुप्रसन्नता हे कोणत्याही स्वीकृत कार्याच्या सिद्धीचे मोठे साधन आहे. मन सुप्रसन्न असतांना केलेलें कार्य शेंकडा नव्याण्णव हिश्शांनीं सिद्ध होतें. त्यांतून ग्रंथाचें अध्ययन, अध्यापन किंवा रचना हीं तर मनाच्या सुप्रसन्नतेंत झालीं तरच फार उत्कृष्ट व्हावयाचीं, नाहीं तर व्हावयाचीं नाहींत, याबद्दल शंकाच नको. अध्ययनाचे बाबतींत माझें म्हणणें किती खरें आहे, याचा तुला अनुभव

आलाच आहे. अध्यापनाचे बाबतींत तें किती खरें आहे, याचा अनुभव आतां दररोज तुला येतच असला पाहिजे. आणि तुझी विद्यार्थिदशेंतली हौस किंवा महत्त्वाकांक्षा जर अद्यापि जागृत असली, तर ग्रंथरचनेच्या बाबतीतही तें किती खरें आहे, याचा अनुभव तुला येईल किंवा आला असेल. बाबारे, मन सुप्रसन्न असणें आणि त्या स्थितींत काम करणें, यालाच कोणतेंही काम मन लावून करणें, असें मी म्हणतों. मन सुप्रसन्न नाहीं आणि त्याला कोणत्या तरी कामाकडे लावण्याची धडपड चालविली, तर एखाद्या ओढाळ गुराला सरळपणें रस्त्यानें नेणाऱ्या गुराख्यासारखीच आपली स्थिति होते. तें भलतीकडे धांवतच असतें, आणि आपण आरंभिलेल्या कामाकडे त्याला ओढून ओढून आणावयाला धडपड करीतच असतों. तशी स्थिति होतां होई तों कधींही होऊं नये. म्हणून मन सुप्रसन्न ठेवण्याचें काम आपण प्रथम हातीं घेतलें पाहिजे. तें आपल्या विश्रांतीच्याच वेळीं शक्य आहे. त्या वेळीं कोणत्याही कामाची ओढ नसते. तेव्हां आपण त्याला लावूं तिकडेच त्याची एकाग्रता होणें अगदीं साहजिक आहे. त्याची व्यग्रता होत नाहीं. असो. परंतु तुझ्या पत्रांतील दुसऱ्याच एका मुद्यासंबंधानें तुला थोडें स्पष्टपणें लिहिण्याचा विचार करून मी दऊत-लेखणी घेऊन बसलों. तों तुझ्या औरंगाबादच्या वर्णनानें माझ्या डोळ्यांपुढें तें शहर उभें राहिल्यामुळें लेखनासंबंधानें सहज तुला लिहिलें. आतां ज्या मुद्यासंबंधानें हें पत्र लिहावयाचें म्हणून मी बसलों, त्या मुद्यासंबंधानें लिहितों.

---

## पाठ ११ वा.



### गोविंदरावांचें आपल्या मुलास पत्र.

#### भाग दुसरा.

' आमच्या वरिष्ठांच्या हाताखालीं आमचें फार दिवस निभेल, असें वाटत नाहीं. लौकरच परत यावें लागेल असें वाटतें. या गृहस्थाच्या मनास कांहींच कधीं येत नाहीं. त्याला सर्व कुचर दिसतात. कोणाला आपलें काम नीट करितां येत नाहीं आणि करण्याची इच्छाही नाहीं, असेंच ते धरून चालतात व हाताखालच्या लोकांस वाटेल तेंस टाकून बोलतात. अशा माणसाच्या हाताखालीं फार दिवस निभाव कधींही लागावयाचा नाहीं.'

हा तुझ्या पत्रांतला मजकूर वाचून मला फार आश्चर्य वाटलें. मी जगांत टक्केटोणपे खाल्लेला माणूस आहें. माझा सगळा जन्म दुसऱ्याच्या हाताखालीं काम करण्यांत गेला. यामुळें तर मला तुझ्या लिहिण्याचा फार चमत्कार वाटला. तुझ्या एकंदर लिहिण्यांतली गोम मला समजून आली. ती ही कीं, तुम्हां नव्या पिढीच्या मुलांना दुसऱ्याच्या हाताखालीं म्हणून केव्हांही राहावयाला नको. प्रत्येक बाबतींत स्वतंत्रता पाहिजे. अमका सांगेल त्याप्रमाणें वागावयाचें, ही अट तुम्हांला अगदीं नको. तुम्हांपैकीं प्रत्येक असें समजतो कीं, आज आपण सेनापति होण्याला सर्वथैव लायक आहों. तेही सेनापति असे कीं, आपल्याला कोणी

वरचा विचारता उपयोगी नाहीं. आपण करूं तो हुकूम शेवटला, आणि धरूं तोच मार्ग उत्तम; त्यांत कोणीं नांवें ठेवूं नयेत. मुकाट्यानें बसावें, किंवा आपली तारीफ करावी. परंतु तुम्हांला असें समजत नाहीं कीं, तुम्ही सगळे सेनापति झालां तर तुमचे हुकूम अंमलांत आणण्याला सेना कोणची? जो तो हुकूम सोडीत बसेल, पण अंमलबजावणीचें कसें होणार? मामलेदारानें केलेला हुकूम बजावण्यास कारकून-कुळकर्णीच नसले, तर मामलेदाराच्या हुकुमाचें काय करावयाचें? सेनापतीनें केलेला हुकूम अंमलांत आणावयाला सेना मुळींच नाहीं, तर त्या हुकुमाचा उपयोग काय? बरें तेंही असो. परंतु तुम्ही एकदम सेनापति होण्याची हांव धरून तरी काय उपयोग? याचा कांहीं विचार करीत जा. माझी तर अशी पक्की समजूत आहे कीं, प्रत्येकानें आपल्या आयुष्याचा थोडाबहुत भाग तरी दुसऱ्याच्या हाताखालीं काम करण्यांत घालविला पाहिजे. तसा तो घालविला, तरच त्याला पुढें स्वतंत्रपणें हुकूम सोडून दुसऱ्याकडून काम करून घेण्याची योग्यता येते. दुसऱ्याच्या हाताखालीं काम केल्याखेरीज दुसऱ्याच्या पुष्कळ वर्षांच्या अनुभवाचा व ज्ञानाचा उपयोग करितां येणार तरी कसा? आणि आपलें ज्ञान वाढणार कसें? मुला, दुसऱ्याच्या हाताखालीं दिवस काढणें हें शाळेंत जाण्यासारखें आहे. शाळेंत जसें शिक्षण होतें, तसेंच तें पुढें दुसऱ्याच्या हाताखालीं काम करावें लागल्यानें होतें. तेव्हां अमक्याच्या हाताखालीं आपल्याला काम करणें शक्य नाहीं, आणि अमका वरिष्ठ अधिकारी आपल्याला पसंत नाहीं, हें

म्हणणें म्हणजे आपला कच्चेपणा उघड करून दाखविणेंच होय. जो आपला वरिष्ठ असतो त्याच्या गुणावगुणाची छाननी करण्याचा अधिकार आपल्याकडे नाहीं. त्याच्या इच्छेप्रमाणें आपण काम करावयाचें असतें. आपल्या इच्छेप्रमाणें त्यानें कामें सांगितलीं पाहिजेत असें मात्र नाहीं. तुला तुझा वरिष्ठ चांगला वाटतो कीं नाहीं, हा प्रश्नच नाहीं. तूं आपल्या वरिष्ठास आवडतोस कीं नाहीं, हा प्रश्न. या प्रश्नाचें उत्तर द्यावयाला तयार हो. तूं जें लिहिलेंस कीं, आपलें फार दिवस येथें निभावयाचें नाहीं, तें कां बाबा? दुसऱ्याशीं आपलें जमवून घ्यावयाचें ही कला कांहीं लहानसहान नाहीं; ती फार थोड्यांना साधते. आणि ती ज्याला साधेल, त्यालाच खरोखरी पुढें वरिष्ठ अधिकाऱ्याची योग्यता येते. आपल्या इच्छेप्रमाणें जो करीत नाहीं, त्याच्या हाताखालीं आपलें निभावयाचें नाहीं, अशी भावना धरूनच जर प्रत्येक माणूस चालूं लागेल, तर कोणालाच कोणाच्या हाताखालीं काम करणें शक्य होणार नाहीं. जो वरिष्ठ असेल त्याच्या इच्छेप्रमाणें हाताखालच्या लोकांनीं काम केलें, तरच कोणचेंही काम त्वरित आणि व्हावयाला पाहिजे तसें होणार आहे. नाहींपेक्षां कोणचेंही काम केव्हांही धड होणार नाहीं. तर बाबारे, अमक्याशीं माझें पटावयाचें नाहीं, असें धरून काम करण्यास पुढें होऊं नये. धमक अशी पाहिजे कीं, मी कोणाशींही पटवून घेईन. टांकीचे घाव सोसल्याखेरीज देवपण नाहीं. जगाचे आघात सोसल्याखेरीज साधुत्व नाहीं. परतंत्रेच्या द्वारांतून गेल्याखेरीज स्वतंत्रता नाहीं. आपलें

मन दाबून ठेवून दुसऱ्याच्या आज्ञेप्रमाणें वागण्यांत एक प्रकारचें शिक्षण आहे. तें शिक्षण मिळालें कीं, पुढें स्वतंत्रपणें आपलीं कामें करण्याला आपण योग्य होतों. म्हणून माझें तुला असें सांगणें आहे कीं, अमका वरिष्ठ चांगला नाही, आणि त्याच्याशीं आपले पटायचे नाहीं, असले विचार तूं मनांतसुद्धां आणूं नकोस. त्या वरिष्ठाचे आंगचे अवगुण पाहण्यांत आपला वेळ खर्चूं नकोस. गुण काय आहेत ते पहा. त्याच्या ज्ञानाचा व अनुभवाचा जितका उपयोग होईल, तितका करून घे. तूं वरिष्ट होण्याच्या योग्यतेला चढण्याला उत्कृष्ट उपाय म्हणजे कांहीं दिवस तरी कोणाच्या हाताखालीं कनिष्ठपणानें वागणें हाच होय. ज्याच्या हाताखाली तूं वागणार, त्याच्या आंगचे अवगुण एवढ्याकरितां पहा कीं, ते आपल्या आंगी उतरूं नयेत. सैनिक म्हणून काम केल्याखेरीज जो एकदम सेनापति होऊं इच्छितो, तो सेनापति होण्याला केव्हांही योग्य नव्हे, ही गोष्ट पक्की लक्षांत टेव. ती अगदीं विसरूं नकोस. ती विसरलास की, तूं खऱ्या सेनापतित्वाला मुकलास म्हणून समज.

मुला, उपजत स्वतंत्र असा कोण आहे? दुसऱ्यावर अवलंबून राहणार नाहीं, असा प्राणी या जगांत कोठे आहे काय? स्वातंत्र्य हे अत्यंत इष्ट आहे. किंबहुना स्वतंत्र होणें हे प्रत्येकाने आपलें अंतिम साध्य ठेविलें पाहिजे. तें डोळ्यांपुढें ठेवूनच आपलीं कार्यें केलीं पाहिजेत. परंतु परावलंबनाच्या चिंचोळ्या मार्गानें गेल्या-

खेरीज स्वातंत्र्याच्या विस्तीर्ण क्षेत्रांत शिरणें चांगलें नाहीं. तें आपल्यालाच हितावह नाहीं. गुरूवांचून विद्या नाहीं, अनुभवावांचून ज्ञान नाहीं, तसेंच, परावलंबनावांचून स्वावलंबन नाहीं. आईबापांच्या बोटांचा आधार धरून पावलें टाकतां टाकतां मूल स्वतंत्रपणें उभें राहतें. तसेंच, वरिष्ठाच्या हाताखालीं काम करितां करितां आपण श्रेष्ठ बनतो. अशा प्रकारें आपण श्रेष्ठ बनलों, तर तो श्रेष्ठपणा कायमचा; नाही तर तो कायमचा नाहीं, हें पक्कें लक्षांत ठेविलें पाहिजे. परंतु स्वावलंबनाच्या इच्छेचा नाश होईल, इतकें परावलंबनमात्र उपयोगी नाहीं. परावलंबन हे स्वावलंबनाच्या प्राप्तीचे साधन, हें लक्षांत धरून त्याचा आश्रय केला पाहिजे. आपलीं आपल्याला पावलें टाकतां येऊं लागलीं असतांही दुसऱ्या कोणाच्या तरी कडेवर बसूं इच्छिणाऱ्या मुलाचे कोणीही कधीं कौतुक करीत नाहीं. उलट जे ते त्याला दुधखुळे समजते व त्याला कडेवरून घेऊन मिरविणाराला हंसते. कोणत्याही गोष्टीचा अतिरेक कधींच कोणी चांगला म्हणत नाहीं. परंतु जे ज्या वेळीं पाहिजे, ते त्या वेळीं दूर सारण्याची हांव धरिली तर तेही वाईटच. आपल्याला दोन पावलें टाकतां येत नाहीत आणि दुसऱ्या कशाचा आधारही घ्यावयाचा नाहीं. दोन्ही गोष्टी एकदम करूं म्हटलें तर तें मुळींच संभवनीय नाहीं. वरिष्ठाचा अधिकार मानून त्याप्रमाणें त्याच्या आज्ञा पार पाडणें हें एक आपल्या स्वतःच्या उन्नतीचें चांगलेंच साधन आहे. बाबा रे, सगळ्या जगांत कोठेंही पहा, सुव्यवस्था

म्हटली म्हणजे वरिष्ठकनिष्ठ असलाच पाहिजे; सगळेच हुकूम सोडणारे सेनापति झाले, तर कधीं समरांगणांत जय म्हणून मिळावयालाच नको. ज्याला जिकडे हल्ला करावासा वाटेल, तिकडे त्याने आपला मोर्चा फिरवावा! तूं अशा लढाईची काय स्थिति होईल, याची कल्पना कर बरें! लढाई जाऊं दे; एखाद्या घरांतला संसारच कसा काय चालेल, याचा या वर सांगितलेल्या स्वतंत्रतेच्या तत्त्वांवर विचार कर बरे! समज की, तूं त्या घराचा मुख्य आहेस, तुझ्या हाताखालीं चार माणसे आहेत. शिवाय तुझे चार मुलगे, चार मुली, चार सुना अशी मंडळी आहे. घरांतला तूं वरिष्ठ पण तुझ्या हाताखालच्या माणसांनी, व तुझ्या मुलांनीं व लेकींनीं असा विचार केला कीं, तुझे कांहीं ऐकावयाचें नाही, प्रत्येकाच्या मर्जीस जें योग्य वाटेल ते त्याने करावयाचें. अशा स्थितीत संसार कसा काय चालेल? सर्व मंडळीस सुख कितपत मिळेल? सुव्यवस्था कितपत राहील? स्वतंत्रपणापासून होणारे फायदे तुला व तुझ्या कुटुंबास कितपत लाभतील? याचा विचार कर, हे आशीर्वाद.

**ह. ना. आपटे.** करमणूक.

---

## पाठ १२ वा.



## आमचा व अमेरिकन लोकांचा दानधर्म.

### भाग १ ला.

आमच्या देशांतील धार्मिक मनुष्यें जो मागेल त्याला देतात. अनाथाला देणें चांगले. पण पात्रापात्र पाहिले पाहिजे. तसें आमच्या देशीं होत नाही, म्हणून जिकडे तिकडे फार भिकार माजले आहे. "अपात्रीं केलेले दान व्यर्थ होय, अशानें पाप लागतें," असें आमच्या नीतिमान् पूर्वजांचे सांगणे आहेच. परंतु विचार करतो कोण? समजा, एक लट्ठनिरंजन बैरागी आहे. त्याला कोणीं पैसे दिले, तर तो त्यांचा गांजा ओढणार. गांजाच्या व्यसनाने त्याचा स्वतःचा तर बिघाड होतोच, पण त्यापासून मुलांस व दुसऱ्या मंडळींसही तें व्यसन जडतें. कारण अशा साधुसंतांचा कित्ता गिरविणारे फार! तेव्हां अशा तऱ्हेने अपात्रीं झालेल्या दानधर्मापासून देशांत आळस व दुर्व्यसनें माजून, देश निकृष्टावस्थेप्रत पोहोंचतो. मीं स्वतः अनेक क्षेत्रें पाहिलीं आहेत, व तेथील दानधर्माचा प्रकारही पाहिला आहे. तेथील पंड्यांना वगैरे केलेला धर्म अपात्रीं होतो. ते आपल्या यजमानास भिकारी करून सोडतात. जो धर्माचें वगैरे भय दाखवून आपल्या यजमानापासून अधिक हरण करील, तो तीर्थोपाध्याय विद्वान्. त्याला मोठा चलाख व शहाणा म्हणतात. इकडच्या लोकांची दानधर्म

करण्याची रीति आमच्या तिकडच्यापेक्षां फार निराळी आहे. इकडे कोणी रस्त्यांतून भीक मागत फिरत नाहीं. लोकमत आणि राष्ट्राचे कायदे प्रसिद्धपणें भीक मागण्याच्या विरुद्ध आहेत. कोणी दारावर भिक्षा मागावयाला आल्यास त्याला भीक घालीत नाहीत. आंधळींपांगळीं, अशक्त, म्हातारींकोतारीं माणसें कधीं कधीं आगपेट्या, सुतळ्या, आरश्या वगैरे लहानसहान जिनसा घेऊन रस्त्यावर बसलेलीं दिसतात. कोणी धर्मात्मा त्यांपासून एखाददुसरा पदार्थ घेऊन दोनचार पैसे अधिक देतो. जो मागेल त्याला देत नाहींत, एवढयावरून हे लोक दयावान् नाहींत असे समजूं नये. हे लोक पात्र पाहून दान करण्यास फार जपतात. खेडेगांवांतील व मोठमोठ्या शहरांतील लोक आपापल्या गांवच्या अनाथ, व्यंग व काम करण्यास अशक्त अशा मनुष्यांचे प्रतिपालन करण्यास लागणारा पैसा वर्गणी करून जमवितात. ह्याशिवाय दानधर्माकरितां गांवच्या रहिवाश्यांस थोडासा करही द्यावा लागतो, तो ते स्वसंतोषाने देतात. हा पैसा त्या त्या ठिकाणच्या दानधर्मव्यवस्थापक मंडळीच्या हवालीं केला जातो. ह्या मंडळ्यांस " बोर्ड्स् ऑफ् च्यारिटीज् " असें नांव आहे. ह्या मंडळयांचे स्त्रीपुरुषव्यवस्थापक लोकमतानें निवडले जातात; ते फार संभावित, प्रामाणिक आणि धार्मिक असून आपलें काम लक्षपूर्वक आणि मोठ्या आस्थेनें करणारे असतात. इतर सभांची व्यवस्था जशी असते, तशीच या दानसभांची असते. राष्ट्रांत जो धर्म होतो त्यांतील अर्धा पैसा लोकांकडून मिळालेला असून अर्धा सरकारा-

कडून मिळतो. जे खरोखर व्यंग असून आपलें पोट भरण्यास असमर्थ असतात, त्यांच्याकरितां हा सर्व पैसा खर्च होतो.

आमच्या देशांत पुष्कळ लोक असे आहेत की, ते आपलें घर सोडून कधींच जावयाचे नाहींत. इकडच्या लोकांचा प्रकार ह्याहून फारच निराळा आहे. हे लोक व्यापाराच्या व उद्योगाच्या शोधांत पुष्कळ प्रसंगी गांवोगांव हिंडत असतात. दुसऱ्या गांवांत किंवा प्रांतामध्यें गेल्यानंतर त्यांस कदाचित् दरिद्र येतें. ह्याशिवाय युरोपांतून इकडे वसाहत करण्याला आलेल्या लोकांमध्येंही पुष्कळ दरिद्र असते. त्यांस एकदम उद्योगधंदे मिळत नाहीत. अशा प्रकारचे पुष्कळ लोक दारिद्र्यसंकटांत पडून देशभर प्रवास करीत असतात. भिकारीही नानाप्रकारचे आहेत. हे कोठे रहातात, काय करितात, ह्यांची स्थिति कशी आहे, वगैरेचा शोध करणारे पुष्कळ धार्मिक जन इकडे आहेत. त्यांतही स्त्रिया अधिक आहेत. ते सज्जन हें काम केवळ निरपेक्ष बुद्धीनें फुकट करितात. असे असूनही कधी कधी या कामी अव्यवस्था होते, ह्यास उपाय नाही. कोणतेही काम हाती घ्या, त्यांत प्रारंभीं किंवा मागाहून थोडचाबहुत चुक्या व्हावयाच्याच. भ्रम होणें हा मनुष्यधर्मच आहे. जो काम करील तो चुकेल. आमच्या देशांतील बहुतेक लोक आपण कांहीं करावयाचे नाहींत, कोणीं एखादें काम आरंभिलें, तर त्याच्या चुक्या पहावयाला कसे डोळ्यांत तेल घालून तयार. अमेरिकन लोक असे दोष काढून उगीच राहत नाहींत. कोठें कांहीं अव्यवस्था झाली असल्यास ती नाहींशी करण्याचे उपाय योजून, लोको-

पयोगी कृत्यें करणाऱ्या व्यक्तींस फार उत्तेजन देतात. ह्या देशांत दरिद्यास आश्रय देण्याचे दोन प्रकार आहेत. पैकीं पहिला—निराश्रिताला आश्रय देणे—म्हणजे ज्यांस अन्नवस्त्र वगैरे नसेल त्यांस ते देणें. दुसरा—काम करूनही ज्यांस पोटभर अन्न व आंगभर वस्त्र मिळत नाहीं, अशांच्या स्थितीचा शोध करून त्यांची व्यवस्था लावणें. म्हणजे ह्यांच्यावर जुलूम कोणाचा होत आहे, ह्यांचे हक्क काय आहेत, वगैरेंची चौकशी करून जुलमी लोकांपासून त्यांचे संरक्षण करणें.

---

## पाठ १३ वा.



## आमचा व अमेरिकन लोकांचा दानधर्म.

### भाग २ रा.

गांजा, तंबाखू, वगैरेंच्या व्यसनांत अगदीं आसक्त होऊन आळशी बनलेले बैरागी व अशांसारखे शक्ति असून अनुद्योगी असे असणारे अनेक लोक, ह्यांस अविचारानें धर्म करण्यानें आमच्या देशांत भिकार फार वाढलें आहे. तर अशांना धर्म करून, म्हणजे दुर्व्यसनास हस्तावलंब देऊन पापप्राप्ति करून घेऊं नये. ज्याला म्हणून काम करण्याची थोडीअधिक शक्ति आहे, त्याला युनाइटेड्स्टेट्स्मध्यें धर्माचें कांहीं एक मिळावयाचें नाहीं. ह्यांच्या धर्मांतील एक मूलवाक्य, “ ज्याला खावयाचें आहे, त्यानें काम

केलें पाहिजे, " असें आहे. आमच्या इकडे आळस तर विचारूं नका. ज्याला त्याला फुकट बसून खायाला मिळतें. अंगाला भस्म लाविलें, जटा वाढविल्या, माळा गळ्यांत घातल्या किंवा भगवें नेसलें, म्हणजे झालें. तो साधुसंत म्हणून लोक त्याला फुकट खावयाला घालितात. भीक मागणें व मागेल त्याला ती घालणें हें आमचे लोक धर्मांग समजतात. एखादा मनुष्य मोठा रोजगारी झाला कीं, त्याच्या घरीं नातें उकरून काढून खायाला पुष्कळ माणसे मिळतील. परंतु त्याच्या उलट काळ आला कीं पुरे, त्याच्यावर उलटून पडावयाला तेच लोक कमी करणार नाहीत! इकडे तसें नाहीं. सर्व लोक यथाशक्ति उद्योग करितात. गरीब लहान लहान मुलेंदेखील वर्तमानपत्रें घेऊन त्यांत आज अमुक बातमी आहे, म्हणून पुकारीत विकतात. कोणी थंडीचे दिवसांत रस्त्यावरील बर्फ काढतात. निराश्रित विधवाही काम करून पोटाला मिळवितात. त्यांची लहान मुलें अनेक कामे करून आपल्या आयांना मदत करितात. इकडे भिकेलादेखील उद्योगाचें रूप देतात. जिप्सी म्हणून लोक आहेत, ते आमच्या देशांतील कैकाड्यांसारखे भीक मागणारे आहेत. पण ते वाद्यें वगैरे वाजवून लोकांस खुष करितात. कित्येक भिकारी, वानरें, व कित्येक, अस्वले नाचवून जनमनोरंजन करितात. इकडे धर्मशाळा आहेत. त्यांत अनाथ, वृद्ध मनुष्यांस व मुलांस आश्रय देतात. त्यांतदेखील योग्य काम आहेच. इकडे क्षयरोगी फार आहेत. मद्यपान व तंबाखूचें सेवन हीं ह्या रोगाच्या मूळ कारणांपैकीं आहेत; असें असूनही इकडील लोक ह्या व्यसनदूर्या-

तून आपली सुटका करून घेत नाहींत! आमचे लोकही ह्या दोन व्यसनांचें झपाट्यानें अनुकरण करीत असून अगदीं क्षीणशक्ति होत आहेत; आमचे रावसाहेब नाजूक होण्याचें व ह्या वेळीं राव-साहेब भेटावयाचे नाहींत, त्यांचे कपाळ दुखतें आहे म्हणून सांग-ण्याचें कारण ही दारू होय! ह्या व्यसनानें घरांत अतिशय गोंधळ, बाहेर अप्रतिष्ठा आणि पैशाची खाक होते, आणि यमाजी भास्क-राकडे लौकरच जावें लागतें. असें असूनही आमचे लोक ह्या दुर्व्य-सनांत मग्न होत आहेत. धन्य आमची अनुकरणेच्छा! इकडे ह्या व्यसनद्वयानें अनेक लोक रोगी झाले आहेत. कोणी म्हणतात, आमची प्लीहा बिघडली आहे! कोणी म्हणतात, आम्हांस अन्न-पचन होत नाहीं! कोणी म्हणतात, शक्ति नाहीं. अशा मद्य-तमाखू-व्यसननिमग्न झालेल्या अनेक लोकांचीं शरीरें, पुष्कळ रोगांचीं, विशेषतः राजयक्ष्म्याचीं निवासमंदिरें झालीं आहेत. अशा रोग्यांना धर्मशाळेत पाठवितात. येथे धर्मशाळेंत जाणे अत्यंत शरमेची गोष्ट समजतात. "मी मरेन पण धर्मशाळेंत जाणार नाहीं," असे उद्गार काढणारे व त्यांप्रमाणें करणारे लोक ह्या देशांत फार आहेत. पिस्तूल मारून घेतील, पण ह्या अनाथ-गृहांत राहणार नाहींत, असे येथें कांहीं लोक मिळतात. अशा रोग्यांपासूनही त्या ठिकाणीं हलकेंसलकें (कुंड्यांतील फुलझाडांस पाणी घालण्यासारखें) काम करून घेतात. इकडे सर्वत्र आत्म-संमान नांदत आहे. लोकांनीं मिळविलेलें आपण खाऊं नये, असें ह्यांस मनापासून वाटतें. इकडे उगाच कोणी कोणाला पैसा देणार

नाहीं व कोणी घ्यावयाचाही नाहीं. आमच्या तिकडे आत्मसंमान व स्वाभिमान म्हणजे काय पदार्थ आहेत, हें बहुतेकांस ठाऊक-सुद्धां नाहीं. कोणी कांहीं फुकट दिल्यास खुशाल घेतील व म्हण-तील की, एवढ्यावर चार महिने गेले तेवढेच पदरीं पडले! ते कर्ज काढतील. कर्ज न फिटलें, तर पुढील जन्मीं फेडूं म्हणतील. परंतु कर्ज फेडण्यास पुनर्जन्म घ्यावा लागतो आहे, ह्याची त्यांस बिलकुल पर्वा नाहीं!

**पंडिता रमाबाई.** युनाइटेड्स्टेट्स्ची लोकस्थिति आणि प्रवासवृत्त.

---

## पाठ १४ वा.



### नम्रपणा.

ज्या मनुष्यास गर्व असतो, त्यास बहुत करून आपण मोठे बुद्धिवान् आहो, अशी खातरी असते; पण वास्तविक पाहिलें असतां ही खातरी मूर्खपणाचें चिन्ह आहे, असें समजावें. आप-णांत व्यंगें किती आहेत, व आपलें ज्ञान व बुद्धि हीं किती अल्प आहेत, हें ज्याचें त्यास समजावयास लागलें, म्हणजे त्या मनु-ष्यास वास्तविक शहाणपण येत चाललें, असें जाणावें. पूर्णबुद्धि व तन्मूलक सर्वज्ञता या परमेश्वराच्या ठायींमात्र आहेत. हे गुण मनुष्यास कदापि प्राप्त व्हावयाचे नाहींत. मनुष्याच्या बुद्धीचा

व ज्ञानाचा मोठेपणा सापेक्ष आहे; म्हणजे अमका मोठा बुद्धिमान् आहे, किंवा मोठा ज्ञाता आहे, असें म्हटलें असतां त्याची बुद्धि किंवा ज्ञान दुसऱ्यापेक्षां मोठीं आहेत, असा अर्थ होतो; परंतु वास्तविक तीं मोठीं आहेत, असा अर्थ होत नाहीं. खरोखरी पाहतां ती दोन्ही फारच अल्प आहेत; आणि ती अल्पता ज्यास कळूं लागली, तोच मनुष्य अत्यंत बुद्धिमान् व ज्ञाता होय. ज्या पुरुषाची बुद्धि अत्यंत विशद होते, व ज्यास अनेक विषयांची माहिती होते, त्यास कळूं लागतें कीं, ह्या सृष्टींत जाणण्याचे जे विषय आहेत, त्यांपुढें, जे मला विषय ठाऊक आहेत, ते, जसा मोठ्या अफाट वाळवंटापुढे राळ्याएवढा वाळूचा कण, किंवा अमर्याद सागरापुढें जलाचा तुषार, तसे आहेत. तसेंच, हजारों गोष्टी त्यास घडतांना दिसतात, पण त्या कशा घडतात, हे त्यास बिलकुल समजत नाहीं. तेव्हां तेणेकरून मनुष्यांची बुद्धि किती दुर्बळ व मंद आहे व त्यांचें ज्ञान किती अल्प व अपूर्ण आहे, हे त्याच्या मनांत बिंबून गेल्यावांचून रहात नाहीं. यास्तव महाबुद्धिमान् व महाज्ञाते जे असतात, ते बहुत करून नम्र व लीन असतात. गर्व हें अल्पज्ञान व मूर्खत्व ह्यांचे फळ आहे. हाच अर्थ मनांत आणून, भर्तृहरि म्हणून एक कवि होता, त्यानें असें लिहिलें आहे कीं, " ज्या वेळेस मला यत्किंचित् समजूं लागलें, तेव्हां मी गर्वानें अगदीं अंध होऊन गेलों, व मला सर्व जग तुच्छ वाटावयास लागलें; पण वास्तविक ज्ञात्यांचा सहवास होऊन त्यांपासून वास्तविक ज्ञान प्राप्त झालें, तेव्हां माझा सर्व गर्व जाऊन

मी अगदीं अज्ञान आहें, असे मला वाटूं लागलें." पोप म्हणून इंग्लिश कवि आहे, तो असे म्हणतो कीं, "विद्या शिकणें असल्यास पुरी शिकावी, अर्धीबोबडी शिकूं नये; कारण अल्प ज्ञानापासून वाईट परिणाम होतात." ज्ञानास मद्याची उपमा देऊन तोच कवि आणखी असें लिहितो कीं, "ज्ञान हें चमत्कारिक मद्य आहे; हें थोडें प्याले असतां मनुष्यास फार धुंदी येते, पण ह्याचें पुष्कळ सेवन केल्याने ती धुंदी उतरते!"

मनुष्याचें भूषण विद्या होय आणि विद्येचे भूषण विनय होय. फूल स्वतः शोभायमान पदार्थ खरा, पण सुगंधाने त्यास जशी योग्यता अधिक येते, तसा विद्येस विनयाने अधिक थोरपणा येतो. नम्रता अनेक व्यंगें झांकिते, व तिच्यायोगाने लोकांचें लक्ष आपल्या उण्यांकडे न जातां गुणांकडेमात्र वळते. जो मनुष्य आपले गुण पुढें पुढे आणीत नाही, प्रसंगच आल्यास ते संकोचवृत्तीने पुढे प्रकट करितो, त्याचे गुण त्या संकोचाने विशेष शोभतात. कमलादि फुले कांहीं संकुचित व कांहीं विकसित असतां जशीं खुलतात, तशी पूर्ण फुललीं असतां खुलत नाहींत. ह्याप्रमाणें मनुष्याच्या गुणांची गोष्ट आहे.

बुद्धि व ज्ञान ह्यांच्यायोगानें आपण आपणांस मोठे गणितों; पण हा थोरपणा आपणांस शेवटपर्यंत उपयोगीं पडत नाहीं. उत्तम रीतीनें वागून जो मोठेपणा मिळवावा, तोच परिणामीं उरतो. आजपर्यंत ह्या जगांत आपणांस बुद्धिमान् व ज्ञाते म्हणविणारे किती लोक होऊन गेले, व सर्व लोक आपलीं मतें अनन्य-

भावानें मानितात व पराकाष्ठेचीं चाहतात, हें पाहून त्यांस केवढा आनंद होत होता, व हीं आपलीं मतें अक्षय अशींच राहतील असा केवढा भरंवसा वाटत होता, हें विद्येचा इतिहास पाहिला असतां आपल्या लक्षांत येईल. तसेंच, त्याच इतिहासावरून त्या मतांपैकीं हजारों मते खोटीं ठरून पृथ्वीवर अगदी नाहींतशीं झालीं, व त्या मतांच्या कर्त्यांचीं नांवेंसुद्धां लोक विसरून गेले, हेंही आपणांस समजेल. कांहीं मते कांहीं काळीं लोकांस इतकी प्रबळ वाटत असतात की, तीं उत्पन्न करणारा मोठा अलौकिक बुद्धीचा पुरुष आहे, असें त्यांस वाटत असते, व त्याचे वाक्य सर्व शिरसामान्य करीत असतात. त्याच्या म्हणण्यास जें जे अनुकूल, ते तें खरें, व त्यास जें विरुद्ध तें खोटें. ह्याप्रमाणें मनुष्यांच्या मनांवर जो पुरुष अंमल करीत असतो, त्याच पुरुषाचीं मतें कांहीं काळाने खोटी ठरून ती आपलीं म्हणण्यास साधारण लोकदेखील लाजतात, असे हजारों उदाहरणांत झाले आहे. राजकीय अंमल जसा अशाश्वत आहे, तसा विद्वत्तेचा अंमलही अशाश्वत आहे. तेव्हां अशा विनाशी गोष्टीविषयीं डौल मिरवणें हें उपहासास्पद नव्हे काय? तसेंच, धन व अंमल हीं जशी अंतकाळीं उपयोगीं पडत नाहींत, तशी विद्याही त्या प्रसंगीं उपयोगी पडत नाही. आपण जीं बरींवाईट कृत्यें केली असतील, व बरेपणाने लोकांशीं वागलों असूं, तें आपल्या कामास पडेल. विद्या वगैरे सर्व शाळूसोबती होत. निर्वाणीचे म्हटलें म्हणजे एक सुकृतमात्र होय. अंगांतल्या शक्ति वगैरे राहिल्या, इंद्रियें विगलित

झालीं, आणि परलोकची हद्द दिसूं लागली, म्हणजे इहलोकचे सर्व विषय तुच्छ व क्षुल्लक दिसूं लागतात. ह्या समयीं केलेल्या सत्कृत्यांच्या आठवणीनेमात्र काय ते जिवास समाधान वाटत असतें; व तीं कृत्येच आपणांबरोबर परलोकी येऊन तेथें आपल्या उपयोगी पडतात; व त्यांच्यायोगाने आपलें या जगांत आपणांमागे नांव चांगल्या रीतीनें राहते. तर इतकें उपयोगीं जें सुकृत् ते जोडण्यास विनय हे एक मोठें कारण आहे. त्याचे अवलंबन शहाण्यानें करावें.

**कृष्णशास्त्री चिपळूणकर** अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह.

---

## पाठ १५ वा.



### वाचनाची अभिरुचि.

वाचनाच्या योगाने मनोरंजन होऊन ज्ञानप्राप्ति होते. कोणाची संपत्ति जाऊन तो दरिद्री झाला असेल, कोणाची सुस्वरूप स्त्री अथवा जिवापेक्षांही पलीकडे असा एकुलता एक मुलगा निवर्तला असेल, कोणास व्यंगता आली असेल, कोणास सन्मित्रवियोग झाला असेल, अथवा असाच दुसरा कोणता तरी प्रसंग कोसळून कोणास फार दुःख झालें असेल, किंवा आपलें जीवित कंटाळवाणें झाले असेल, अशा वेळी सर्व दुःखांचा परिहार होण्यास वाचनासारखें उत्तम साधन नाही. कानफ्यूशियस स्वतःविषयी लिहीत

असतां म्हणतो कीं, " मी आस्थेनें ज्ञान सपादन करीत असतांना अन्नपाणी विसरलों होतों. तेंच ज्ञान संपादन केल्यावर जो मला आनंद झाला, त्यांत मी आपले दुःख विसरून गेलो. वृद्धापकाळ मजला गांठीत आहे, याचे मला भानही राहिले नाहीं. " वाचनांत मन व्यापृत असल्यामुळे दुःखवेग कमी होतो. जग क्षणभंगुर असून या भवसागरांत मनुष्यावर अनेक बिकट प्रसंग नेहमीं येत असतात, असे विचार मनांत येऊन आपणांस दुःखाचा विसर पडतो. इतकेंच नाहीं,तर तें दुःख सहन करण्याइतके धैर्य आपल्या आंगीं वाचनाच्या योगानें येतें.

आळस हा मोठा दुर्गुण आहे, आणि तो आमच्या लोकांच्या अगदीं हाडींमासीं खिळला आहे. ' आलस्य हि मनुष्याणां शरीरस्थो महारिपुः । '—मनुष्याच्या शरीराला आळस हा महान् रिपु आहे, असे भर्तृहरीनें एके ठिकाणीं म्हटले आहे. आळस गुन्हा समजून आळशी लोकांस ग्रीक लोक शिक्षा करीत असत. परंतु आळसानें आम्हांस अगदीं खाऊन टाकिलें आहे. पोटास मिळविलें पाहिजे म्हणूनच आमचे लोक उद्योग करितात, असें म्हणावें लागतें; नाहीं तर त्यांनीं उद्योग केला नसता. थोडेंफार शिकून एखादी नौकरी मिळवावयाची किंवा घरीं चालत असलेला धंदा तसाच पुढें चालवावयाचा. तेवढे केलें म्हणजे आपली इतिकर्तव्यता आटोपली, असें समजून बाकी राहिलेला वेळ कित्येक नाचतमाशांत किंवा गप्पागोष्टींत, कित्येक झोंपा काढण्यांत व कित्येक आळसांत घालवितात. पैशापेक्षांही अमोल असा वेळ ते

दररोज किती तरी फुकट दवडितात! परंतु त्या वेळेचा कांहीं तरी उपयोग करावा, असें कधींही त्यांच्या मनांत येत नाहीं. शाळेंत जीं काय दोनचार पुस्तक वाचण्यांत आलीं तेवढींच. शाळा सोडल्यावर पुस्तकाकडे ते ढुंकूनसुद्धां बघत नाहींत. पुस्तक न उघडण्याविषयीं जणूं काय ते शपथच वाहतात! जगांत काय चाललें आहे, हे त्यांना कधींही कळत नाहीं. तसेंच, आपल्या भाषेंत इतिहास, काव्यें, निबंध, कादंबऱ्या इत्यादि ग्रंथांत चांगले ग्रंथ कोणते त्यांचीं नांवेंसुद्धां त्यांना माहीत नसतात. नुसतीं नांवेंही जेथे माहीत असण्याची मारामार, तेथें त्या ग्रंथांचें वाचन कसलें! आमचे सुतार, सोनार, लोहार, तेली, तांबोळी, साळी, माळी, शेतकरी इत्यादि अनेक लोकांकडे पाहिलें, म्हणजे आम्ही म्हणतों याची सत्यता सहज दिसून येईल. त्या लोकांस नुसतें ट फच जर येत नाहीं, तर पुस्तकें वाचण्याची गोष्ट दूरच राहिली. एखाद्या सुंदर राजवाड्यांत किंवा सुरम्य उपवनांत आंधळ्यास नेलें असतां जसा त्यास आनंद व्हावयाचा नाहीं, तद्वत्च या आमच्या निरक्षर बंधूंची स्थिति होय! पुस्तकांत सांठवून ठेविलेल्या ज्ञानामृताचा अंशतः लाभ झाल्यामुळें विद्वान् लोकांस जो आनंद होतो, तो या बिचाऱ्यांस काय बरें ठाऊक!

ज्यांना लिहिणेंवाचणें येत नाहीं किंवा विद्येचा ज्यांना गंध नाहीं, अशा अशिक्षित किंवा अडाणी लोकांची ही स्थिति झाली. आतां सुशिक्षित म्हणविणाऱ्या लोकांत वाचनाची कितपत आवड असते हें पाहिलें पाहिजे. विश्वविद्यालयाची प्रवेशपरीक्षा पास

झाल्यावर अथवा एखादी नौकरी मिळवून पोटाचा व्यवसाय करूं लागल्यावर आमचे बहुतेक तरुण लोक पुस्तकांची रजा घेतात. वर्षानुवर्षें हे पुस्तक उघडीतसुद्धां नाहींत. एखादुसरें शिळें वर्तमानपत्र वाचले तर वाचलें, नाहीं तर त्याचीही त्यांना मुळीं अपेक्षा नसते. त्यांच्या घरांतील सांदीकोपऱ्यांत कोठें पूर्वीचीं चारपांच जुनाट पुस्तकें पडून राहिलीं असलीं, तर तींही वाळ-वीच्या भक्ष्यस्थानीं पडतात. नवीन उपयुक्त पुस्तकें पैसे खर्चून संग्रहीं ठेवण्याची बुद्धि तर दूरच, परंतु पुस्तकालयांतून किंवा मित्रांकडून आणून वाचावीं, एवढीसुद्धां त्यांना अभिरुचि नसते! कामधंदा केल्यावर बाकीचा वेळ ते गजिफा, पत्ते, बुद्धिबळें किंवा बिझिक खेळण्यांत, विड्या फुंकण्यांत किंवा गप्पा मारण्यांत घाल-वितात! आणि त्यांतच आपणांस धन्य समजतात.

ज्यांना विद्येचा गंध नाहीं अशा लोकांकडून काळाचा अपव्यय होत असल्यास त्यांत त्यांचा फारसा दोष नाहीं परंतु जे आपणांस सुशिक्षित म्हणवितात, वेळेची किंमत ज्यांना पूर्ण माहीत आहे, अशा लोकांनीं वेळेचा दुरुपयोग करणे, हें खरोखर त्यांना अगदीं लाजिरवाणे होय! ही शोचनीय स्थिति कधीं नाहीशी होईल ती होवो!

पाश्चात्त्य राष्ट्रांत जी जागृति दिसून येते व एवढी झपाट्याने जी त्यांची उन्नति होत आहे, तिचें कारण त्यांची वाचनप्रियता होय. तिकडील लोहार, सुतार, काम करणारे मजूर इत्यादि गरीब लोकही आपला धंदा आटोपून वर्तमानपत्रें, मासिक पुस्तकें, ऐति-

हासिक ग्रंथ, सुरस कादंबऱ्या व धर्मविषयक व्याख्यानें वाचण्यांत आपला कालक्षेप करितात. आपल्या मिळकतींतून चांगलीं पुस्तकें विकत घेऊन त्यांचा संग्रह करितात. त्यामुळें ग्रथकर्त्यांस चांगलें उत्तेजन मिळून ते उत्तम ग्रंथ तयार करितात. सर जॉन लबॉक यानें एके ठिकाणी म्हटले आहे की, " पुढील पिढींत वकील, वैद्य, प्रोफेसर, यांपेक्षां कारागीर, शिल्पकार व मजूर हे अधिक वाचणारे निघतील. " आणि असें होणें अगदीं इष्ट आहे. वाचनापासून पाश्चात्त्य लोकांचे पुष्कळ कल्याण झालें आहे, आणि त्या बाबतीत आम्ही त्यांचेच अनुकरण करणें हें अगदी श्रेयस्कर होणार आहे.

सुप्रसिद्ध निबंधकार लॉर्ड बेकन यानें म्हटले आहे कीं, " वाचनानें मनुष्य निष्णात होतो, भाषणानें हजरजबाबी होतो, आणि लेखनाच्यायोगानें त्याच्या आंगीं टापटीप येते. " मनुष्य निष्णात असण्यास तो बहुश्रुत असावा लागतो. आणि वाचनाच्या योगानें बहुश्रुतपणा आंगीं येतो. जगांत दोन प्रकारचे लोक असतात. एक वयोवृद्ध आणि दुसरे ज्ञानवृद्ध. वयोवृद्ध असतात त्यांना कालपरत्वे वृद्धत्व येतें. परंतु जे ज्ञानवृद्ध असतात, त्यांचे वय जरी लहान असले, तरी बहुश्रुतपणामुळे त्यांचे विचार प्रगल्भ असतात, व त्यांना जगाचा अनुभव विशेष असतो. आर्यधर्मशास्ता मनु यानें लिहिलें आहे:—

न तेन वृद्धो भवति येनास्य पलितं शिरः ।
यो वै युवाप्यधीयानस्तं देवाः स्थविरं विदुः ॥

वाचन हें ज्ञान मिळविण्याचें सुलभ व उत्कृष्ट साधन आहे, हें पूर्वी सांगितलेंच आहे. जॉन स्टुअर्ट मिल्ल यानें एके ठिकाणीं लिहिलें आहे की, ‘ मी अगोदर पचवीस वर्षे जन्मून जितके ज्ञान मला झाले असते, तितके बापाच्या शिक्षेमुळे झाले. ’ आयुष्याचा अपव्यय होऊ नये, थोडया काळांत आपणांस पुष्कळ ज्ञान प्राप्त व्हावें, याकरितां लहानपणापासून वाचनाची संवय लागली की, आपण निरनिराळे ग्रंथ पाहूं लागतों व नवीन ज्ञान संपादन करण्याची आपणांस गोडी लागते.

वाचनापासून जे फायदे आहेत, त्यांतील मुख्य मुख्य सांगणे अवश्य आहे. वाचनापासून मनोरंजन होऊन ज्ञानप्राप्ति होते. पूर्वीच्या लोकांचा अनुभव मिळून त्याचा आपणांस फायदा होतो. मन आळशी न राहतां उद्योगांत गुतलेले राहतें. विचारशक्ति जागृत होऊन ज्या गोष्टी पूर्वी आपणांस कळत नसतात, त्या आपोआप कळूं लागतात. दुर्गुणी लोकांविषयीं तिरस्कार उत्पन्न होतो. सत्समागमाचा लाभ होऊन आपलें वर्तन सुधारतें. आपल्या अंगचे नैसर्गिक दुर्गुण नाहींतसे होतात. अंगीं विनय व नम्रत्व येतें. असत्याचा द्वेष व सत्याविषयीं प्रीति उत्पन्न होते. विवेक उत्पन्न होऊन आपणांस आपली खरी योग्यता समजते. भूतदया आंगीं येते. इहलोकीं सुख मिळून परलोकीं सद्गति मिळते. इत्यादि अनेक फायदे होतात. आणि म्हणूनच मोठमोठया लोकांनीं वाचनाचे एवढे पोवाडे गाइले आहेत !

**या. शं. वावीकर.** वाचन–ग्रंथमाला.

---

## पाठ १६ वा.



### ईश्वरनिष्ठा.

आपल्या नीतितत्त्वांची संस्थापना ईश्वरनिष्ठेवर झाली पाहिजे; आणि तरुणपणांत अशी निष्ठा असली, म्हणजे तिच्यायोगानें आपणांस एक विशेष प्रकारची शोभा प्राप्त होते. तरुणपणीं आपली चित्तवृत्ति शुद्ध आणि उदार असते, आणि अशा वेळीं जर सर्व शक्तिमान्, परमन्यायी व परम दयाळू अशा सृष्टिकर्त्या परमेश्वराविषयीं स्वाभाविकपणे आपले मनांत आश्चर्य, कृतज्ञता आणि प्रेमबुद्धि हीं उत्पन्न झालीं नाहींत, तर खरोखरच आपले हृदय मोठें निष्ठुर व उदासीन असले पाहिजे. सृष्टिरचनेंत जिकडे तिकडे दिसून येणारें त्याचें अप्रतिम चातुर्य व अद्भुत सामर्थ्य पाहून जर आपलें मन आश्चर्यभरित होत नाहीं, व हितप्रद आणि आनंदजनक अशी त्याची सृष्टिरचना पाहून जर आपले मनांत कृतज्ञताबुद्धि व प्रेमबुद्धि उत्पन्न होत नाहीं, तर पुढें प्रपंचांत मनुष्यांच्या क्षुल्लक करणीचें आपण कितीसें अभिनंदन करणार? परंतु अशी वृत्ति असणें मनुष्यत्वाला शोभत नाहीं. बाल्यावस्थेंत ज्यानें आपलें अनेक संकटांपासून रक्षण केलें व तरुणपणांत आणि पुढेंही काय, जो आपलें सदोदित संरक्षण करणार, तसेंच आपले हृदयांत सदसद्विचारशक्ति जागृत ठेवून जो आपल्याला या प्रपंचांत नेहमीं योग्य तीच दिशा दाखवितो, असा जो आपला पिता, माता, मित्र व सोयरा परमेश्वर

त्याच्यासंबंधानें आपले हृदयांत पूज्यबुद्धि व ममता या सर्वदा असल्याच पाहिजेत. त्या नसतील तर आपणांस पाषाणाशिवाय दुसरी कशाचीही उपमा साजणार नाहीं. परंतु हृदयांत असा भक्तिभाव बाळगीत असतां, आपल्या धर्मश्रद्धेला नीट वळण लागावें म्हणून, आपणांला चांगला विचारही केला पाहिजे. सर्व मनुष्यजातीला सामान्य अशीं ठळक ठळक धर्मतत्त्वें कोणतीं, याचा नीट विचार करून, त्यांच्या अनुरोधानें आपली धर्मनिष्ठा आपण ठेवावी; व एकदां हीं हितकारक तत्त्वें मनांत ठसल्यावर अनीतिमान् किंवा खऱ्या धर्मभ्रष्ट अविचारी मंडळीनें त्यांसंबंधानें आपला कितीही उपहास केला, तरी त्यांपासून परावृत्त होण्याचें आपण क्षणभरही मनांत आणूं नये.

तसेंच, ज्या गोष्टी पवित्र आहेत, त्यांसंबंधानें आपले मनांत आपण नेहमीं पूज्यबुद्धि राखावी. तारुण्याच्या मदांत किंवा दुसऱ्या अविचारी लोकांच्या नादीं लागून त्यांची टवाळी करणें वाजवी नाहीं. तसें केलें असतां, एक तर आपण आपला अविचार प्रकट करितों, आणि शिवाय, धर्मासारख्या अत्युपयोगी व महत्त्वाच्या बाबतींत चवचलपणा केल्यानें आपल्या पदरीं मूर्खपणा येऊन इतर लोकांना आपल्या आंगीं वृथा अभिमान आहे, असें वाटूं लागतें; व त्यामुळें त्यांना आपला तिरस्कार करण्याची बुद्धि उत्पन्न होते. आपल्या स्वैरवृत्तीमुळें आपण लोकांस शहाणे असें तर वाटत नाहींच, पण उलट त्यायोगें आपल्या मनाचा उथळपणामात्र प्रकट होतो. खरोखर, क्षुल्लकशा अपरि-

पक्क ज्ञानानें उन्मत्त होऊन, किंवा सर्वथैव अज्ञानामुळें, ज्या गोष्टींसंबंधानें इतर लोकांना पूज्यता वाटते, त्याच जर आपण तुच्छ केल्या, तर आपण मोठे अपराधी आहों, असें आपणांस वाटलें पाहिजे.

आतां, धर्मसंबंधी गोष्टींविषयीं पूज्यबुद्धि असावी, असें आम्हीं म्हटलें, एवढ्यावरून धर्माचाराविषयीं आपण मोठें अवडंबर माजवावें, किंवा आचरणांत असामान्य गौरव दाखवावा, असें आमचें म्हणणें नाहीं. आपली समवयस्क जी इतर तरुण मंडळी तिच्याप्रमाणेच आपणही वागलें पाहिजे. आपल्या वयास व योग्यतेस न शोभेल अशी गांभीर्यवृत्ति पतकरून मोठ्या आढ्यतेने तिचा तिरस्कार करणें बरोबर नाहीं. आपले ठिकाणीं खरी धर्मनिष्ठा असेल, तर आपल्या आचरणांत सौम्यपणा व भलेपणा हे आलेच पाहिजेत. खऱ्या धर्मशीलतेचा व साधेपणा, दयालुता, मनमिळाऊपणा, उदारता वगैरे स्तुत्य गुणांचा कोणत्याही प्रकार विरोध नाहीं. जर हे गुण आंगीं नसले, तर धर्मवृत्तीचा कोणताही परिणाम आपणांवर झाला नाहीं, किंबहुना ती आपले ठिकाणीं अंशतः नाहीं, असें आपण समजावें. ज्या प्रकारची ईश्वरनिष्ठा सर्व मनुष्यांना व विशेषतः तरुणांना अत्यवश्यक आहे असें आम्ही म्हणतों, तीपासून त्यांना जें जें न्याय्य, सत्य, शुद्ध व स्तुत्य असेल, त्याचीच आवड लागली पाहिजे; तीपासून त्यांना आपलीं कर्तव्यें उत्तम रीतीनें बजावण्याची हौस व उमेद आली पाहिजे, आणि तीपासून जें जें अयोग्य वाटेल

तें तें धर्मबाह्य असें समजून, त्यापासून परावृत्त होण्याची बुद्धि झाली पाहिजे. अशा प्रकारची निष्ठा तरुणांत असणें अत्यंत हित-प्रद आहे, व म्हणून प्रत्येक तरुण मनुष्यानें ती आपले हृदयांत ठेवावी.

त्रि. का. पित्रे. नीतिमुक्ताहार.

---

## पाठ १७ वा.



### आखाडा बंद झाला.

वाईस ईश्वरसेवेंत दिवस कंठावे, म्हणून पुण्याहून मी आलों खरा, पण माझें लक्ष प्रपंचांतील घाणीमध्यें लुडबुडावयाचें तें लुड-बुडतच होतें. प्रपंचाची दगदग नाहीं म्हणून रिकामें असलेलें मन लोकांच्या उठाठेवींकडे धांवावयास लागलें. मला सुख मिळतें, मी भाग्यवान्, मी कर्ता, मी थोर अशी लोकांनीं माझी कीर्ति गावी, ही माझी धडपड एरवीं पाहतां कांहीं गैर नाहीं. परंतु त्या धडपडीमुळें लोकांच्या दोषांचीही उठाठेव करायला मी लागलों. अमक्याचा मुलगा असा, तमक्याची रीत अशी, तो असा वागतो, आणि त्यानें तें तसें केलें, या भानगडी मला कशाला हव्या? पण नाहीं. पडद्याआडच्या गोष्टीसुद्धां मी आपली मान उंच करून पहावयास लागलों. लोकांचे ऐकींव खरेखोटे

दोष ऐकण्याची मला इच्छा, व त्यांची चर्चा करून धिक्कार प्रद-र्शित करण्याची घाई. आणि तीही कां? तर इतरांपेक्षां आपणांत कांहीं तरी अधिक आहे, असें लोकांस दिसावें आणि आपल्याला वाटावें म्हणून. धिक्कार असो या असल्या छिद्रान्वेषी जिण्याला! शेजारीपाजारी, आप्तइष्ट किंवा स्वकीयमात्र जितके त्यांच्या वैगुण्या-कडे माझ्या मनाची धांव. त्यांच्या दोषांची, व्यंगांची किंवा उणे-पणाची चर्चा मोठ्या आढ्यतेने करण्यांत आपली फुशारकी. कसला हा अधम स्वभाव आणि कोण ही नीचता! न कळत आणि हळू-हळू माझ्या मनाचा ओढा अशा या अधम वृत्तीकडे धांवूं लागला. मी वारंवार म्हणें, आपल्या शेजाऱ्यांच्या दोषांची कींव यावी, त्यांच्या व्यंगांचे वाईट वाटावें, तें एकीकडेच राहून माझा हा असा प्रकार कां? परक्यांच्या व्यंगांनीं हर्ष कां होतो? अपराध व अवगुण यांवर झांकण घालणें हा आपला धर्म. दुस्मानगिरी नसतां दुस्मानासारखें कां वागावें? रिकामपणा मिळाला, किंवा चारचौघे जमले कीं, चालू झाला हल्ला आपल्या ओळखीच्यांच्या व शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या अब्रूवर! ही संवय अंगवळणीं पडली कीं, मग ती सुटणें कठिण. मला हा दोष असें वाटत असे पण ती खोडच मला लागली. निंदा करीत बसल्याशिवाय मला चैन पडेनासें झालें. लोकांच्या व्यंगांची चर्चा ऐकावयास मिळाली नाहीं कीं मला वाईट वाटूं लागे. लोकांच्या अवगुणांची खें खें खिद्‌ळत वाच्यता करावयास मिळाली नाहीं, म्हणजे धन्यता वाटेना व सुख होईना, असा प्रकार होऊं लागला. फुरसुतीच

वेळेच्या गप्पा, चारचौघे जमलेल्या वेळीं इकडल्या तिकडल्या गोष्टी, आणि मोठ्या आनंदानें सांगावयाचें वर्तमान म्हणजे शेजाऱ्यापाजाऱ्यांची निंदा, असें होऊन बसलें. या नीच वृत्तीला आळा राहीनासा झाला. पण माझे डोळे चटकन उघडण्यासारखा एक प्रसंग आला, त्या दिवसाची आठवण मला अद्याप आहे. त्या दिवशीं मला पश्चात्ताप झाला त्याचा मला अद्याप आनद वाटतो. आमच्या शेजारीं एक बचंभट म्हणून फारच गरीब ब्राह्मण रहात असे. बिचारा भारी गरीब आणि सात्त्विक ब्राह्मण. दारिद्र्यानें सारखा गांजलेला. त्याची थट्टा आम्हीं कधीं कोणीं केली नाहीं, असा दिवस जात नसे. एके दिवशीं त्याला काय वाटलें कोण जाणे. मोठ्या पहांटेस तो माझ्याकडे आला. मीही नामस्मरणादि आटोपून प्रातःस्नानाच्या तयारींत होतों. नमस्कारचमत्कार संपतात न संपतात तोंच मीं मोठ्या आढ्यतेनें म्हटलें, ‘ कां बचंभट आज प्रातःकाळींशी स्वारी इकडे आली ? ’ त्यानें उत्तर केलें, ‘ नाहीं, एरवींच. ’ मी—‘ मग पाठवून द्यावयाचें ठरलें का मुलीला सासरीं ? ’ हा माझा प्रश्न ऐकतांच त्यानें तोंड वेडेंवांकडें केलें; आणि त्याचा कंठ एकाएकीं दाटून आला. त्याला कांहीं एक बोलवेना. मीही जरा चपापलों. आणि मनांत आलें कीं, आपण बोललों तें याला लागलें कीं काय, कोण जाणे. आणि विषय बदलावा म्हणून मीं म्हटलें, ‘ त्या नगरकरांच्या घरचें प्रयोजन उद्यां कीं परवां हो ? ’ त्याला उत्तर, ‘ मला माहीत नाहीं, ’ एवढेंच बचंभटानें दिलें. आणखी दोनतीन प्रश्न मीं इकडले तिकडले

केले. पण त्यांनाही तशींच उत्तरें. मीं पुन्हा म्हटले, ‘ बचंभट, कां, तुम्हांला वाईट कां वाटलें ? मला काय माहीत ? मीं सहज विचारलें. ’ त्यावर बचंभट म्हणाला, ‘ नाहीं, आप्पा ! आतां जगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. येथें कोणी कोणाचा नाही बरें ! शेजारी काय, पाजारी कायं, आप्त काय, इष्ट काय, सारेच चालत्या काळाचे. संकट पडलें, अडचण आली, प्रसंग गुजरला, तर थट्टा करायला, टर उडवावयाला सारे तयार. फाटूं लागलें तर सारे जण ज्यास्त फाडणारे. टांका घालणारा कोणीही नाहीं. उघडें आंग करावयाला साऱ्यांना हवें. पांघरूण घालणारा कोणी नाहीं. अशा लोकांत राहण्यापेक्षां जंगलांत फत्तर होऊन पडलेले बरें ! हें त्याचें बोलणे मला अगदीं खरें वाटलें, आणि चटकन मी शुद्धीवर आलों. मग पुढें त्याच्या घरगुती अडचणीची त्याने कर्मकथा सांगितली व त्याला, मला काय सांगावयाचें तें मीं अगदीं मनोभावानें कळविलें. ‘ आप्पा ! आतांच्या काळीं घरोबा, ऋणानुबंध, स्वकीयपणा हीं सगळीं नातीं मुलामा चढविलेल्या भांड्यासारखीं झालीं आहेत बरें ! ’ असें बचंभट मला म्हणाला. तें वाक्य मला एकसारखें अद्याप आठवत आहे. त्या दिवसापासून मी तर कानाला खडाच लावून घेतला कीं, अतःपर दुसऱ्याच्या निंदा म्हणून ऐकावयाच्या नाहींत. हा माझा निर्धार कदाचित् ढांसळताहीं. पण मला स्वतःला अशा चुगलखोरीचें आणि रिकाम्या निंदेचें दुःख काय, याचा अनुभव यावयाला लागला, आणि तिनें तर मला एके दिवशीं चांगलें शुद्धीवर आणिलें. मी इकडे फुरसुतीच्या वेळीं

आपला काळ लोकांच्या निंदा आणि चुगल्या श्रवण करण्यांत घालवूं लागलों, तों माझ्याही निंदा व चुगल्या लोक करूं लागले, असे मला समजलें. लोक म्हणतात, "लेकाचे व यांचें जमेना म्हणून हे इकडे निघून आले." "सास्वेची डाळ सून शिजूंच देईना." "लेकाशीं भांडून हे आले आतां वाईला." असें रोज एकेक वर्तमान ती मला सांगूं लागली. तिच्या त्या गोष्टी ऐकून, 'काय हे रिकामटेकडे लोक? यांना कशाला आमच्या उठाठेवी हव्या? यांचें काय जाते आम्हीं कांहीं केलें म्हणून?' इत्यादि प्रश्न आतां मला सुचूं लागले. मी तिच्या आंगावर वस्सदिशीं जाई आणि तिला म्हणें, 'म्हणेनात कां हवें तें. तूं कशाला ऐकून घेतेस?' असा तिला मी बुद्धिवाद सांगें. पण त्यामुळें तिचे कधीं समाधान झाले नाहीं, व माझ्या मनाला चुटपुट लागावयाची ती बंद पडली नाहीं. एवढेंमात्र झालें कीं, आपण लोकांच्या निंदा करितो तें ऐकून त्यांना किती दुःख होत असेल, याची आतां मला चांगली कल्पना आली. आणि तेव्हां-पासून लोकांच्या चुगल्या ऐकण्यांत किंवा निंदा करण्यांत एक प्रकारची मला हौस वाटत असे ती वाटेनाशी झाली. एके दिवशीं पुन्हा तिनें लोक आपल्याला असें असें म्हणतात, म्हणून कांहीं सांगितलें, तें ऐकतांचमात्र मी संतापलों व तिला रागें भरलों. तेव्हां, "लोकांच्या निंदा आणि उठाठेवी करतांना कसें गोड लागतें? आणि लोकांनीं निंदा केली म्हणजे हें असें!" असें म्हणत ती निघून गेली. त्या दिवशींमात्र मला पक्कें समजून आलें

कीं, द्यावें तसें घ्यावें आणि करावें तसें भरावें. लोक माझी कधीं आजपर्यंत निंदा करीत नव्हते, आणि ती आतांच कां करूं लागले, हेंही पण माझ्या ध्यानांत येऊन चुकलें. लोकांत चर्चा होते ती अगदीं खोटी अशी कधींच असत नाहीं, मुळांत कांहीं तरी खरें हें असतेंच, आणि कितीही गुप्त म्हणून आपण एखादी गोष्ट ठेविली, तरी ती लोकांत आल्याशिवाय रहात नाहीं. हे कसें काय, याचा मला अद्याप अचंबा वाटत आहे. तें असो. लोकांच्या निंदा करण्याचें पाप माझ्या हातून इतःपर होईनासें झालें. लोकांस रिकाम्या चकाट्या पिटतांना पाहून त्यांस मी सांगत असें कीं, बाबांनो, नकारे तुम्ही असे गरीब बिचाऱ्या स्वकीयांच्या अब्रूवर नाहक हल्ले घालीत राहूं; त्यांत तुमचा फायदा कवडीचाही नाहीं, आणि दुसऱ्यांसमात्र विनाकारण दुःख होतें.' पण ते कसचे माझें ऐकावयाला ? लोकांच्या उठाठेवींत मौज वाटते आणि फुकटफाकट करमणूक होते ती कां सोडा ? हा त्यांचा विचार. मला त्यांचे ते चाळे आवडत नाहींत, असें त्यांना कळतांच माझ्या घरीं भरत असलेला तो चकाट्या पिटण्याचा आखाडा बंद झाला.

धनुर्धारी. वाईकर भटजी.

# पाठ १८ वा.



## मानसिक सुख.

शारीरिक सुखाचा अनुभव प्राणिमात्रास सारखाच असतो, तशी मानसिक सुखाची स्थिति नाहीं. त्यांत ( शारीरिक सुखांत ) मनाच्या परिपक्व दशेचा कांहीं संबंध नसतो. आम्रफलाच्या रुची-पासून जें सौख्य प्राप्त होतें, तें एखाद्या मोठ्या तत्त्ववेत्त्यापासून तों अगदीं अशिक्षित अशा एखाद्या खेडवळापर्यंत सारखेंच असतें. त्यांत भेद म्हणून कांहींच नसतो. मानसिक सुखाची तशी स्थिति नाहीं. तें प्राप्त होण्यास विद्येच्या योगानें मन चांगलें संस्कृत होऊन चांगल्या प्रगल्भ दशेस आलेलें असलें पाहिजे. अशा स्थितीमध्यें केवळ सृष्ट्यवलोकनानेंदेखील आपणांस अवर्णनीय सुख प्राप्त होतें. आपण पावसाचेंच उदाहरण घेऊं. हें पाणी पूर्वीं कोठें होतें, तेथून आकाशांत कसे गेलें, त्या ठिकाणीं आधा-रावांचून कसें राहिलें, व आज पावसाच्या रूपानें खालीं येण्यास त्याला काय कारण झाले; त्याचप्रमाणें पाऊस वर्षाच्या एका कालांतच कां पडतो, या गोष्टींची माहिती आपणांस पुस्तकांतून अगर अन्य रीतीनें झाल्यास किती समाधान वाटतें ! ह्या आनं-दाचा अनुभव ज्यांच्या मनांवर विद्येच्या संस्कारांचा परिणाम मुळींच झाला नाहीं, त्या मनुष्यांस येणें अगदीं अशक्य गोष्ट आहे. ही गोष्ट कधींही होणार नाहीं. ह्याप्रमाणें सृष्टिचमत्कारांचें ज्ञा

आपणांस पुस्तकांतून अगर अन्य साधनांनीं मिळाल्यास जर इतका आनंद होतो, तर अशा प्रकारचें ज्ञान आपणांस आपल्या स्वतःच्या बुद्धीच्या जोरावर प्राप्त झाल्यास किती बरे आल्हाद होईल ? एखाद्या ज्योतिष्यास अगर रसायनशास्त्रवेत्त्यास जेव्हां एखादा नवीन शोध लागतो, तेव्हां त्यास जो आनंद होतो त्याची बरोबर कल्पना ज्याला विद्येची अभिरुचि लागली आहे, त्याला करितां येईल. त्याने आपल्या आवडत्या विषयांतील एखादा खुबीदार प्रश्न आपल्या बुद्धीच्या जोरावर सोडविल्यावर आपल्या मनाची स्थिति कशी होते, ह्याची कल्पना करावी. एखाद्या मनुष्यास कविता करण्याचा नाद असतो. त्याप्रमाणे तो पुष्कळ कविता करूनही जातो. परंतु एखादे वेळीं विशेष प्रकारची शब्दयोजना किंवा अर्थगांभीर्य त्याच्या मनोदयाप्रमाणे साधल्यास त्यास पराकाष्ठेचा आनंद होतो. अशा आनंदाची गोडी ज्या लोकांना लागते, त्यांना शारीरिक सुखें व त्यांपासून होणारा आनंद हीं अगदी तुच्छ वाटूं लागतात. त्यांकडे मग ते दुर्लक्षही करूं लागतात. आज ज्या सृष्टिचमत्कारांचे कार्य-कारणभावसंबंध कळून आले आहेत, व ज्या नियमांचा शोध लाग-ल्यापासून कोट्यावधि प्राण्यांचें हित झालें आहे, व होत आहे, त्या नियमांच्या शोधकांच्या स्थितीचा विचार केल्यास वरील म्हण-ण्याच्या सत्यतेला पुरावा मिळण्यासारखा आहे. कित्येकांची स्थिति तर फारच दुःखद असून, त्यांनी आपल्या आवडत्या विष-याच्या पायीं आपल्या सर्व शारीरिक सुखाचा त्याग करून टाकला होता. ह्याचें कारण हेंच कीं, त्यांना ज्या सुखाची गोडी लागली

होती. त्यापुढें सर्व जगही तुच्छ वाटत असे. एरवीं अशा तऱ्हेचें वर्तन शक्य कसे बरे होईल? कधींही होणार नाहीं. आतां हें जें सौख्याचे विवेचन झालें, तें फक्त मनाच्या एका भागाच्या म्हणजे बुद्धीच्या संस्कारांपासून होणाऱ्या सुखाबद्दल झाले. त्याचप्रमाणे मनाच्या इतर भागांपासून म्हणजे दया, क्षमा, शांति, परोपकार वगैरे मनोवृत्तींपासूनही होणाऱ्या सुखाची स्थिति अशींच आहे. आपल्या अंगांत उलट फेड करण्याचें सामर्थ्य असतांही दुसऱ्यानें केलेला अपकार शांतपणें सहन करून घेणें, आपल्या सौख्यांतील पुष्कळ भाग कमी होत असला, तरी तिकडे दुर्लक्ष करून दुसऱ्याच्या विपत्तीचा परिहार करण्याचा प्रयत्न करणें, कित्येक लोक विलक्षण संकटांत सांपडून यातना भोगींत असतील, त्यांची सुटका करण्याकरितां अत्यंत मेहनत करून त्या विपत्ति-मुक्त मनुष्यांपासून नव्हे, तर शक्य असेल तितक्या इतर लोकां-पासून आपले नांव व प्रयत्न गुप्त ठेवणे, इत्यादि गोष्टींपासून होणारें सुख बुद्धिसामर्थ्यजन्य सुखाप्रमाणेंच अवर्णनीय आहे. आतां व्यवहारांत दया, परोपकार इत्यादि गुणांचा प्रादुर्भाव केवळ लौकिकसंपादनार्थच पुष्कळ वेळा दिसून येतो. पण वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें कीर्तीकडे मुळींच लक्ष न देतां आपल्या मनाच्या समाधानार्थच सदर कृत्ये करणारे महात्मे क्वचित् द
पडतात ही गोष्ट सत्य आहे. मात्र अशा व्यक्तीं
थोडें आहे. जगांत हिऱ्यांची संख्या इतर व
थोडी आहे. केवळ परोपकारार्थ देह

आपल्या व इतर राष्ट्रांच्या इतिहासांत बरींच सांपडतात. सदर गुणांची कीर्तीशीं मैत्री असल्यामुळें सदर गुणनिदर्शक गोष्टी जेव्हां मनुष्याच्या हातून होतात, तेव्हां त्या केवळ कीर्तिसंपादनार्थच असतात अशी भ्रांति पडते, व त्या गुणांची किंमतही कमी होते. शिवाय मनुष्याचें वर्तन नेहमीं स्वहितपरच असतें, असा जो सामान्य नियम आहे, त्याला अनुसरून खरोखर स्थिति असते, आपणांस जी भ्रांति वाटत असते ती भ्रांति नसते, असा आपल्याला जरी पुष्कळ वेळा प्रत्यय येतो, तरी अशा वेळीं आपण आपलें मत एकदम देणें योग्य होणार नाहीं. सूक्ष्म विचार करून पाहिलें असतां कीर्ति ही सदर गुणांची सहगामिनी असल्यामुळें येत आहे किंवा तत्प्राप्त्यर्थ सदर गुणांचा आविर्भाव होत आहे, ही गोष्ट कळून येणार आहे. लोभ, मोह, राग, मत्सर वगैरे मनोवृत्ति निसर्गतःच दुःखमूलक आहेत. त्यांच्यापासून सुखप्राप्तीची इच्छा करणेंच वेडेपणा आहे. अशा मनोवृत्तींचा त्यागच केला पाहिजे. राग, मत्सर वगैरे वृत्ति क्षणभर जरी मोकळ्या सोडल्या, तरीदेखील कित्येक प्रसंगीं त्यांपासून महत्संकटें येऊन सर्व आयुष्याचा नाश झाल्याचीं उदाहरणें आहेत.

केशव गोविंद पटवर्धन. सुख-ग्रंथमाला.

---

## पाठ १९ वा.



## वाघिणीचें दूध.

कोणत्याही कारणांनीं म्हणा, किंवा कोणत्याही विलक्षण योगांनीं म्हणा, हिंदुस्थानच्या लोकांस धार्मिक, सामाजिक, व्यावहारिक आणि राजकीय व्यवहारांत आपली सुधारणा करून घेण्यास इंग्लिश सरकारची कारकीर्द हें एक अपूर्व पर्व प्राप्त झालें आहे. ह्याचा उपयोग करून घेण्यास आम्हीं विसरतां कामा नये. शिवाय आम्हांला असें कळून येईल कीं, पाश्चात्त्य विद्येच्या आणि विचारांच्या संस्कारानें आपल्या देशबांधवांच्या अंतःकरणांत आपल्या धार्मिक, सामाजिक आणि राजकीय स्थितीविषयीं चांगला प्रकाश पडत चालला आहे. ह्या विषयांच्या संबंधानें जगांतील सर्व विद्याचारसंपन्न राष्ट्रें आजपर्यंत काय करीत आलीं आहेत, आणि सध्यां काय करीत आहेत, हें आमच्या मंडळीस समजूं लागलें आहे. हें ज्ञान प्रबल आहे; तेजस्वी आहे; अन्याय सहन करणारें नाहीं; सत्यास अंतर देणारें नाहीं; न्यायाची कांस सोडणारें नाहीं; दुसऱ्यास भिऊन मागें सरणारें नाहीं; उगीच धमकीला डरणारें नाहीं; धर्मवेडाच्या नादीं लागणारें नाहीं; जनरूढीस डोक्यावर बसूं देणारें नाहीं; पैशास हात जोडणारें नाहीं; विपत्तीस जुमानणारें नाहीं; आणि दुसऱ्याची छाप आपणावर बसूं देणारें नाहीं. हें शेवटीं विजयी व्हावयाचें आहे. हें आपल्या मंड-

ळीस इतरांपेक्षां श्रेष्ठ करणारें आहे; इतरांस आपणांपुढें हात टेंकायास लावणारें आहे; इतरांस आपल्या भजनीं लावणारें आहे; इतरांस आमची पूजा करावयास भाग पाडणारें आहे; किंबहुना, हें आपणांस उत्तम म्हणून सर्व कांहीं जें आहे, तें प्राप्त करून देणारें आहे. आणखी ह्या ज्ञानाची प्राप्ति आणि अभिवृद्धि होण्यास सर्व साधनांत अत्युत्तम साधन वाङ्मयाचा अभ्यास होय. तुम्हीं सूक्ष्म विचार करून पाहिला, तर तुम्हांला कसें कळेल कीं, आजपर्यंत जीं माणसें मोठीं पराक्रमी म्हणून होऊन गेलीं, त्यांच्या मस्तकीं वाङ्मयाचा वरदहस्त होता. शिवाजीमहाराज घ्या, नेपोलियन बोनापार्ट घ्या, गौतमबुद्ध घ्या, पैगंबर महंमद घ्या, लॉर्ड बेकन घ्या, जॉर्ज वॉशिंग्टन घ्या, ग्लॅडस्टन घ्या, बिस्मार्क घ्या, लॉर्ड रॉबर्ट घ्या, मोल्टके घ्या, कोणीही घ्या, त्यांच्या थोरपणाच्या बीजाचें पृथक्करण केलें म्हणजे असें स्पष्ट दिसून येईल की, त्यांत वाङ्मयाच्या सहवासाच्या अथवा अभ्यासाच्या फलाचें कांहीं विशेष प्राबल्य आहे. जगाच्यापुढें चांगलें म्हणून जें काय येत आहे, त्याची उत्पत्ति चांगल्यापासून झालेली असली पाहिजे; आम्रफळें आम्रवृक्षालाच यावयाचीं, तीं कधीं धोतऱ्याच्या झाडाला यावयाचीं नाहीत. आणि जगांत जें काय चांगले म्हणून झालेलें आहे, त्याचें वसतिस्थान वाङ्मय आहे. तेव्हां, वाङ्मय हे सगळ्या कल्याणाचे मूळ आहे, असें झालें. ही सर्वसामान्य वाङ्मयाची गोष्ट झाली. ही ज्याच्या त्याच्या मोठेपणाप्रमाणें ज्यास त्यास लागू पडावयाची आहे. आपलें वाङ्मय लहान नाहीं,

फार मोठें आहे. तो समुद्र आहे. आणि तो पाहिजे तितका वाढवितां येण्यासारखा आहे. तो वाढविण्यास इंग्लिश वाङ्मयासारखा साह्यकारी देवानें आपल्यास आपल्या घरांत आणून दिला आहे. इंग्लिश वाङ्मय केवळ कल्पवृक्ष आहे. त्यापाशीं पाहिजे तें मागा, तें देण्यास तो तयार आहे. युरोपियनांचे बायबल मागा, मुसलमानांचें कुराण मागा, हिंदूंचे वेद मागा, बौद्धांचे ग्रंथ मागा, पृथ्वीच्या पाठीवरच्या रोम, ग्रीस, इराण, फ्रान्स, जर्मनी, युनैटेड्स्टेट्स, रशिया, इत्यादि कोणत्याही देशाचे अर्वाचीन किंवा प्राचीन इतिहास मागा, वैद्यकग्रंथ मागा, शिल्पग्रंथ मागा, राजनीतिग्रंथ मागा, पुराणें मागा, गानवादनशास्त्रग्रंथ मागा, राज्यक्रांतीच्या कथा मागा, पाहिजे तें मागा, देण्याची तयारी आहे. जणुं काय अमक्या एका विषयावर आपल्या संग्रहीं ग्रंथ नाहीं, असे म्हणावयाचें नाहीं, असें त्यानें व्रतच घेतलें आहे. दूरची गोष्ट नको, आमच्यांतल्या कांहीं शोधक मंडळीस श्रीशिवाजीमहाराजांचें साद्यंत आणि यथातथ्य चरित्र लिहावयाचे आहे; ती मंडळी त्यासंबंधाची कांहीं माहिती, विलायतेंतल्या महासंग्रहांतल्या जुन्या ग्रंथांवरून आणि त्यांच्या भाषांतरांवरून मिळविण्याचा भगीरथ प्रयत्न करीत आहे. शिवाय, आमच्या वेदवाक्यांच्या अर्थाविषयीं सांप्रतकाळीं आमच्या इकडचे मोठमोठे नामांकित पदवीधर पंडित डा० हौ, मोनियर वुल्यम्स्, मोक्षमुल्लर इत्यादि युरोपस्थ ज्ञानसंपन्नांच्या मतांस विशेष मान देत असतात, हें मीं तुम्हांला सांगितलें पाहिजे असें नाहीं. ह्याचें तात्पर्य असें आहे कीं, युरोपियन लोकांनीं

आमचे इकडचें ज्ञान आपल्या वाङ्मयांत भरलें आहे. त्याविषयींच्या त्यांच्या उत्कंठेचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. त्यांतलें एकच येथें सांगतों. पहिला गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टिंग्स् ह्यास, काशी येथें चेतसिंगाच्या दंग्याच्या वेळीं, चवताळलेल्या वैराग्यांचा वेढा पडला असतां तितक्यांत त्यास पारशी भाषेच्या व्याकरणाविषयीं जें काय कळलें, त्याचा संग्रह त्यानें तेथें करून घेतला. असे उद्योग आज शेकडों वर्षे चालले आहेत. त्यांच्या योगानें त्यांची ज्ञानसंपत्ति अपरंपार वाढली आहे. दुसरा चमत्कार असा झाला आहे कीं, ह्या इंग्लिश वाङ्मयाच्या संगतीनें हिंदुस्थानांत फ्रेंच वाङ्मय आणि जर्मन वाङ्मय आलें आहे. तींही वाङ्मयें अशींच ज्ञानपरिप्लुत आहेत. अशा मंडळीसह वर्तमान एवढा मोठा साह्यकारी आपल्या महाराष्ट्रवाङ्मयास आजपर्यंत कधीं मिळाला नाहीं, आणि पुढेही कधीं मिळावयाचा नाहीं. ह्याचा उपयोग आम्हीं करून घ्यावा. म्हणजे, इंग्रजींत सगळ्या जगाचें ज्ञानभांडार भरलें आहे, तें महाराष्ट्रांतल्या जामदारखान्यांत आणून भरण्याविषयीं आम्हीं नित्य प्रयत्न करावा, हेंच आमचें सध्यांचें सगळ्यांत मोठें आणि अत्यंत पवित्र कर्तव्य आहे. चिपळूणकरांनीं इंग्लिश विद्येला वाघीण म्हटलें आहे. तशी आपल्या महाराष्ट्रभाषेला वाघीण बनवावयाची आहे. ती तशी बनली म्हणजे तिच्या दुधाच्या सेवनानें, आपण वाघांच्या बच्चासारखे बलाढ्य, उत्साही, धैर्यशाली, असाध्य कर्मांचा तिरस्कार करणारे, आणि स्वावलंबी असे होऊं. इंग्लिश वाङ्मयाच्या

प्रसादानें आम्ही तसे—इंग्लिशांसारखे—झालों आहों, असें जेव्हां जगास दाखवूं, तेव्हांच कृतकृत्य होऊं. ह्यांत इंग्लिश लोक आणि आम्ही महाराष्ट्रीय लोक ह्या दोघांचीही धन्यता आहे. कां कीं, त्यांत गुरुत्व आणि शिष्यत्व या दोहोंची सार्थकता आहे.

**वि. कों. ओक.** महाराष्ट्रवाङ्मय.

---

## पाठ २० वा.



## वक्तृत्व आणि शिवाजी.

मनुष्याच्या करणीवरून त्याच्या आंगीं असणाऱ्या निरनिराळ्या गुणांचें अनुमान करितां येतें, हें जर खरें असेल, तर ज्या महापराक्रमी पुरुषानें हिंदूंस दास्यमुक्त करून सुमारें शंभरदीडशें वर्षें त्यांस स्वातंत्र्यसुखाचा व राजवैभवाचा अनुभव करविला, त्याचे ठायीं प्रकृत गुणाचें (वक्तृत्वाचें) वास्तव्य बरेंच कल्पिलें पाहिजे, असें आम्हांस (निबंधमालाकारांस) वाटतें. यापूर्वीं शिकंदरप्रभृति जे अनेक रणधुरंधर महाविख्यात राज्यकर्ते होऊन गेले, त्यांपैकीं बहुतेकांची राज्यसाधनसामुग्री त्यांच्या पूर्वजांनींच अगोदर करून ठेविलेली होती. यास्तव एखाद्या कारागिरास उत्तम प्रकारचीं हत्यारें तयार करून दिलीं असतां मग जशी त्यांवर त्यानें आपली करामत दाखवावी, तसाच प्रकार शिकंदर, सीझर, नेपोलियन, इत्यादि राज्यकर्त्यांचा झाला. पण मराठी

बादशाहीचा ज्याने पाया घातला, त्यास सगळें राज्य विश्वकर्म्या-प्रमाणें केवळ नवेंच बनवावें लागलें. त्याची मूळची सामग्री म्हटली म्हणजे लोखंडासारखें भक्कम शरीर आणि मोठी विशाल बुद्धि एवढीच काय ती होती जे मावळे लोक आतांप्रमाणेच शेतभात, मोलमजुरी किंवा काबाडकष्ट करूनच पिढ्यानपिढ्या राहिलेले व अगदीं भाबडे व भित्रे असल्यामुळें हूं कां चूं न करितां परराज्याचा जुलूम सोसण्यास अगदीं घटावून गेलेले, त्यांचाच स्वभाव अगदीं बदलून टाकून मुसलमान व रजपूत यांशीं छाती भिडवून लढण्याचें सामर्थ्य शिवाजीनें त्यांच्यांत आणिलें. फार तर काय, पण ज्यांस आपला धर्म काय, आपला देश काय, याची साधारण चांगलीशी कल्पनाही कधीं झाली नसेल, त्यांचा मुसलमानांशीं पुरा दुजाभाव करून देऊन त्यांचा रणोत्साह व आपल्या ठायीं अनन्यभाव त्यानें इतका वाढविला कीं, हरएक प्रसंगीं आपापलीं शिरें हातांवर घेऊन व प्रत्यक्ष प्राणही अर्पण करून त्याची कामगिरी त्यांनीं बजाविली. सिंहगडावर कल्याण दरवाजाशीं जो घोरतर प्रसंग झाला—कीं, ज्या वेळेस काळोख तर ऐन मध्यरात्रीचा, जवळ दिवा ना बत्ती, चढावयाला कडा सारखा पंचवीसतीस हात उंच, खालच्या लोकांची चाहूल ऐकून वरील रजपूत हत्यारबंद होऊन तयार झालेले, त्यांतून सर्वांत धैर्य खच-ण्यासारखी गोष्ट काय का, ऐन गर्दीच्या वेळेस त्यांचा मोहरा (तानाजी) पडून सर्वांचें काळीज उडून गेलेले; पुढें जावें तर रजपुतांच्या तरवारीशीं गांठ; मागें हटावें तर कडेलोट होऊन

अंगाच्या ठिकऱ्यानठिकऱ्या उडायाच्या ! असो, पण अशा भयंकर प्रसंगींही—कीं, जो नुसता मनांत आणला असतांही अगास थरकांप सुटतो—तानाजीचा धाकटा भाऊ सूर्याजी तिळमात्रही धैर्यभग्न न होतां आपल्या सोबत्यांस सांगतो, " गड्यांनो, मागऱ्या शिड्यांच्या आशेवर जर तुम्ही मागें परत पहात असाल, तर दोर मीं मघांच कापून टाकिले; तर आतां वांचावयाचा मार्ग म्हटला म्हणजे येथील शिपायांवर तुटून पडल्याखेरीज दुसरा कोणताच नाहीं." असे म्हणून स्वतः त्यांचा म्होरप्या होऊन त्यानें रजपुतांस कापून काढले, आणि पधरा कोस दुरून गडाकडे डोळे लाविलेल्या आपल्या धन्यास, तेथील एका खोपटास आग लावून फत्ते झाल्याची वर्दी दिली!—तर असे प्रसंग लक्षांत आणले असतां आपल्या जवळच्या लोकांस अगदीं आपलेसे करून टाकण्याचें सामर्थ्य शिवाजीच्या अंगीं किती अद्भुत असेल हें काय सांगावें! वस्तुतः पाहतां तो कोण व मावळे लोक कोण! बरें पैशाऱ्या लालुचीनें त्यांनीं त्याचा आश्रय धरला असेल म्हणावें, तर वरील प्रसंगीं खुद्द थर्मापिलीवरही कडी झाली असतां शिवाजीनें आपल्या संवगड्यांस एवढी बक्षिसें तरी काय दिलीं म्हणाल, तर पांचसात रुपयांचें एक एक रुप्याचे कडे किंवा एखादें मुंडासें! तेव्हां वरील अद्भुत सामर्थ्य आमच्या महावीराच्या वाक्पटुत्वाचें होय यांत संशय नाहीं. वरील गुण त्यानें अडाणी व साधेभोळे जे मावळे लोक त्यांस वश करून घेण्यांत जसा दाखविला, तसाच विजापुरच्या दरबारीं वागलेल्या वकिलाशी बोलणें लावून त्यावर आपली

पूर्ण छाप ठेवण्यांत व तसेंच पुढें मोंगल सरदारांस वगैरे आंतून आपल्या पक्षास अनुकूल करून घेण्यांतही प्रकट केला. असो. तर याप्रमाणें महाराष्ट्र देशाच्या इतिहासांतील वक्तृत्वाचें पहिलें उदाहरण त्या इतिहासाचा मुख्य आधारस्तंभ जो वरील पुरुष तो होय.

**वि. कृ. चिपळूणकर.** निबंधमाला.

---

# पाठ २१ वा.



## मत्सर.

**मत्सरें भाग्यही गेलें । मत्सरें बुद्धि नासली ॥**
**भक्ति ना ज्ञान ना कांहीं । अत्र ना परही नसे ॥**

रामदास.

मनुष्याचे खरे शत्रु म्हटले म्हणजे त्याच्या अंतःकरणांतील षड्विकार हे होत. हे मनोविकार अनावर होऊन माणसाचे कह्यांत न राहतां उलटे त्यालाच कह्यांत ठेवूं लागले, म्हणजे त्यांपासून मनुष्याचें जें अगणित नुकसान होतें, त्याचा शंभरावा हिस्सादेखील त्याचे बाह्य वैरी कितीही दुष्ट असले, तरी त्यांपासून होऊं शकत नाहीं. अशा प्रकारचे हे महाघातकी असल्यामुळें फार पुरातन कालापासून त्यांना अंतःकरणराज्याच्या हद्दपार करण्यास किंवा तसें करितां न आल्यास योग्य उपायांनीं त्यांवर सक्त नजर ठेवून कोणत्याही प्रसंगीं त्यांस बंड करितां येणार नाहीं, अशा

तऱ्हेनें त्यांच्या बरगड्या मोडण्यास, साधुपुरुष व शहाणे मनुष्य निरंतर सल्ला देत आले आहेत. ते षड्रिपु कोणते हें सर्वांना माहीत आहे. ते काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर हे होत. जरी मत्सर या रिपूची गणना शेवटीं केली आहे, तरी त्यावरून दुष्टत्वामध्यें तो इतर पांचांपेक्षां कमी असावा, असा समज होतां उपयोगी नाहीं. इतर पांचांपैकीं कोणताही मातला म्हणजे तो मनुष्याची जितकी हानि करितो, तितकीच हानि, मत्सरविकारही मातला म्हणजे करण्यास चुकत नाहीं. ह्या विकाराचें सामान्य स्वरूप म्हटलें म्हणजे, दुसऱ्याचा कोणत्याही बाबतींत आपणापेक्षां अधिक उत्कर्ष झालासा वाटला, म्हणजे मनुष्याचे मनांत एक प्रकारचें असमाधान व व्यग्रता उत्पन्न होऊन उत्कर्ष पावलेल्या मनुष्याविषयीं कुढा भाव धरण्याकडे त्याची प्रवृत्ति होणें, हें होय. खरोखर, अविचारामुळें अशा रीतीनें मन विकृत होऊं देणें, हें मनुष्याच्या मूर्खपणाचेंच द्योतक होय, दुसरें कांहीं नव्हे. या संसारांत एकमेकांवर अवलंबून राहणें आपणांस भाग आहे, व म्हणूनच, एकानें दुसऱ्याच्या उपयोगीं पडावें, व त्यास साह्य करावें, अशी विधात्यानें योजना केली आहे. स्वकीयांविषयीं प्रेम व भूतदया ह्या ज्या दोन चित्तवृत्ति निसर्गतःच एकमेकांमध्यें दिसून येतात, त्यांवरूनदेखील ‘मनुष्यांनीं एकमेकांशीं सलोख्यानें वागावें’ या नीतिनियमाचें चांगल्या रीतीनें समर्थन करितां येईल. आतां जर एखाद्यानें ह्या नियमाचा विनाकारण भंग करून आपणांशीं वैर आरंभिलें, तर त्या मनुष्या

विषयीं आपणांस राग यावा, हें स्वाभाविक आहे. आपल्या स्वाभाविक हक्कांची जर एखाद्याकडून निष्कारण पायमल्ली होत असली, तर त्या मनुष्यासंबंधानें आपल्या मनांत असंतोष व तिरस्कारबुद्धि उत्पन्न झाल्यावर आपणांस नांवे ठेवण्यास कोणालाही जागा मिळणार नाहीं. पण, एखाद्यानें आपला कोणताही अपराध केला नसतां आणि आपणांस कोणत्याही प्रकारें दुःख दिलें नसतां सुदैवाने त्याचा कांहीं बाबतींत आपणांपेक्षां अधिक उत्कर्ष झाला म्हणून तेवढ्यावर आपण त्याचा द्रोह करूं लागलो, तर तें आपणांस कधींही शोभणार नाहीं. त्यामुळें खास आपली गणना नीच पुरुषांत होईल. परोत्कर्षासहिष्णु मनुष्य कोणालाही आवडत नाहीं, आणि सर्व लोक त्याचा तिरस्कार करितात. हा विकार किती निंद्य आहे, हें मत्सरी मनुष्यांच्या वर्तनावरूनदेखील स्पष्ट दिसून येण्यासारखें आहे. असूयारहित लोकांनाच हा निंद्य वाटतो असें नाहीं, तर मत्सरी मनुष्याला स्वतःलाही तो तसाच वाटतो; आणि म्हणूनच तो लोकांना स्पष्ट दिसून येऊं नये, याकरितां तो मनुष्य आपला मत्सर झांकून ठेवण्याविषयींही आपणाकडून घेतां येईल तितकी काळजी घेतो. पण दुसऱ्यांचा उत्कर्ष सहन न होऊन निष्कारण त्यांचा दृढ द्वेष करणारे सर्वजनतिरस्कृत मत्सरी मनुष्य फारसे नसतात. ज्यांचें मात्सर्य अगदीं शिखरास जाऊन पोहोंचलें आहे, असे निंद्य मनुष्य क्वचित्च आढळतात. मनुष्याच्या सर्व मनोविकारांमध्यें, मग तें चांगले असोत कीं वाईट असोत, निरनिराळे अनेक पर्याय

आहेत. कधीं कधीं ह्या विकारांचा मनाला नुसता झटका लागल्या-सारखा होतो; परंतु याखेरीज त्यावर त्यांचा कोणताही चिर-स्थायी परिणाम होत नाही. प्रसंगविशेषीं ते थोडेसे खवळले, तरी लवकरच त्यांचा उपशम होतो, आणि त्यायोगें चित्त-व्यग्रता नाहींशी होण्यास फारसा वेळ लागत नाहीं. पुष्कळदां ह्या विकारांचा क्षोभ होण्यास आरंभ होतो न होतो इतक्यांतच ते पूर्व स्थितीवर येतात. आपली योग्य मर्यादा ओलांडून जाऊन जर कधीं काळीं ते बेफाम झाले, तर मनुष्याच्या देहस्वभावामुळें, किंवा मनांतील सद्भावामुळें, त्यांचें प्रशमन त्वरित होऊन मनु-ष्याच्या प्रकृतीवर त्यांचें विशेषसें कार्य होत नाहीं. मत्सरविका-राचेही असेच प्रकार केले आहेत. सद्विकारांना सर्वतः हुसकावून लावून ज्यांच्या मनोराज्याचें स्वामित्व एकटें मात्सर्यच बळकावून बसलें आहे, असे निंद्य पुरुष जरी थोडे आहेत, तरी त्या दुष्ट विकाराची छाया प्रसंगविशेषीं मनोभूमीवर पडून ज्यांचीं अंतःकरणें थोडा वेळ तरी तमाच्छादित झालीं आहेत, अशीं मनुष्यें लक्षावधि सांपडतील. आपणांस ज्या कांहीं गोष्टी चांगल्याशा वाटतात, त्यांचा उपभोग घेण्यास आपण सर्व प्रकारें लायक आहों, अशी मनाची समजूत झाल्यावर, आपल्या दुर्दैवानें दुस-ऱ्यांस मोठ्या भोगांचा उपभोग मिळूं लागला, तर त्यांची ती सुस्थिति पाहून ज्यांच्या मनाला केव्हांही तिळमात्रदेखील चुटपूट लागत नाहीं, अशीं भाग्यवान् मनुष्यें या जगांत दुर्मिळ आहेत. अशा प्रसंगीं, चित्ताची व्यग्रता होणें, हाच साधारण

नियम आढळून येतो. आतां अशा रीतीनें प्रसंगविशेषीं उत्पन्न झालेल्या अल्पकालिक असमाधानाचा मनुष्याच्या प्रकृतीवर कोणताही स्थायिक परिणाम होत नसला, किंवा खऱ्या मत्सरामध्यें असमाधानानंतर जी द्रोहबुद्धि उत्पन्न होत असते, ती अशा वेळीं उत्पन्न होत नसली, तथापि अशा प्रकारें चित्तव्यग्रता होऊं देणे हेंसुद्धां चांगलें नाहीं. दुसऱ्यांना कांहीं बाबतींत आपणांपेक्षां अधिक चांगली सिद्धि मिळाली, म्हणून तेवढ्याचकरितां मनुष्याचें मन अस्वस्थ तरी कां व्हावें? वास्तविक विचार करितां, दुसऱ्यांची अधिक उन्नति झाली, तरी त्यामुळें मनुष्याची चित्तव्यग्रता होण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. साधारणतः ज्या गोष्टींवरून मनुष्याचे मनांत मत्सरभाव उत्पन्न होतो, किंवा चित्ताची व्यग्रता होते, त्या गोष्टींत वस्तुतः कांहींही अर्थ नसतो, असें थोड्या विचारांतीं प्रत्येकाला कळून येईल. पण तसें होण्यास अगोदर विचार झाला पाहिजे, व त्या विचारास योग्य दिशा मिळाली पाहिजे.

**त्रि. का. पित्रे.** नीतिमुक्ताहार.

---

## पाठ २२ वा.



## परदुःख शीतळ!

### भाग १ ला.

सुशिक्षित वर्गापासून सुधारणेच्या कामीं साह्य मिळेल काय? लिहिण्यास दुःख वाटतें—पण खरी गोष्ट सांगितली पाहिजे कीं,

त्यांचा नैतिक तंतु अद्याप पुष्कळ दृढ होणें आहे व त्यांची कार्यक्षमता तर अजून जागृतही झाली नाहीं. समाजांतील दोष दिसण्यापुरती त्यांच्या अंगीं बुद्धि नाहीं, असें नाहीं; परंतु रानटी चालींच्या जुलमाबद्दलचा त्यांचा सारा संताप तोंडाच्या वाफेंत खर्च होऊन जातो ! ज्या दुष्ट प्रघातांबद्दल ते खेद दाखवितात, ते प्रत्यक्ष त्यांच्या स्वतःच्या घरीं चालू आहेत. पण त्यांच्यानें त्यांजवर शस्त्र उचलवत नाहीं. अन्यायाबरोबर झुंजण्यास जी हिंमत, जो टणकपणा व जो मनाचा धडा लागतो, तो त्यांच्यांत नाही. हे सुशिक्षित लोक म्हटले म्हणजे केवळ पोकळ बडबड करणारे होत. राजकीय दृष्टया देशाचें किती अहित होत आहे व लोकांच्या हक्कांची कशी पायमल्ली होत आहे, याबद्दल व्यासपीठावरून शब्दपांडित्य करण्यांत ते वाटेल तितकी धिटाई दाखवितील; पण कृतीचें जरा कोठें नांव काढा, स्वतः थोडीशी झीज सोसण्याचा प्रसंग येऊं द्या, कीं आलीच प्रत्येकाची कांहीं तरी सबब पुढे व काढलाच त्यानें आपला पाय मागें, असा प्रकार आहे. विद्यावृद्धीबरोबर राजकीय देशाभिमान्यांचें पीक खूप वाढलें आहे, पण सामाजिक सुधारकांची वाढ होत नाहीं. कांहीं सामाजिक सुधारक उत्पन्न झाले आहेत हें खरें; पण त्यांची संख्या फारच नियमित आहे. 'घरीं गुलामगिरी आणि बाहेर स्वातंत्र्य' हें आमच्या राज्यकारस्थानी सुशिक्षितांच्या वागणुकीचें तत्त्व ! विद्येनें पुष्कळ फायदा झाला आहे व आणखीही होईल. खरी विद्या म्हणजे राष्ट्राचा दुर्भेद्य तट होय. परंतु सामाजिक सुधारणेच्या कामीं केवळ

सुशिक्षितांवर विसंबून राहणें व्यर्थ आहे. राजकीय बाबतींत पुढें पाऊल टाकण्यास जशी मनापासून हौस असावी लागते, जसा देशाभिमान लागतो, जसा निर्भीडपणा पाहिजे व जसें मानसिक धैर्य पाहिजे, तसेंच सामाजिक सुधारणेंतही पाहिजे. इतकेंच नाहीं तर सामाजिक सुधारणेंत हे गुण उपयोगांत आणणें हें राजकीय उन्नतीबद्दल आपली पात्रता स्थापित करण्यास फार अवश्य आहे.

या इलाख्यांतील गुजराथी व ब्राह्मण जातीमध्यें पुनर्विवाह झाले आहेत हें खरें; पण या कामीं सुशिक्षितांकडून आरंभ झालेला नाहीं. अशिक्षित वर्गामधूनच पुनर्विवाह करण्यास लोक पुढें सरसावले आहेत. या सुशिक्षित लोकांच्या तरुण कन्यांपैकीं किंवा भगिनींपैकीं कांहीं वैधव्यदशा भोगीत आहेत, पण त्यांची दुःखस्थिति नाहींशी करण्यास जो छल सोसणें जरूर आहे, त्याच्या विचारापुढे भीतीनें हे अगदी गांगरून जातात. हे लोक विलायतेस जातात, परंतु परत आल्यावर जातीनें दिलेली मूर्खपणाची शिक्षा निमूटपणें सोसतात! अशा रडतराउतांपासून सुधारणेस काय मदत मिळणार? यांच्याभोंवतीं पसरलेल्या निबिड, निर्भेद्य अंधकारांत सुधारणादीप प्रज्वलित करण्याचें काम यांच्या हातून काय होणार? हे वाटेल तितका तोंडशूरपणा करतील, पण यांच्या हातून कृति म्हणून घडावयाची नाही!

तथापि हेंही विसरतां कामा नये कीं, सुधारणामार्गांत असलेले खांचखळगे सामान्य नाहींत. जे अनिष्ट प्रघात आज पिढ्यानपिढ्या चालू आहेत, कालबाहुल्यानें ज्यांस एक प्रकारची पवित्रता

आली आहे, ज्यांस धर्माचा पाठिंबा आहे, व जे हिंदूंच्या नैसर्गिक स्वभावाचा एक भागच होऊन बसले आहेत, त्यांचें निर्मूलन करणें म्हणजे सोपें काम नाहीं. बहिष्कारापासून सोसावा लागणारा त्रास केवळ शुष्क आहे, असे म्हणतां येत नाहीं. धर्मभोळ्या लोकांच्या प्ररूढ चालीविरुद्ध जाणाऱ्यांचा समाजाकडून जो अन्य प्रकारें छल होतो, त्यांतही इतकी निर्दयता व इतकी दुष्टबुद्धि दाखविली जाते कीं, त्यांच्यापुढें मोठ्या धीराचा मनुष्यही कचरून जाणें साहजिक आहे. तेव्हां या गोष्टीत साराच दोष सुशिक्षितांकडे नाहीं. सर्वच धैर्याचे पुतळे असावे अशी इच्छा करणे, व ते तसे नसल्याबद्दल त्यांची निर्भर्त्सना करणे, हें असमंजसपणाचे दर्शक होय. परंतु या सुशिक्षितवर्गांत पुष्कळ लोक अगदींच भेकड असतात हें कांहीं खोटें नाहीं !

---

## पाठ २३ वा.



## परदुःख शीतळ !

### भाग दुसरा.

सुशिक्षित लोकांपेक्षां निरनिराळ्या ज्ञातींतील प्रमुख लोकांनीं मनांत आणल्यास सुधारणेस पुष्कळ साहाय्य होण्यासारखें आहे. जातींतील लोकांवर त्यांचें जें वजन असतें, त्याचा हल्लीं ते जितका दुरुपयोग करतात, तितकाच त्यांस सदुपयोगही करतां येईल.

बहुत करून हे ज्ञातीचे पुढारी लोक अशिक्षित असतात व यामुळें त्यांस असें वाटत असतें कीं, लोकांवरील आपलें वजन कायम रहाण्यास त्यांस अज्ञानदशेंत ठेवणें हेंच अवश्य आहे. सत्याचा प्रकाश एकदां ह्यांचे अंतःकरणांत उदित झाला, म्हणजे मग आपलें वर्चस्व लयास गेल्यावांचून राहणार नाहीं. ते स्वतः अज्ञानांधकारांत असल्यामुळें ज्ञातीनेंही तसेंच चांचपडत रहावें, अशी त्यांची इच्छा असते; कारण तेणेंकरून अज्ञानांधकाराचें साम्राज्य अबाधित चालतें. हे स्वतः आंधळे असून दुसऱ्या आंधळ्यांचे वाटाड्ये बनतात. यांचें धुरीणत्व म्हणजे कांहीं एखाद्या विशेष सद्गुणामुळें, शहाणपणामुळें किंवा तरवारबहादुरीमुळें प्राप्त झालेले नसते, तर तें केवळ श्रीमंतीमुळें त्यांच्याकडे आलेलें असतें.

जात म्हटली म्हणजे आंधळी; पुढारी नेतील तिकडे बिनतक्रार जावयाचें हा तिचा परंपरागत क्रम. पुढारी सुशिक्षित असून त्यांस सुधारणेची खरी इच्छा असेल, तर त्यांस आपल्या वजनाचा अमूल्य उपयोग करतां येणार आहे. पण हे पुढारी दिसतात तसे मुळींच नसतात. त्यांचे दाखवायचे दांत एक व खायचे एक. ते स्वतःच सुधारणेचे कट्टे शत्रु आहेत. त्यांचे विचार फारच संकुचित असल्यामुळे ते पक्के दुराग्रही बनले आहेत. पण सरकारी अधिकारी, इतर युरोपियन, पारशी, वगैरे लोकांपुढें ते आपणांस सुधारणेची फार कळकळ आहे असें दाखवितात. परंतु आपल्या मूर्ख, अडाणी, दुराग्रही जातभाईपुढें आपली अक्कल अगदीं चालत नाहीं, असा ते बहाणा करितात. कोणीं एखाद्यानें या मूर्ख,

अविचारी चालीविरुद्ध वर्तन केलें, तर जातीस चिथविणारे हेच; परंतु ही गोष्ट लपवून ठेवण्याविषयीं ते फार दक्ष असतात. एखाद्या धर्मकृत्याकडे मोठीशी रक्कम आपण दिली कीं, सर्व वर्तमानपत्रकार आपल्या औदार्याबद्दल व मनाच्या सुसंस्कृतत्वाबद्दल आपली तारीफ करतील, हें ते जाणून असतात; व अशा रीतीनें ते लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकीत असतात. सरकारी अधिकाऱ्यांकडे पार्टीस जावयाचें असलें, तर त्यांपैकीं ज्यांस दोन बायका असतात, ते आपल्या धाकट्या अर्धांगीस बरोबर घेऊन जातात! आणखी एक अर्धांगी घरीं बसली आहे, हें या लोकांस काय माहीत! यांचा सर्व आयुष्यक्रम म्हणजे एक सोंगाची बतावणी होय. त्यांचें अंतरंग व बाह्य स्वरूप यांत विलक्षण अंतर असतें.

तेव्हां अशा रीतीनें एका पक्षाचें शोचनीय दौर्बल्य व दुसऱ्या पक्षाकडून होणारा प्रत्यक्ष अडथळा, हीं दोन्ही स्पष्ट दिसत असून अगदीं स्वस्थ बसणें योग्य होईल काय? एकंदर लोकसमुदायास सुधारणेची किंमत कळूं लागण्यासारखा सुदिन कधीं येईल तो येवो! निदान आज तरी त्याचीं चिन्हें दिसत नाहींत. हा सुदिन येण्याची वाट पहात बसलें, तर अनेक पिढ्या, किंबहुना कित्येक शतकेंपर्यंतही कदाचित् वाट पहावी लागेल.

सामाजिक बाबतींत सरकारानें हात घालूं नये, म्हणून अनेक रीतीनें प्रतिपादिलें जातें. सुशिक्षित म्हणविणाऱ्यांमध्येंही असे कांहीं गृहस्थ आहेत कीं, ज्यांस विधवाविवाहप्रतिबंधांत अन्याय दिसत नाहीं. हा प्रतिबंध वरकरणी जरी दुःखोत्पादक दिसतो, तथापि

वास्तविक तो कल्याणकारक आहे, असें विधान करण्यास त्यांस संकोच वाटत नाहीं. ते म्हणतात कीं, या प्रतिबंधानें विधवेची आत्मोन्नति होते. ईश्वरी इच्छेनें तिचा नाथ गत झाला, म्हणजे ती अशाश्वत ऐहिक सुखाचा त्याग करिते; ती संसारपराङ्मुख होत्साती धर्माचरणांत व परोपकारांत आपल्या आयुष्याचा विनियोग करिते; घरांत किंवा बाहेर ती भूतदया व करुणा यांची सख्खी बहीणच भासते. ती रोगपीडितांच्या शुश्रूषेंत नेहमीं निमग्न असावयाची; कोणासही झालें तरी तिजपासून आशीर्वाद व सदुपदेशच मिळावयाचा; तिच्यापासून ईश्वरी तेजाचे किरण चोहोंकडे फांकावयाचे; तिच्या प्रकृतींतील अचेतन भागाचा लोप होऊन ती चैतन्यमय झालेली असते; तिच्या ठायीं ऐहिक वस्तूंविषयीं औदासीन्यवृत्ति उद्भूत होते; दुःखाचा अनुभव तिला होईनासा होतो; तिचें अंतःकरण स्वार्गिक सुखानें पर्याप्त होऊन जातें; व धार्मिकता, भक्ति व परोपकारपरायणता यांमध्यें घालविलेल्या आपल्या आयुष्याचा अंत होऊन आपल्या प्रियपतीच्या समागमसुखाचा आस्वाद घेण्यास ईश्वर आपणास केव्हां बोलावणें पाठवितो, म्हणून मोठ्या उत्कंठेनें ती वाट पहात असते.

विधवांच्या भेसुर स्थितीचें समर्थन करण्याकरितां व तिचें उत्तमत्व भासविण्याकरितां वरील मनोहर चित्राची उभारणी करण्यांत येते! मानवी बुद्धि व मानवी मनोविकार यांमुळें या चालीचें स्वरूप अनादरणीय व अशुद्ध असें भासतें, वस्तुतः तें उन्नत व शुद्ध असें आहे, हें दाखविण्याकरितां हें काल्पनिक पुढें केलें जातें खरें; पण

यांत व वस्तुस्थितींत काडीइतके तरी साम्य आहे, असें कोण म्हणूं शकेल? हे काल्पनिक पुढें करणें म्हणजे विधवांच्या खऱ्या स्थितीची निर्दयपणें थट्टा करण्यासारखे नाहीं काय? जिचा आयुष्यक्रम या काल्पनिकाशी सदृश आहे, अशी दहा हजारांत एखादी विधवा कदाचित् असेल; पण एकंदरींत बहुतेकांचा आयुष्यक्रम या तोडीचा होणें केवळ अशक्य आहे. विधवा झाल्या, तरी त्यांस मनुष्यधर्म हे आहेतच, हें मनांत आणून त्यांच्याविषयी विचार केला पाहिजे. त्यांचे मनोधर्म दाबून टाकण्याकरितां सृष्टीविरुद्ध किती जरी रानटी उपाय योजिले, तथापि त्यांस म्हणजे देवतात्व येते असे थोडेंच! त्यामुळें त्या उन्नत व सद्गुणी होण्याची तर आशा नाहींच; पण उलटया अवनत व दुर्गुणीमात्र होण्याचा संभव आहे. ज्यांचा आयुष्यक्रम केवळ कित्ता घेण्यासारखा आहे, अशा अनेक विधवा आहेत यांत संशय नाही, पण याचे कारण ही दुष्ट चाल नव्हे. ही चाल नसती, तरी तशाच त्या अनुकरणीय झाल्या असत्या. सर्वच तरुण विधवा विमार्गगामी असतात असें नाहीं; परंतु पुनर्विवाहाच्या प्रतिबंधामुळें त्या सन्मार्गी होण्यापेक्षां असन्मार्गी होण्याचीच अधिक भीति आहे, असें म्हणण्यास बिलकूल हरकत वाटत नाहीं.

आत्मोन्नति! जर पुनर्विवाहप्रतिबंधानें विधवांची आत्मोन्नति होते, तर मग त्याच न्यायाने विधुरांचीही कां होऊं नये? पण तसें नाहीं. त्यानें पाहिजे तर १० किंवा २० वेळाही पुनर्विवाह करावा! पहिली बायको जिवंत असतांही वाटेल तर त्यानें दुसरी करावी! त्याचें स्वतःचें वय ६० किंवा ७० वर्षांहूनही अधिक असावें, व

त्याच्या मुली व मुलगे ५० शीच्या जवळजवळही आले असावे; तथापि एखाद्या १० वर्षांच्या पोरीशीं लग्नविधीची थट्टा करून तिला आपली बायको म्हणावयास त्यास काडीचाही प्रतिबंध नाहीं. त्याची बुद्धि नाठी होवो, त्याचे सर्व दांत पडून जावोत, त्याच्या तोंडाचें बोळकें होऊन एक शब्दही स्पष्ट न उमटो, त्याच्या सर्वांगास कळा लागलेल्या असोत; तात्पर्य, या जगांत राहण्याची आपली मुदत संपली, म्हणून त्याच्या नानाविध व्याधींकडून त्यास स्पष्ट नोटीस मिळालेली असो. त्याच्याजवळ पैसा आला कीं झालें. त्यानें आपली चिमुकली प्रिया तिच्या आईबापांपासून विकत घेतलीच; तिच्याशीं सर्वसभारंभपूर्वक त्याचें लग्न झालेंच; व त्या अज्ञान वध्य पशूला घेऊन तो आपल्या ग्रहरूपी स्थंडिलाकडे तडक निघालाच. त्याच्या स्वतःच्या घरांत एकदोन तरुण गतभर्तृका असोत, त्यांत एखादी त्याची स्वतःची कन्या किंबहुना नातही असो, पण त्यांनीं आपलीं अपवित्र मुखें या पवित्र समारंभाचे वेळीं लपविलीं पाहिजेत! नाहीं तर त्यांची अमंगळ सावली या नूतन जोडप्यावर पडून त्यांचा आयुष्यक्रम कदाचित् खडतर व्हावयाचा! जसें कांहीं त्या गरीब बापड्या अर्भकापुढें दुःखाचें ताट वाढून ठेविलें आहे, याबद्दल संशयच असतो!

**गो. ग. आगरकर.** सुधारक.

# पाठ २४ वा.



## आळस.

आलस्य जें कार्यविघातकारी ।
असूं नये तो रिपु या शरीरीं ॥
उद्योग सद्बंधु तया न टाकां ।
त्या सेवितां पावसि सौख्य लोकां ॥

—वामनपंडित.

ईश्वरानें मनुष्यप्राण्यास जन्मास कां घालावें, व स्वतः कोणतीही खटपट केल्याशिवाय ऐहिक व पारमार्थिक सिद्धि त्याला सहजीं मिळावी, अशी त्याची स्थिति कां केली नाहीं, या प्रश्नांचा खरा निकाल लागणें फार कठिण आहे; किंबहुना अशक्य आहे. परंतु या दोन्ही प्रकारच्या सिद्धि उद्योगानें प्राप्त होतात कीं नाहींत, याचा निकाल बहुतेक झाल्यासारखाच आहे. जगाच्या इतक्या दिवसांच्या अनुभवावरून असें दिसून आलें आहे कीं, मनुष्याचीं इहपरलोकींचीं कर्तव्यकर्मे चांगल्या रीतीनें बजावलीं जाण्यास ईश्वरनिष्ठा, सद्गुण इत्यादि जीं साधनें आहेत, त्यांपैकींच उद्योग हें एक प्रमुख साधन होय. 'उद्योग्याचे घरीं ऋद्धिसिद्धि पाणी भरी,' अशी म्हण पुष्कळ लोकांचे तोंडून ऐकूं येते, ती ह्याच अनुभवाची साक्ष देत आहे. यावरून व एका प्रकारें आपल्या सभोंवतालच्या अफाट सृष्टीचे जे अनादि कालापासून

अव्याहत व्यापार चालले आहेत, व मनुष्याची निसर्गतःच जी कांहीं तरी क्रिया करण्याकडे प्रवृत्ति दिसून येते, त्यांचें विचारपूर्वक मनन केलें असतां, माणसानें आळस सोडून उद्योग करणे जरूर आहे, असेच अनुमान काढावे लागतें. एकाच वेळीं एकाचा अस्त तर दुसऱ्याचा उदय व एकाचा उदय तर दुसऱ्याचा अस्त अशी स्थिति दररोज अनुभवणारे जे चंद्र आणि सूर्य ते लोकांनीं विपत्कालीं किंवा संपत्कालीं विशेष शोक किंवा हर्ष यांच्या स्वाधीन होऊं नये, म्हणून बोध करीत करीत आपलीं कर्तव्यें एकसारखी बजावीत आहेत; मनुष्याच्या भाग्यसागराला कशी भरती व ओहटी येते, हे स्पष्टपणे दाखविण्याकरितां समुद्राला भरती व ओहटी या क्रमानें येतच आहेत; निरनिराळ्या वयोवस्थेमध्ये त्या त्या वेळेस अनुरूप अशी कर्तव्यकर्में चोख रीतीनें कशी उरकावीं याचा कित्ता घालून देण्याकरितांच कीं काय, षड्ऋतु आपलीं नेमलेली कामे बिनचूक उरकीत आहेत; पृथ्वीसह सर्व ग्रह, मध्यस्थित जो भगवान् सूर्यनारायण, त्याच्याभोवतीं आपल्या नियमानुसार प्रदक्षिणा करण्यांत व स्वतःभोवती दुसरे उपग्रह कसे फिरतात याचे कौतुक पाहण्यांत अविश्रांत गुंतले आहेत; पंचमहाभूते आपलीं ठरीव कामे सोडून इकडे तिकडे ढुंकूनही पहात नाहींत; वनस्पतिकोटींतील व खनिजकोटींतील व्यापार निरंतर चाललेच आहेत; व प्राणिवर्गांतील पशुपक्षी स्वतः-च्या अवश्य उद्योगांत सतत व्यापृत झाले आहेत; फार काय, अगदीं क्षुल्लक जीवजंतु ज्या किडी व मुंग्या, त्याही आपल्या

जीवितरक्षणार्थ त्यांना इष्ट वाटतील त्या क्रिया चालवीत आहेत. मग अशी एकंदर जगाची स्थिति असतां, व एखाद्या मोठ्या चालू असलेल्या गिरणींत तिचें स्वरूप पहावयास गेलेल्या माणसास तिचे सर्व अवयव काम करीत असल्यामुळें जणूं काय तेथें साक्षात् उद्योगच अवतरला आहे, असें ज्याप्रमाणें वाटतें, त्याप्रमाणेंच उद्योगाचें साक्षात् विराटस्वरूप असे भासणाऱ्या या विश्वरूपी अति प्रचंड व अद्भुत गिरणींतील सर्व अवयव कोणत्या ना कोणत्या तरी व्यापारांत गुंतले आहेत, व उद्योग करण्यास आपणांस सुचवीत आहेत, असें पाहणाऱ्या मनुष्यास आपण तेवढं स्वस्थ बसावें व कांहींही उद्योग करूं नये, असें कां बरें वाटावें? आळसांत काळ लोटला असतां, व इकडची काडी तिकडे न करितां, आपणास सुख होईल असें त्यास वाटलें, तर तें योग्य आहे काय? व तसें केल्यास त्याचा क्षणभर तरी टिकाव लागेल काय? नाहीं. जगदीशानें देहांत प्राण घालतां क्षणींच उद्योगाची आवश्यकता जर त्याचे पाठोपाठ लावून दिली आहे, तर तिला टाळून कसें होणार?

त्रि. का. पित्रे. नीतिमुक्ताहार.

---

## पाठ २५ वा.



## वैधव्य व अपशकुन.

पहिला मोठा अपशकुन विधवा स्त्रियांचा. या करुणास्पद विषयाविषयीं क्षणभरही विचार करतांना ज्याचे हृदय अत्यंत खेदानें व संतापानें व्याप्त होऊन जात नाहीं, त्यास केवळ पाषाण-हृदय व अधमाधम म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. स्त्रियांचें जिणें मुळींच पराधीन असल्यामुळें व संसारदुःखाचें मोठें ओझें त्यांच्यावरच नेहमी असल्यामुळें त्यांची स्थिति एकंदरीत कठिणच; पण त्यांतूनही वैधव्याच्या योगानें त्यांचा सगळाच आधार जेव्हां एकदम तुटतो, तेव्हां त्यांच्या विपत्तीची तर सीमाच होते! त्यांतही आमच्या देशांत जी त्यांची स्थिति दृष्टीस पडते, तीहून दुःखास्पद अशी स्थिति थोडीच! इतरांस दुःखाची स्थिति प्राप्त झाली असतां ते लागलेच सर्वांच्या दयेस व मैत्रीस पात्र होतात; पण तेच सगळें वरील अनाथ प्राण्यांच्या ठायीं विपरीत होतें! ज्या वैधव्यदुःखाची वेदना सहन न होऊन बिचाऱ्या स्त्रियांनीं सुष्टदुष्ट कसाही नवरा असला, तरी आपल्या पातिव्रत्यधर्मास जाणून अंगावर शहारा येणाऱ्या रीतीनें त्याच्या चितेवर आपल्या देहाची आहुति द्यावी, किंवा तसें न झालें तर आमरणान्त त्याच्याकरितां केवळ तपस्व्याच्या वृत्तीनें रहावें, त्याच महादुःखा-बद्दल त्यांचा कळवळा कोणास येत नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्यांच्याच प्रारब्धदशेचें तें फळ, असें म्हणून त्यांचा उलटा छळ

होण्यास आरंभ होतो. हा प्रकार आमच्या देशास अत्यंत लांछनरूप होय यांत संशय नाहीं. असो. यासंबंधें जितकें लिहावें तितकें थोडेंच. प्रस्तुत स्थलीं इतकेंच सांगतों कीं, ज्या अपशकुनाच्या प्रकारासंबंधानें सध्यां आम्ही लिहीत आहों, तो सर्वथा व्यर्थ आहे हें तर आहेच, पण शिवाय तो मानणें हें विपद्ग्रस्त मानवी प्राण्यांचा उपमर्द करणेंही होय. केवळ दैवयोगानें किंवा यदृच्छेनें प्राप्त होणाऱ्या स्थितिविशेषावरून मनुष्यास मंगळ किंवा अमंगळ मानावें हा केवढा अन्याय आहे ? स्त्रियांचें वैधव्य हें जर त्यांच्या अशुभत्वास कारण, तर बाप, भाऊ, बहीण वगैरे कोणी मेल्यानें त्यांच्या नातेवाईकांचें तरी कां तोंड बघावें ? पण मुळींच हा केवढा मूर्खत्वाचा प्रकार आहे ? जी अत्यंत सदाचरणानें आपलें आयुष्य क्रमून आपल्या कुलास तर काय, पण सगळ्या मनुष्यजातीस भूषण आणीत आहे—कारण मनुष्याचें अंतःकरण स्वभावतःच किती अस्थिर व दुष्ट असतें हें सर्वप्रसिद्धच आहे—त्याच साध्वीचें दर्शन, जो पुरते तेरा दिवसही जाऊं न देतां पुनः नवरा मुलगा होऊन उभाच, अशा निर्लज्ज पुरुषानें अशुभ मानावें हा केवढा उलटा न्याय ! ! आणि अशा निष्पाप स्त्रीचें दर्शन जर शुभ नव्हे, तर सगळ्या कपाळभर जिनें कुंकवाचा पट्टा ओढला आहे, अशा एखाद्या पापिणीचें अथवा उभय कुलांस आणि अवघ्या मनुष्यजातीस जिनें, स्त्रियांचें सहज भूषण जी लज्जा ती समूळ टाकून देऊन, काळोखी आणली, अशा वेश्येचें तिच्या केवळ बाह्य वेषावरून अत्यंत शुभ दर्शन झालें काय ?

असो. तर याप्रमाणें सुविचारानें दिसणारा मार्ग आणि जगाचा धोपट मार्ग या दोहोंत अनेक वेळा इतकें अंतर असतें. यासारखे दुसरेही वेडगळ अपशकुन पुष्कळच आहेत. कोणी दाराबाहेर पडतो आहे इतक्यांत पुढें जर बोडका ब्राह्मण आला, तर खुंटलेंच त्याचे जाणें! मग हा ब्राह्मण चांगला सत्पात्र, सुशील, सज्जन, कांहीं कां असेना! पण तोच जर एखादा महाशंख मोठी शाल-जोडी पांघरून व मोठ्या लफ्फ्याचा पदर लावून पुढें आला, कीं शकुन उत्तम! तसेंच कोणी क्लीबांचेंही दर्शन तसेंच अशुभावह मानतात. तें करणें म्हणजे जें मनुष्याच्या स्वाधीनचें नाहीं, त्या-बद्दल उगीच विनाकारण त्यास हिणावणें आहे.

वि. कृ. चिपळूणकर. निबंधमाला.

---

## पाठ २६ वा.



### प्रवास.

**कोऽतिभारः समर्थानां किं दूरं व्यवसायिनाम् ॥**
**को विदेशः सविद्यानां कः परः प्रियवादिनाम् ॥**

सांप्रत या पृथ्वीवर मानवजातीस जें एवढें वैभव प्राप्त झालें आहे, तें प्रवासाच्या योगानें झालें आहे, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. जर प्रत्येक राष्ट्र आपआपली सीमा न उल्लंघितां

आपल्याच ठायीं स्वस्थ बसते, व दुसऱ्यास आपल्या मुलखांत येऊं न देतें, तर जगाच्या आद्य स्थितींत आणि सांप्रतच्या स्थितींत फारसा भेद पडता ना. अर्वाचीन तत्त्वज्ञानी लोकांनीं असा सिद्धान्त केला आहे कीं, जगाच्या रहाटीचा एकंदर रोंख सुधारणुकीकडे आहे; त्या रोखाप्रमाणें इतके दिवसपर्यंत सर्व राष्ट्रांत जे जे कोणीं प्रतिबंध करून ठेविले, ते ते एकामागून एकेक सर्व मोडत जाऊन हल्लीं तर त्यांचा प्रायः लयच झाल्यासारखा आहे. असा त्या प्रतिबंधांचा लय होण्यास ज्या अनेक गोष्टी कारणीभूत होतात, त्यांतील मुख्य अशा पाहूं गेलें असतां जिज्ञासा व लोभ ह्या होत. सर्व लोक आपापल्या मुलखांत ज्या ज्या गोष्टी पहातात तेवढ्यांनीं त्यांची तृप्तता न होऊन, इतर राष्ट्रांत काय चाललें आहे, तेथील लोक कसे काय आहेत, वगैरे पाहण्याची साहजिक जिज्ञासा त्यांच्या मनांत उत्पन्न होते. मग ती जिज्ञासा तृप्त करण्याकरितां ते लोक परराष्ट्रांत जातात. हें एक झालें. दुसरें असे कीं, कोणी प्रतापशाली राजा आपल्या देशावर सार्वभौमत्व पावून इतर देशही आपल्या सत्तेखालीं आणावे, अशी महत्त्वाकांक्षा मनांत धरतो, व इतर राष्ट्रांशीं बळेंच वैर साधून त्यांजवर स्वाऱ्या करतो. या दोहों कारणांच्या—विशेषतः दुसऱ्या कारणाच्या—योगानें, जे देश एकमेकांपासून हजारो कोसांच्या अंतरावर असतात व ज्या देशांचें दळणवळण होण्याची कांहीं कालापूर्वीं कोणाच्या मनांत कल्पनाही आली नसेल, त्यांचा परस्पर निकट संबंध होऊन राहिला आहे.

प्रवासास अवश्य गोष्ट म्हटली म्हणजे धारिष्ट होय. ज्या लोकांस धारिष्ट नाहीं, ज्यांचे विचार आपलें कुटुंब व आपला देश यांहून पलीकडे कधीं धजावतच नाहींत, त्यांच्या मनांत इतर देशीं प्रवास करण्याची बुद्धि येईल कोठून? जगाच्या इतिहासांत पाहिले असतां असें आढळतें कीं, ज्या लोकांत धारिष्ट विशेष, तेच संपत्तिवान् व ज्ञानसंपन्न असे झाले. इसवी शकाच्या पूर्वीं सुमारें हजार वर्षांमागें एशियामैनर देशांत फिनिशियन म्हणून मोठे धारिष्टवान् लोक होते. त्या लोकांनीं, त्या वेळेस जेवढा जगाचा भाग माहीत होता तेवढ्याशीं व्यापार ठेविला होता. त्या वेळेस नाविक्कला फार अपूर्ण दशेंत असतांही, ते लोक सर्व भूमध्यसमुद्र धुंडाळून, ज्या अट्लांटिक महासागरास त्या वेळेस लोक पृथ्वीची सीमा समजून त्यांत फार लांबपर्यंत जाण्यास भीत असत, त्या महासागरांतदेखील संचार करूं लागले. त्यांनीं ब्रिटिश बेटें—जीं त्या वेळच्या लोकांस फारशीं टाऊकदेखील नव्हतीं व आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरचीं बेटें, यांशीं बराच व्यापार चालविला होता. सारांश, ते लोक धारिष्टवान् असल्यामुळें त्या वेळीं धनाढ्य व विद्यासंपन्न म्हणून गाजत होते. त्यांनींच कार्थेज, टायर इत्यादि नामांकित शहरें वसविलीं. त्यांच्यामागें कार्थेजच्या लोकांनींही त्यांच्या धारिष्टाचा कित्ता बराच उचलला होता. पण पुढें ते लोक राज्याचे चुरशीस लागल्यामुळें त्यांचें पहिलें तेज कमी होऊन शेवटीं त्यांचा अगदीं मोड झाला. त्याहीपुढें जीं ग्रीसचीं अनेक संस्थानें एकामागून एक अशीं वैभवास चढलीं, व पुढें रोमन

लोकांचें सर्व जगावर जें स्वामित्व झालें, त्या सर्वांचें तरी बीज धारिष्ट होय. साहस, उद्योग वगैरे गुणांचा जसजसा लोकांत ऱ्हास होऊं लागतो, तसतशी त्या लोकांची बुडती कळा आलीसें समजावें. असो. हल्लींही इंग्रज लोकांच्या उत्कर्षास हेंच साहस मुख्य कारण झालें आहे. सन १४९२ या वर्षी कोलंबसानें मोठया अडचणी सोसून अमेरिका खंडाचा शोध लाविला, तेव्हां-पासून युरोपामध्यें साहसाचा आवेश सर्व लोकांचे मनांत भरला. पुढें लौकरच पोर्टुगीज लोकांनीं हिंदुस्थानाशीं व्यापार करण्यास व तेथील मुलूख काबीज करण्यास आरंभ केला. त्यांच्या मागो-मागच डच, इंग्रज, फ्रेंच वगैरेही लोक आले. पुढें दैववशात् इंग्रज लोकांसच फार आयास न पडतां येथे सार्वभौमत्व प्राप्त झालें. याप्रमाणें युरोपांतील लोकांचा उत्कर्ष, त्यांचे प्रवास कर-ण्याचें जें साहज, त्यामुळें झाला; व अजूनही किती होईल हें सांगवत नाहीं. कां कीं, त्यांचे नवे नवे शोध प्रतिवर्षीं चाललेच आहेत. या वर्षीं कोणीं जहाजें घेऊन आर्टिक महासागरांत ध्रुवा-जवळचे प्रदेश पहावयास गेला; पुढल्या वर्षीं कोणी मंगोपा-र्कासारखा धैर्यवान् पुरुष निर्जन व भयाण अशा आफ्रिकेच्या मध्य-भागाच्या प्रदेशांत गेला; कोणी नवीं बेटें शोधून काढण्याकरितां अफाट अशा पासिफिक महासागरांत गेला; अशा गोष्टी दर वर्षास प्रत्यक्ष होत आहेत. तेव्हां अशा साहसी पुरुषांचें ठिकाण जें युरोपखंड तें हल्लीं संपत्तीचें व विद्येचें भांडार झालें आहे, यांत नवल काय?

वरील गोष्टी, मोठमोठ्या राष्ट्रांची स्थिति एकंदरींत पाहतां झाल्या. पण नुसत्या मनुष्याविषयीं पाहिले, तरी प्रवासापासून केवढे नफे होतात! सर्वांस अनुभवावरून तर हें ठाऊकच आहे की, पुष्कळ फिरलेला मनुष्य प्रवासामुळें मोठा हुषार होतो. त्यानें अनेक प्रकारचे प्रसंग काढलेले असतात, हजारों गोष्टी स्वतः पाहिलेल्या असतात, व तशाच पुष्कळ ऐकलेल्याही असतात. यामुळें तो मनुष्य हरएक कामांत वाकबगार होतो. हे तर केवळ व्यावहारिक नफे झाले. पण जो तत्त्ववेत्ता आहे, किंवा तशा प्रकारची केवळ स्फूर्ति म्हणून ज्याला आहे, असा सहृदय कवि—की, ज्यास सर्व सृष्टि चमत्कारमय व आनंदमय भासते,—त्यास तर देशाटनापासून मोठे अमूल्य लाभ आहेत. प्राचीन ग्रीक लोकांतील पुष्कळ मोठमोठे विद्वान् पुष्कळ देश हिंडले होते. त्यांचा पहिला जो इतिहासकार हिराडोटस तो एशियामैनर, मिसर वगैरे मोठमोठे देश हिंडला होता; व त्यायोगानें त्यानें जें ज्ञान संपादिलें, त्याच्यामुळें तो एवढा विख्यात ग्रंथकार झाला. त्याप्रमाणेंच सोलन व लैकर्गस म्हणून जे राज्यव्यवस्थापक झाले, त्यांनींदेखील आपले ज्ञानाचे कोठार प्रवासांतच सांठविलें. लैकर्गस तर हिंदुस्थानापर्यंतदेखील आला होता, असें कित्येक इतिहासकार म्हणतात. त्याप्रमाणेंच आमच्या हिंदुस्थानांत जे मोठमोठे विद्वान् होऊन गेले, तेही फार प्रवास केलेले असावेत यांत संशय नाहीं. सर्व कवींचा मुकुटमणि जो कालिदास तोही मोठा प्रवासी होता असें म्हणतात; व या गोष्टीस हें एक मोठें प्रमाण

आहे कीं, ज्या वेळीं आतांप्रमाणें नकाशे वगैरे साधनें नव्हतीं, त्या वेळेस त्यानें आपल्या मेघदूत नामक अतिसुंदर काव्यांत मेघास जो मार्ग रामगिरीपासून तों थेट अलकापुरी म्हणजे हिमालय पर्वताचें कैलासशिखर तेथपर्यंत सांगितला आहे, तो अगदीं बेचूक आहे. शिवाय ह्या काव्यांत पर्वतांचें, नद्यांचे वगैरे जें सर्व वर्णन दिलें आहे, तें तरी तीं स्थळें कवीनें स्वतः पाहिल्यावांचून इतके उत्कृष्ट लिहिले असेल, हें म्हणणे नीट दिसत नाही. अर्वाचीन कालांत जर्मनी देशांत एक हंबोल्ट म्हणून महापंडित होऊन गेला. हा तर पृथ्वींतील चारी खंडें हिंडला, व ज्या हिमालय पर्वताच्या शिखरांची आम्हांस येथल्या येथेंदेखील पुरती माहिती नाहीं, त्यांवर स्वतः जाऊन त्यानें तेथील सृष्टिचमत्कार आपल्या "कॉस्मस" नांवाच्या प्रख्यात ग्रथांत लिहून ठेविले आहेत. यावरून या पंडिताची जिज्ञासा व प्रवासाविषयींचें साहस हीं स्पष्ट दिसून येतात.

हे गुण प्राचीन हिंदु लोकांत मुळींच नव्हते, असें जरी म्हणतां येत नाहीं, तरी कालान्तरीं त्यांचा लोप झाला, हे स्पष्ट आहे. भर्तृहरीनें आपल्या एका शतकांत म्हटलें आहे कीं, "किं सुखमप्रवासगमनम्" सुख काय?—तर प्रवासास न जाणे. आणि हाच अर्वाचीन हिंदु लोकांच्या एकंदर मनाचा रोंख दिसतो. यापासून देशाचे किती अहित झालें आहे, हें सर्वांस माहीतच आहे. त्यावर विस्तार करावा असें नाहीं. हल्लीं तर प्रवासाचे श्रम म्हटले म्हणजे नाहींतसेच झाल्यासारखे झाले आहेत; तरी प्रवासा-

पासून मनावर होणारे जे सद्विकार ते तरी निदान होण्यास कांहीं प्रतिबंध नाहीं. सध्यां हिंदुस्थानभर व सर्व पृथ्वीवर हवें तिकडे जाण्यास लोखंडी सडका व आगगाड्या झाल्या आहेत; तर अशी प्रवास करण्याची अयुत्कृष्ट संधि तरी न गमवतां जे आमचे लोक यापासून आपला नफा करून घेऊं पाहतील, त्यांस तो पुष्कळ होण्यासारखा आहे.

**वि. कृ. चिपळूणकर.** किरकोळ लेखांचा संग्रह.

---

## पाठ २७ वा.



## चैनीचा परिणाम.

कोणतीही सुधारणा घेतली, तरी ती बहुतांशीं शारीरिक सुखाचा सतत शोध व तीं सुखें अधिकाधिक मिश्र व नाजूक करण्याचा प्रयत्न यांमुळें झालेली आहे. पण हा जो शारीरिक सुखाचा शोध सुधारणा करीत आहे, तोच तिचा नाशही करीत आहे. ज्याच्यायोगानें तिचें लालन होत आहे, त्याच्याच योगानें तिचा उच्छेदही होत आहे. कारण, या शारीरिक सुखाच्या शोधानें चैन व विलास अपरंपार वाढत जातात व मनुष्य शरीराचा गुलाम बनून जाऊन त्याच्या अधीन होऊन राहतो; मग आपल्या धन्याच्या—शरीराच्या—संतोषाकरितां नव्या चैनी, नवे भोग, नवे विलास व नवे आनंद शोधून काढण्यासाठीं रात्रंदिवस

मरत असतो. गरजा भागल्या म्हणजे आनंद होतो हें ह्यास माहीत असतें, म्हणून हा नव्या नव्या गरजा उत्पन्न करून त्या भागविण्यांतच गुंग होऊन जातो. इतक्या स्थितीस सुधारणा येऊन पोंचली म्हणजे तिचा ऱ्हास होऊं लागतो. ज्या साध्या पदार्थांनीं पूर्वीं हुशारी वाटत असे व प्राप्त होत असे, त्यांपासून अतिपरिचयामुळें पुढें सुख वाटत नाहींसें होतें. मग त्यांत नवे नवे प्रकार उत्पन्न करून सुख घ्यावेंसें वाटतें. त्यामुळें उपभोगाचा अतिरेक होऊन शरीराची खराबी होते. नैसर्गिक, साध्या व सत्त्वशील अन्नानें शरीरास पुष्टि व तुष्टि मिळते, पण कृत्रिम रीतीनें त्यांतच मालमसाले, लोणचीं, भाज्या, आमट्या, ह्यांच्या नव्या नव्या परी उत्पन्न होऊं लागल्या, म्हणजे शरीराचा नाश होऊं लागतो. ह्या शारीरिक सुखाच्या मार्गानें जात असतां आपणांस हा चमत्कारिक अनुभव येतो. कृत्रिम सुखानें प्रथमतः थोडासा आनंद, पुढें तृप्ति, मग वीट, नंतर रोग व शेवटीं नाश होतो. प्रथमतः जेवणाचे वेळीं किंचित् चटणीचें तिखट तोंडीं लाविलें, तर त्यापासून रुचि वाटून आनंद वाटतो, म्हणून दुसरे वेळेस मनुष्य तसेंच करितो; असें दोन चार वेळा त्यानें केलें म्हणजे त्याला त्याची संवय लागते, व तिखटाशिवाय अडूं लागतें. असें रोज तिखट खात गेला म्हणजे त्याला नेहमींच्या साध्या तिखटानें मुळींच आनंद होत नाहीं. मग तीक्ष्णतर तिखटाची जरूर लागते व मग एक, दोन, तीन ह्याप्रमाणें मिरच्याच खाण्याचा सपाटा तो सुरू करितो. अर्थात् ह्याचा परिणाम

शरीरावर होऊन कावीळ, मूळव्याध वगैरे रोग त्याच्यामागें लागतात व शेवटीं शरीराचा नाश करितात. अनेक वेळा उपभोग घेऊन किंवा अति तृप्तीनें चैनीची व विलासाची इच्छा थंड पडली, म्हणजे मनुष्याचे डोळे उघडतात. मग त्याला अतितृप्तीनें वीट आला आहे व शरीरांत रोगांनीं आपलीं ठाणीं बसविलीं आहेत, असें आढळून येतें. ज्या शरीराकरितां अनेक प्रयत्न करून परीपरीचीं अन्नें त्याला मनमुराद चारिलीं, ज्याला सुख व्हावें म्हणून उत्तम उत्तम दुर्मिळ चिजाही मिळवून दिल्या, त्या शरीरानें शेवटीं विश्वासघात करून आपणास दगा दिला व शेवटीं सुखाऐवजीं दुःखमात्र भोगण्यास लाविलें, असें मनुष्याच्या मनांत येऊन पश्चात्ताप होतो. कारण शारीरिक सुखाचा अतिरेक व अतितृप्ति झाली कीं, रोग हा ठेवलेलाच. मद्यपी व अधाशी ह्यांचीं शरीरें तर लवकरच थकून क्षीण होतात व नाश पावतात. असो. इतक्या थरास गोष्टी येऊन पोंचल्या म्हणजे मनुष्य शुद्धीवर येतो. शरीरसुख पुष्कळ भोगलें तर तें नाशासच कारण होतें, आत्मसंयमन व इंद्रियनिग्रह ह्यांतच खरें सौख्य आहे, चैनींत नाहीं, अशी त्याची खात्री पटते. हा त्याचा अनुभव सर्वांनीं व विशेषतः तरुणांनीं लक्षांत ठेविण्यासारखा आहे. शरीराची गोष्ट राष्ट्रासही लागू आहे. जे राष्ट्र नसत्या गरजा नव्या नव्या उत्पन्न करून चैनबाजी वाढवितें, व ती चैन नेहमीं सारखी चालू रहावी म्हणून आपली सर्व शक्ति खर्चीत असतें, त्याचा (राष्ट्राचा) ऱ्हास होऊं लागला असें समजावें.

त्याच्या घरांत मोडाचार शिरला, त्याला अवकळा लागली, ही खूण-गांठ बांधून ठेवावी, व आपण सावध असावें. राष्ट्राच्या चालत्या काळांत त्याला जो अनुभव मिळत नाहीं, तो विपत्काळीं मिळतो. आधुनिक कालीं प्रत्येक मनुष्य ऐहिक सुखाची हांव धरून त्याच्याच पाठीस लागला आहे. पण त्यानें, थोडा वेळ दम खाऊन खरें सुख चैनबाजी व इंद्रियोपभोग ह्यांत नसून ज्ञानांतच आहे, ह्याचा विचार करावा. अज्ञानी श्रीमंतापेक्षां ज्ञानी गरीब अधिक सुखी असतो हें ध्यानांत धरावें. प्रत्येक मनुष्यानें—मग तो हिंदु असो. मुसलमान असो, ख्रिस्ती असो किंवा इतर कोणत्याही धर्माचा असो— आधुनिक चैनी व विलास ह्यांच्या खाईंत बेधडक उडी टाकण्याच्या अगोदर वेळींच शुद्धीवर यावें, आणि आपण नव्या नव्या गरजा विनाकारण उत्पन्न करून ऐहिक सुखें वाढविलीं व तीं प्राप्त करून घेण्याकरितां पाश्चात्य चैनीकडे धांव ठोकली, तर आपला नाश होईल, हें ध्यानांत ठेवावें. आपल्या हातानें आपल्या पायांवर धोंडा पाडून घेऊं नये. ऐहिक सुखें हीं स्वतः नाशवत व दुसऱ्याचा नाश करणारीं आहेत. आधिभौतिक वस्तु उपयोगानें नाश पावतात. एखाद्या वस्तूचा आपण उपयोग केला म्हणजे ती संपली. ती पुनः आपोआप खटपटीशिवाय उत्पन्न होत नाहीं. म्हणूनच चैनीच्या पदार्थांचा पुरवठा नेहमी करावा लागतो. ह्या चैनबाजीमुळेंच संपत्ति व दारिद्र्य ह्यांचें तुंबळ युद्ध चाललें आहे व समाजांत तंटे व द्वेष वाढत आहेत. कित्येक कुबेराप्रमाणें संपत्तिमान् होत आहेत व कित्येक आपल्या दारिद्र्यानें सुदामदेवास

मागें टाकीत आहेत. कित्येक गर्भश्रीमंत, विलास व मौजा ह्यांतच गुरफटून जाऊन आतां आणखी कोणत्या प्रकारच्या चैनींत पैसा उडवावा ह्याचा विचार करीत आहेत, व कित्येक शतदरिद्री अन्नास मोताद होऊन भुकेनें प्राण कासावीस झाल्यामुळें तळमळत आहेत. जर एखादें राष्ट्र जीवितास अगत्य लागणारे पदार्थ उत्पन्न करण्याचें सोडून देऊन चैनीचेच पदार्थ उत्पन्न करूं लागेल, तर त्या राष्ट्राचा अपकर्ष होऊं लागला असें समजावें. कारण सर्वांस कांहीं एकदम चैन मारतां यावयाची नाहीं. आणि श्रीमंताची चैन म्हणजे गरिबाची उपासमार. हिंदुस्थानदेश हल्लींपेक्षां पूर्वी संपन्न होता याचीं जीं अनेक कारणें आहेत, त्यांतच एक असें आहे कीं, पूर्वींची संपत्ति चैनबाजींत उडविली जात नसे. प्राचीनकाळचे उपभोगाचे व विलासाचे पदार्थ रामायण व महाभारत ह्या ग्रंथांतून वर्णिले आहेत; त्यांवरून ते पदार्थ—भव्य व मजबूत वाडे, सोनें, रत्नें व पिढ्यानपिढ्या टिकणारीं वस्त्रें वगैरे—बरेच दीर्घकाळ टिकणारे असत. तेंच हल्लींच्या पदार्थांकडे पहा. कपडा महिना दोन महिने वापरला कीं, फेंकून द्यावा लागतो. ह्या असल्या गोष्टींनीं राष्ट्राचा उत्कर्ष होत नाहीं; ऱ्हास होत जातो. इतर राष्ट्रांपेक्षां ते लोक खालींखालीं जात असतात. चार दिवसांत त्यांची भरभराट झाली असें दिसेल, दोन दिवस त्यांचें वैभव वाढेल, पण तें फार दिवस टिकावयाचें नाहीं. तो तेरड्याचा रंग तीन दिवसच असावयाचा. कदाचित् लोकांस हा फेरफार बरा वाटेल, पण तो कायम टिकणारा नव्हे. हिंदुस्थानांतील पूर्वींच्या कला धुळीस मिळत

आहेत व नव्या नव्या फेशनांचें—नखऱ्यांचें—साम्राज्य होत आहे. पूर्वीच्या जुन्या कलांच्या योगानें सर्व समाजास सुखासमाधानांत राहतां येत असे. अवर्षणे पडून दुष्काळ पडला, तर लोकांची इतकी दुर्दशा होत नसे. दुष्काळाशीं झगडण्याचें लोकांत त्राण असे, व दुष्काळ गेला कीं, पुढील वर्षीं सुबत्ता होतांच जिकडे तिकडे आबादीआबाद होत असे, संपत्तीची समृद्धि होत असे. पण हल्लींच्या ह्या काळांत तिचा नाश होत आहे.

**श्रीसरस्वतीमंदिर.**

---

## पाठ २८ वा.



## परोपदेशे पांडित्यम्.

घरांत बायका वागाव्या तशा वागत नाहींत, किंवा नसावे ते दोष त्यांच्या भाषणांत किंवा वागण्यांत आढळतात. तेथें रागावून काम होत नसतें. थंडपणानें आणि विस्तारपूर्वक त्यांच्या दोषांची चर्चा करून त्यावर त्यांचे काय म्हणणें आहे, हे ऐकून घेतलें, व त्यांचे दोष त्यांना मोकळ्या मनानें दाखविले, तर त्यांची समजूत चांगली पटते, असा माझा अनुभव आहे. तिरतिरपणानें रागें जावें आणि मग त्या रागाच्या भरांत वांकडेतिकडें बोलून गेल्यानें ज्यास्त गैरसमज वाढतो, व परस्परांच्या सलोख्यांत विरजण पडल्याशिवाय राहत नाहीं. गैरसमज होण्याला वाव सांपडूं

द्यावयाचा नाहीं, आणि आपल्याला काय वाटतें व वाटलें, आणि लोकांस काय दिसेल, इत्यादिकांची चांगली फोड करून सांगितली, म्हणजे मग बायकांत दोष राहत नाहींत. रागाव-ण्यापेक्षां समजावून सांगण्याची पद्धत प्रपंचांत ज्यास्त उपयोगी पडते, आणि सुखाला तेंच साधन आहे. माझी बायको तणतणत रानानें निघून गेली, म्हणून मी रागावलो असतों, म्हणजे तिची झालेली गैरसमज दूर होती ना. माझ्या रागावण्यानें तिला त्रास झाला असता, आणि मलाही होणारच. इतकें करून उभयतां खिन्न व त्रस्त. याचें मूळ कारण नाहींसें झालें नसल्यानें त्याच त्या कारणाची पुनरावृत्ति होत गैरसमज झाला. त्याला ज्यास्त ज्यास्त उचल मिळून प्रेम आणि आनंद, संतोष व समाधान, यांच्या जागीं तिटकारा आणि त्रास, कंटाळा व धडपड, हीं येऊन सुखाला पदच्युत करायची आणि दुःखाचें साम्राज्य कुटुंबांत व्हावयाचें. गोडशा भाषेनें नीट समजूत घातली, तर उभयतांसही सुखाची जोड होते. माझा स्वभाव हा असा, मला अमुक आवडतें आणि तमुक नको, या गोष्टी पुरुषानें एकदां बायकोस सांगितल्या, व त्या तिला कळल्या, आणि आपल्याला नवऱ्याच्या पसंतीनुसार व त्याला आवडतें त्याप्रमाणें वागायाचेंच हें बायकांनीं ध्यानांत ठेविलें, व पुरुषांनी स्त्रीस्वभावाला अनुरूप अशा कांहीं क्षुल्लक साहजिक गोष्टींकडे नजर दिली नाहीं, म्हणजे प्रपंच सुखावह झाल्याशिवाय रहावयाचा नाहीं. गैरसमजून, मनोगत न बोलतां झांकून ठेवणें, व परस्परांच्या हक्कांविषयीं अज्ञान, या त्रिदोषानें पुष्कळांच्या प्रपं-

चांतील सुख आणि समाधान ठार झालेलें आहे. आपल्या समजुती, आपल्या इच्छा, आपल्या आवडी असतील त्या मुक्या ठेवण्याच्याऐवजीं त्यांना वाचा फुटूं देणे प्रपंचांत आवश्यक आहे. धोरणाच्या योगानें व सहवासानें त्या कळाव्या ही समजूत खरी, पण तशा रीतीनें कळण्याच्यापूर्वी काय थोडे थोडके अनर्थ होतात? बुडत्याचा पाय खोलांत, त्याप्रमाणे गैरसमजुतीची मजल वैराकडे धांवते, हा अनुभव ध्यानांत ठेवावयास हवा. सारांश, उपदेशाच्या पोटीं व मोठ्या शांतवृत्तीनें मीं बायकोला तिचे दोष दाखविले, आणि त्याचा परिणामही चांगला झाला. सुखाच्या पहिल्या फवाऱ्यामुळें बेहोष झालेली तिची मनोवृत्ति ताळ्यावर आली. आपण एकदम श्रीमंतीच्या पायरीवर चढलले आणि वाघ्याचे पागे झालेले नाहीं, असें आपल्या कृतीवरून जगास वाटूं देणें किती व कसें अवश्य आहे, आपली मूळची गरिबी व तींतली राहणी कायम राहिली तरच ती कशी शोभते, ईश्वरानें आपले पांग फेडले, हे सोन्याचे दिवस त्या जगदीशाच्या कृपेनें दिसले, म्हणून त्याचे उपकार मानण्यांत आपण कसूर कां करूं नये, इत्यादि गोष्टी मीं तिला नीट समजून सांगितल्या, त्याचा उपयोग बराच झाला. काळ चंचल आहे, सुखाची सावली मध्यान्हकाळची, तिचा भरंवसा धरतां कामा नये, सुख आणि दुःख यांची सदा सारखी मिसळ करून तीं मनुष्याला द्यावयाची हा विधात्याचा नियम व असा सृष्टिक्रम असतो, इत्यादि सिद्धान्त, उदाहरणे देऊन तिला मीं चांगले समजून सांगितले. त्याचा परिणाम ' उपड्या घागरीवर

पाणी ' अशापैकीं झाला नाहीं. परोपदेश करण्यांत पांडित्य पुष्कळ लढवितां येतें, पण तेंच स्वतःवर येऊन बेततांच उपयोगीं पडत नाहीं, असाही विचार माझ्या मनांत आला. मीं तिला उपदेश केला तोच मलाही पाहिजे होता.

**धनुर्धारी.** वाईकर भटजी.

---

## पाठ २९ वा.



### संतांच्या लोकप्रियतेचें बीज.

अवतारी पुरुषांनीं देवसेवेच्या द्वारा केलेल्या देशसेवेचें योग्य अनुमान करणें कठिण आहे. त्यांनीं आपल्या कृतींनींच आपलीं अभेद्य स्मारकें करून ठेविलीं आहेत; कारण थोर पुरुष आपलें स्मारक आपणच करून ठेवितात. त्याकरितां दुसऱ्यांच्या खटपटीची अपेक्षा नसते. यावच्चंद्रदिवाकरौ फडकत राहील असा आपल्या कीर्तीचा विमलध्वज त्यांनीं उभारून ठेविला आहे. आणि त्यांचा यशोदुंदुभि सतत दुमदुमत राहणारा आहे. धन्य ते पुरुष व त्यांनीं मंडित केलेला देश ! तुकारामबोवा म्हणतातः—

**पवित्र तें कुळ पावन तो देश ।**
**जेथें हरिचे दास जन्म घेती ॥**

त्यांनीं केलेल्या उपकारांची फेड करणें आपणांस दुरापास्त आहे. तुकाराममहाराजांनीं संतमंडळीच्यासंबंधानें जे उद्गार

काढिले आहेत, ते जसेच्या तसेच त्यांस लावितां येतील. त्यांत अतिशयोक्ति म्हणून बिलकूल नाहीं. तो अभंग असा:--

**काय सांगों आतां संतांचे उपकार ॥**
**मज निरंतर जागवीती ॥ १ ॥**
**काय द्यावें त्यांशीं व्हावें उतराई ।**
**ठेवितों हा पायीं जीव थोडा ॥ २ ॥**
**सहज बोलणें हित उपदेश ।**
**करुनी सायास शिकवीती ॥ ३ ॥**
**तुका म्हणे वत्स धेनुवेच्या चित्तीं ।**
**तैसे मज येती सांभाळीत ॥ ४ ॥**

तुकारामादिकांच्या चरित्रांवरून खऱ्या लोकप्रीतीचें बीज कशांत आहे, व आज जीं हजारों माणसें शेंकडों वर्षे त्यांच्या नांवांचा घोष करीत आहेत, त्याचें सामर्थ्य कशांत आहे, हें समजून घेणें आज आपणांस विशेष हिताचें आहे. नुसत्या संपत्तीस कोणी पुसत नाहीं; किंवा कोरड्या विद्वत्तेस फारसा कोणी मान देत नाहीं. लोकांचीं अंतःकरणें आकर्षण करण्याचें सामर्थ्य एका साधुत्वामध्यें आहे. हें साधुत्व सर्वात्मत्वाची ओळख पटल्याशिवाय अंगीं बाणत नाहीं; व हें अंगीं आल्याशिवाय स्वार्थत्याग होणार नाहीं. ज्याच्या ठिकाणीं हा स्वार्थत्याग अधिक असतो, त्यावर लोकांचें प्रेम जडतें. माझ्यावर प्रेम करा, असें नुसतें म्हटल्यानें कोणी कोणावर प्रेम करीत नाहीं, किंवा तसें करणें

शक्य नाहीं. एका तत्त्वज्ञानें म्हटल्याप्रमाणें स्वार्थत्याग हेंच साधुत्वाचें लक्षण आहे; व हेंच लोकप्रियतेचें किंवा लोकश्रद्धेचें बीज आहे. ज्याला म्हणून ती मिळवावयाची असेल, त्यानें आमचे लोक मठ्ठच आहेत, त्यांना विचारशक्तिच नाहीं, ते अंधपरंपरेनें जातात, अशी शुष्क ओरड न करितां व त्यांनीं केलेल्या निंदेचा किंवा दिलेल्या त्रासाचा तिरस्कार करण्याच्या भरीस न पडतां केवळ निरपेक्ष बुद्धीनें व स्वार्थत्यागानें लोकसेवा करावी. संतमंडळीच्या अंगची खरी योग्यता व त्यांचें साधुत्व हीं त्यांच्या झालेल्या छळानें फार चांगलीं कळून आलीं, हें विसरतां कामा नये. तो होणें सर्वांच्याच नशिबीं नसतें. चंदनाचा परिमल खोड उगाळल्यानें जितका कळतो तितका मुग्ध स्थितींत कळत नाहीं.

लोकांत कर्तृत्व आणण्याकरितां आमच्यांतील समाजनायक जर त्यांच्यामध्यें मोठ्या प्रेमानें मिसळतील, त्यांच्याकरितां शक्य तेवढा स्वार्थत्याग करितील, तर आजच्या स्थितींतहीं समाज त्यांस वंद्य मानून, आनंदानें शिरीं घेऊन नाचण्यास कमी करणार नाही. लोकांच्या अंतःकरणांत प्रेमाचा पाझर फुटला पाहिजे व तसें करण्यास अंगीं स्वार्थत्याग मोठा पाहिजे.

**गो. कृ. देवधर.** देहूची यात्रा.

---

# पाठ ३० वा.



## आत्मोन्नति.

प्रत्येक वस्तूचा चांगल्या आणि वाईट अशा दोन्ही तऱ्हांनीं उपयोग करून घेतां येतो. ज्या पाषाणाची आपल्या पूज्य व आनंददायी अशा आराध्य देवतेची मूर्ति होते, तोच ( पाषाण ) प्रसंगविशेषीं एखाद्या गरिबाच्या नाशास कारण होतो. स्वसंरक्षणाच्या उपयोगीं पडणारीं तरवार, बंदूक वगैरे हत्यारें एखादे वेळीं स्वतःच्या मृत्यूसच कारण होतात. जो अग्नि आपलें अन्न शिजवितो, ज्याच्या साहाय्यानें आगगाड्या, आगबोटी भरधांव पळत असतात, आणि ज्याच्यायोगानें खंदक भरून राजे लोक स्वसैन्याचें संरक्षण करितात, तोच उपयोगी अग्नि निरपराध मनुष्याला उभा जाळतो; घरेंच्या घरें, गांवेंच्या गांवें बेचिराख करून सोडतो. आपले हात, पाय, डोळे इत्यादिकांचेंही असेंच आहे. ज्या हातांनीं प्रामाणिकपणानें उद्योग करावयाचा, आईबापांची सेवा करावयाची, गरिबांना दानधर्म द्यावयाचा, परमेश्वराच्या श्यामसुंदर मूर्तीची पूजा करावयाची, तेच हात दुसऱ्यांस त्रास देण्यांत, खून पाडण्यांत, डोकें फोडण्यांत, देवालयांचा विध्वंस करण्यांत आणि अनाथ अबलांना छळण्यांत उपयोगीं पडतात. वेळेलाही हा न्याय लागू पडतो. म्हणजे तिचा व्यय दोन प्रकारें होतो, एक सद्व्यय

आणि दुसरा दुर्व्यय किंवा अपव्यय. सद्व्यय करणें म्हणजे आपला वेळ सत्कर्मे करण्यांत, आणि अपव्यय करणें म्हणजे दुष्कर्मे करण्यांत घालविणें किंवा कांहीं न करितां स्वस्थ बसणें.

" सत्कर्मयोगे वय घाल-" विल्यानें त्याचा व्यय केलासें होतें. सत्कर्मांचे अनेक पोटभेद आहेत. दीनदुबळ्यांचा परामर्ष घेणे, आजाऱ्यांची शुश्रूषा करणें, स्वतः नीतीनें वागून दुसऱ्यांस तसे वागण्यास शिकविणें, सज्जनांच्या संरक्षणाकरितां खलांस शासन करणें, मातापितरांची सेवा करणें, सदोदित उद्यमरत असणें, नानाविध शास्त्रांचा, कलांचा अभ्यास करणें, नवीन नवीन उपयुक्त शोध लावणें, कृष्णदयार्णवाप्रमाणे स्वतः कष्ट सोसून आपल्या बांधवांच्या हितास्तव मोठमोठे सद्ग्रंथ रचणें, निराकार, निर्गुण सच्चिदानंदास भक्तीच्या जोरावर आपलासा करणें, थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे श्रीसमर्थांप्रमाणें स्वतःची उन्नति साधून समाजोन्नति आणि राष्ट्रोन्नति करण्यांत आपलें सर्वस्व खर्चणे, हेंच सर्व सत्कर्मांचें सार होय; आणि यांतच आपल्या वेळेचा व्यय करणे याच्यापरता तिचा सद्व्यय करण्यास दुसरा श्रेष्ठ मार्ग तो कोणता? परंतु साधारण मनुष्यास समर्थांची योग्यता येत नाहीं. त्यांनीं आत्मोन्नति, समाजोन्नति आणि राष्ट्रोन्नति या तिन्ही गोष्टी केल्या. साधारण मनुष्यास तिहींपैकीं एकच साधण्याची मारामार, मग तिहींची गोष्ट लांब राहिली. ह्या त्रयींत आपणांस अवश्य कोणती पाहिजे, आधीं कोणती करावयाची, याविषयीं आपण आतां विचार करूं. हा विचार न झाला तर 'एक ना धड भाराभर

चिंध्या ' अशापैकीं स्थिति होऊन तिहींपैकीं एकही न साधतां आपलें आयुष्यमात्र फुकट जाईल.

आत्मोन्नति, समाजोन्नति आणि राष्ट्रोन्नति या तिहींत पहिली फारच जरुरीची आहे. तिकडे आपण प्रथम लक्ष दिलें पाहिजे. समाज आणि राष्ट्र हीं व्यक्तींवर अवलंबून असतात; अनेक व्यक्तींचा समाज बनतो आणि अनेक समाजांचें राष्ट्र होतें. उन्नत दशेस प्राप्त झालेल्या व्यक्ति समाजांत जितक्या ज्यास्त, तितकी समाजोन्नति अधिक सुकर. असे अनेक समाज उन्नतीप्रत पावले म्हणजे राष्ट्रोन्नति होण्यास कांहींच वेळ लागत नाहीं. ज्या मनुष्याची आत्मिक उन्नति झाली नाहीं, तो, समाज आणि राष्ट्र यांची सुधारणा करण्यास पुढें सरसावला, तर ती होणार तरी कशी ? एखादा प्रसिद्ध अट्टल भामट्या जर, ' दुसऱ्याची वस्तु चोरूं नये, सदोदित खरें बोलत असावें, ' असा उपदेश करूं लागला, तर त्याच्या उपदेशाचा कांहीं तरी परिणाम होईल काय ? किंवा ज्यांस कवित्व आणि रसिकता म्हणजे काय हें ठाऊक नाहीं, असे एखादे ' ज्ञानलवदुर्विदग्ध ' राजश्री ' कालिदासाचें कवित्व ' किंवा ' तुकाराम आणि मोरोपंत यांची तुलना ' यांसारख्या विषयांवर व्याख्यानें देण्यास उभे राहिले, तर तें कितपत योग्य होईल बरें ? किंवा चोर धरण्याकरितां बायकोच्या हातीं कांकडा देऊन तिला पुढे करणारे झुंझारराव शिलेदार, जर तालिकोटचा, पानिपतचा किंवा रूसोजपानी युद्धांतला मुकडेनचा घनघोर रणसंग्राम यांवर वक्तृत्व गाजवूं लागले, तर तें किती उपहासास्पद होईल बरें

तितकीच किंबहुना त्याहूनही ज्यास्त लज्जास्पद स्थिति स्वतः नीच असून जो ‘ परोपदेशे पांडित्य ’ करितो त्याची आहे. असा मनुष्य आपलें स्वतःचें वय फुकट घालवून, अंधपरंपरेनें जे त्याचे अनुयायी झालेले असतात त्यांसही खाड्यांत पाडतो. त्याच्या उलट स्थितींत असलेल्या मनुष्याकडे पहा. तो आत्महित साधण्यांत अगदीं गुंग होऊन गेलेला असतो. कोणी बरेंवाईट म्हणेल याची त्यास चाड नसते; तरी पण कांहीं नीच मनोवृत्तींच्या माणसांखेरीज बहुतेक सर्व लोक. तो त्यांस धुडकावून लावीत असला तरी त्याकडे जातात, आणि त्याच्या उपदेशाप्रमाणें वागून आपली उन्नति करून घेतात. याकरितां राष्ट्रोन्नति आणि समाजोन्नति यांची केवळ आईच अशी जी आत्मोन्नति ती साधणे हेच आपलें आद्यकर्तव्य आहे, आणि यांतच आपल्या आयुष्याचा व्यय झाला पाहिजे.

आत्मोन्नति इतकी महत्त्वाची असतां बहुतेक लोकांचें तिकडे फारसें लक्ष जात नाहीं. जो उठतो तो दुसऱ्याच्या डोळ्यांतील कुसळ काढावयास धांवतो; स्वतांच्या डोळ्यांतील मुसळ कोणासच दिसत नाहीं. संपत्ति, मानसन्मान, कीर्ति इकडेच सर्वांचा ओढा असतो. ज्याला त्याला वाटतें कीं “ मी काय तो शहाणा, मी विद्वान्, मी सांगेन तसें सर्वांनीं वागावें, लोकांनीं मला आपला पुढारी करावें.” परंतु अंगीं योग्यता नसतां कोरड्या मनोराज्यानें ही इच्छा फलद्रूप व्हावी कशी? हे गृहस्थ ‘ मद्यपान कोणीं करूं नये ’ असें लोकांस व्याख्यान देतांना सांगतात

आणि मद्यपानाचा पूर्ण निषेध करितात. परंतु त्यांना स्वतःमात्र घरीं गेल्याबरोबर तोंडास बाटली लाविल्याशिवाय चैन पडावयाचें नाहीं. दारू पिऊन रंगभूमीवर तुकारामाची भूमिका करणाऱ्या नटांप्रमाणे यांची स्थिति असते. कित्येक जण " सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते ' या सैतानी तत्त्वाला बळी पडतात. कांहीं लोकांना वाटत असतें कीं, आपण पुष्कळ पुस्तकें वाचलीं, अनेकशास्त्रपारंगत झालों, म्हणजे आपली आत्मोन्नति होते. परंतु ही चूक आहे. पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा जनक जो लॉर्ड बेकन त्याचे ग्रंथ पाहिले असतां असें वाटतें कीं, त्याच्यासारखा ज्ञाता पुरुष कोणी झाला नसेल. परंतु त्याचे वर्तन किती गर्ह्य होतें हे सर्व इतिहासज्ञांस माहीत आहेच. तेव्हां नुसत्या संपत्तीनें किंवा पुस्तकी विद्वत्तेनें आत्मोन्नति होत नसते. ती होण्यास मिल्टननें म्हटल्याप्रमाणें मनाचें आणि तज्जन्य विकारांचें आकलन करून स्वतः सद्‌गुणी बनलें पाहिजे.

सत्कर्म करण्यांत वेळ घालविल्यानें तिचा सद्व्यय होतो. सर्व सत्कर्मांत आत्मोन्नति मुख्य आहे, आणि आत्मोन्नति साधण्यास आपल्या आंगीं सद्‌गुण पाहिजेत, व आपलें आचरण पवित्र पाहिजे. याकरितां ज्यांस स्वतःचें किंवा इतर लोकांचें हित साधण्यांत कालक्षेप करणें असेल, त्यांनीं आपले वाईट मनोविकार नाहींतसे करून स्वतः सद्‌गुणी, सद्वर्तनी आणि उद्योगशील बनण्याचा प्रयत्न करावा.

**द. मो. लोहकरे.** वेळेचें महत्त्व आणि व्यय.

---

## पाठ ३१ वा.



## राक्षसभुवनची लढाई.

[ ही लढाई थोरले माधवराव पेशवे यांचे कारकीर्दींत निजाम व पेशवे यांचेमध्यें झाली. माधवराव मनाचे फार थोर. भांडण होऊं नये ही त्यांची फार इच्छा. या त्यांच्या चांगुलपणामुळेंच रघुनाथरावदादांचें फावलें. त्यांनीं आपल्या पुतण्यास ( माधवरावांस ) जवळ जवळ नजरकैदेंत ठेविलें. ह्या लढाईत आपण निजामास आपल्या तरवारीचें पाणी दाखवावें, अशी रावसाहेबांची फार इच्छा होती; परंतु दादांनीं त्यांचें म्हणणें नाकारलें. व त्यांना छावणीतच मागें रहावें लागलें. अखेर काकांचा पराभव होऊन पुतण्यानेंच त्यांचा सुटका केली, हा भाग पुढील उताऱ्यांत आहे. ]

एक प्रहरपर्यंत लढाई सारखी झपाट्याची चालली होती. नबाबाच्या सैन्याकडून, विठ्ठल सुंदर, भवानराव मिरजकर, हे दादासाहेबांबरोबर निकरानें झुंजत होते, व जसजशी निकराची लढाई होऊं लागली, तसतसें पेशव्यांचें सैन्य कच खाऊं लागलें. इतक्यांत नबाबानें आपल्या पठाणांच्या फळीस पेशव्यांवर तुटून पडण्यास इशारत केली. तो पठाणांचा मारा पेशव्यांच्या सैन्यास सहन होईनासा झाला व त्यांचा धीर सुटला. इतक्यांत विठ्ठल सुंदरानें आपला हत्ती दादासाहेबांच्या हत्तीपाशीं आणला. आपले लोक माघार घेत आहेत, हें पाहून दादासाहेबांना त्वेष चढला, पण उपयोग काय? विठ्ठल सुंदराच्या लोकांनीं चढ करून त्यांचा हत्ती वेढला. इतक्यांत दादासाहेबांच्या हत्तीच्या महातानें हत्ती वळविला. परंतु विठ्ठल सुंदराच्या हत्तीवरचा महात फारच

गुणी. हत्ती त्याच्या कह्यांत होता. त्यानें आपल्या हत्तीकडून दादासाहेबांच्या हत्तीचें शेंपूट धरविलें व दादासाहेबांचा हत्ती उभा करविला. ज्या शूर पठ्ठयानें गिलच्यांच्या तोंडचें पाणी पळविलें होतें, त्या दादासाहेबाला आपले लोक उधळले असें पाहून विठ्ठल सुंदराच्या हातीं पडावें लागलें !

लढाईच्या जागेपासून दोन कोस मागें, पंधराशें स्वारांनिशीं माधवरावसाहेब होते. त्यांना सैन्यांतील कांहीं लोकांनीं येऊन वरील हकीकत सांगितली. दादासाहेबांना विठ्ठल सुंदर नेत आहे, हें ऐकतांच तो बालवीर आपल्या स्वारांस म्हणाला, " यार हो, पहातां काय? आपण जिवंत असतां दादासाहेब शत्रूच्या हातीं पडावे, हें आपल्याला सर्वस्वीं लांच्छन आहे ! आपण सर्व मेलों व मग दादासाहेबांना शत्रूंनीं नेलें तर हरकत नाहीं. चला, आतां ही स्वस्थ बसण्याची वेळ नव्हे." इतकें बोलल्यावर रावसाहेब लागलेच आपल्या घोड्यावर स्वार झाले व त्यांनीं आपल्या घोड्याला टांच दिली ! आपला धनी निघाला असे पाहिल्यावर तळहाताच्या फोडाप्रमाणें त्याच्या जिवाचें रक्षण करणारे ते पंधराशें स्वार मागें राहतील काय? वाचकहो, काय सांगावें? ती पंधराशें घोडेस्वारांची मांड दादासाहेबांना आतां सोडवून आणूं, अशा ईर्षेनें लागलीच आपल्या धन्याबरोबर निघाली. माधवरावसाहेब आपल्या बरोबरच्या पंधराशें स्वारांनिशीं जरा पुढें जाताहेत, तों मल्हारराव होळकर, अथवा ज्यांना सुभेदार म्हणतात, ते आडवे आले. त्यांना पाहतांच माधवरावसाहेबांनीं आपला घोडा

उभा केला. तेव्हां सुभेदार म्हणाले, " बाळा, आजच्या लढाईत आपल्याकडील लोकांनीं कसूर केली, नाहीं तर काय बिशाद होती दादासाहेब विठ्ठल सुंदरच्या हातीं पडते ! " हें सुभेदारांचे बोलणें ऐकून रावसाहेब म्हणाले, " काका, कोणीं फितुरांनीं कसूर केली असली म्हणून काय झालें? आपण शाबूद आहोंत ना ? चला. आपण जिवंत असतांना दादासाहेबांना नबाबाच्या लोकांनीं धरून न्यावें म्हणजे काय! आपण हातांत कांहीं बांगड्या नाहींत भरल्या ! " हें रावसाहेबांचें शूरत्वाचें बोलणें ऐकून सुभेदार मनांत थोडे लाजले, परंतु हें त्यांनीं बाहेरमात्र दिसूं दिलें नाहीं. मग ते म्हणाले. " बाळा, तूं काय वेडा आहेस? अरे, कांटा निघाला आहे, तोच चल पुण्यास जाऊन आपण पुण्याचें राज्य करूं." हीं सुभेदारांच्या तोंडचीं अक्षरे ऐकतांच रावसाहेबांना इतका संताप आला कीं, हीं अक्षरे जर दुसऱ्या कोणत्या बत्तिशींतून निघालीं असतीं, तर त्यांनी खचितच ती बत्तिशी कायम ठेविली नसती. परंतु सुभेदार वडिलांप्रमाणें मानलेले, यामुळें रावसाहेबांनी आपला शिवशिवत असलेला हात आंखडला. तरी त्यांच्यानें, " काका, पानिपतच्या वेळीं तुम्हीं असेच केलें म्हणून ऐकतों, " असें म्हटल्यावांचून राहवलें नाहीं. ते रावसाहेबांच्या तोंडचें मर्मभेदक वाक्य ऐकून सुभेदार खजिल झाले. सुभेदार कांहीं बोलत नाहीत, असे पाहून रावसाहेब म्हणाले, " काका, माझ्या बोलण्याचा तुम्हांला राग आला असेल. परंतु विचार करा, दादा आपले आहेत, ते व आपण आपसांत भांडूं; परंतु दुसऱ्यानें जर आपल्यादेखत त्यांचा

पाडाव केला, तर मग काय राहिली आपली शोभा? चित्ररथ गंधर्व दुर्योधनाला नेत असतां पांडवांनी काय केले, हें तुम्हांला माहीत नाहीं काय?" हें रावसाहेबांचे भाषण ऐकून सुभेदारांचे डोळे प्रेमाश्रूंनी भरून येऊन, कंठ दाटला असतां तशा अवस्थेत ते म्हणाले, "शाबास बाळा. थोर मनाचा आहेस तू. चल, पहा आतां या म्हाताऱ्याची तरवार कशी आहे ती." अशा तऱ्हेची उभयतांची भाषणे झाल्यावर एक वृद्ध व एक अगदी तरुण असे ते दोघे वीर आपल्या लोकांनिशी विजेप्रमाणे निजामाच्या सैन्यावर जाऊन पडले. त्या वेळची त्या उभयतांची वीरश्री काय पुसावी! त्यांनीं निजामाच्या सैन्याची थोड्याच वेळांत दाणादाण करून टाकली, आणि दादासाहेबांबरोबर विजयश्रीही हिसकावून आणली.

**धुं. स. जोशी.** व्ही. एस. चे मार्मिक लेख; प्रथम गुच्छ.

---

## पाठ ३२ वा.



## विचाराकर्षण.

तुमचे हित किंवा अहित, हे तुमचे प्रत्येक विचारावर सर्वथैव अवलंबून आहे. तुमची शारीरिक व मानसिक शक्ति किंवा दौर्बल्य, तुमचे धंद्यांतील यश किंवा अपयश, आणि तुमचे सहवासानें दुसऱ्यांस होणारा आनंद किंवा त्रास, हीं सर्व तुमचे विचार जसे असतील, त्यांप्रमाणे घडून येतील. तुम्ही तमच्या मनाची जशी प्रवृत्ति

ठेवाल तत्सदृश बाह्य स्थिति तुमचेकडे आकर्षिली जाईल. ताम्रद्रवांतील अदृश्य ताम्रकण, त्या द्रवांत टाकलेल्या तांब्याच्या तुकड्यास भराभर चिकटून दृश्यरूप धारण करितात, हा जो रसायनशास्त्राचा नियम, तोच मानसशास्त्रासही पूर्णपणे लागू पडतो. शिवाय रसायनशास्त्र व दुसरीं सर्व शास्त्रे, जशीं दृश्य विश्वास लागू आहेत, तशींच अदृश्य विश्वासही लागू आहेत.

"तुम्हांस कोणीं विनाकारण इजा केली असली, मनस्वी दुःख दिलें असलें, तरीही त्याचा सूड घेण्याचा विचार तुमचे मनास शिवूंदेखील देऊं नका. उलट त्या अपकार करणाऱ्यावर जेवढा मोठा व जितका उपकार करितां येईल, तितका करण्याचे उद्योगास ताबडतोब लागा." असें जे साधु पुरुष सांगतात, ते केवळ परमार्थाकरितांच नव्हे, तर त्यांत खरा स्वार्थच विशेष साधत असतो. दुसऱ्यांवर उपकार करण्याचा संकल्प केल्यानें, दुनियेंतील जोराचा सच्छक्तींचा ओघ आपण आपलेकडे वळवून घेतों. तोच आपण दुसऱ्यांना अपकार करण्याचा संकल्प केला कीं, यऱ्याचे विरुद्ध परिणाम होतो; म्हणजे दुनियेंतील घातक व विध्वंसक शक्तींचा ओघ आम्ही आपलेकडे वळवितों. म्हणून जर आपली अक्कल अगदीं गुग होऊन आपण पूर्ण विचारशून्य बनलों नसलों, तर आपल्या स्वतःच्या कल्याणाकरितां तरी इतरांस अपकार करणें, त्यांचा सूड घेणें, वगैरेंसारख्या दुष्ट विचारांचा आपले मनांत शिरकाव होऊं देतां कामा नये.

" अंगीं विशेष वसतो गुण तोचि बाधे."

या कव्युक्तीप्रमाणे, पाणबुड्याचा धंदा करणाऱ्याचें मरण जसें पाण्यांत, पलटणींत नोकरी पतकरून तलवारीच्या जोरावर आपला योगक्षेम चालविणाऱ्या शिपायाचें मरण जसें त्याच्या त्या अन्न देणाऱ्या तलवारींत, त्याचप्रमाणें दुष्ट विचारवाल्याचे मरण त्याच्या त्या दुष्ट विचारांत, हे पक्के समजावें.

दुसरा एक सत्पुरुष म्हणतो—" आकर्षणाचा नियम सार्वत्रिक आहे. म्हणून जशा आमच्या इच्छा व आशा असतील, तदनुरूप आमची आकर्षणशक्ति असते. " शिवाजीस स्वराज्य स्थापण्याची इच्छा होती; परंतु, " मुसलमानांचे शरीरसामर्थ्य, त्यांचें धर्मवेड, त्यांची जूट, त्यांची संपत्ति व त्यांची प्रचंड राज्यसत्ता ही कोणीकडे, आणि मी व माझे हे जगली, भिकारी, मूठभर मावळे कोणीकडे ? तेव्हां माझ्या इच्छेप्रमाणें घडेल अशी मला आशा नाहीं. उलट ते मला पकडून, बंडखोर म्हणून तोफेच्या तोंडीं देतील किंवा हत्तीच्या पायांखालीं तुडवून मारून टाकितील," वगैरे वगैरे नैराश्याचे दुष्ट विचारांचा रिघाव जर शिवाजीचे मनांत झाला असता, तर त्या दुष्ट विचारांनीं त्याच्या त्या स्वराज्य स्थापण्याविषयीच्या सदिच्छेचा समूळ विध्वंस करून टाकिला असता. इतकेंच नव्हे, तर खुद्द शिवाजीचा अंतही हत्तीचे पायांखालीं किंवा तोफेच्या गोळ्यानेंच त्या विचारांनीं घडवून आणिला असता. आपली इच्छा आहे त्याप्रमाणें अवश्य घडलेंच पाहिजे, अशी बळकट आशा शिवाजीचे अंतःकरणांत

निरंतर व अचल वसत असे; व म्हणूनच आपले इच्छेची सिद्धि करणारा बाह्य विश्वांतील महच्छक्तींचा ओघ, तो आपलेकडे एक-सारखा आकर्षीत असे; व त्यामुळें त्याच्या इच्छेची सिद्धि होत असे. तुम्ही कोठेंही असा, कांहींही करीत असा, जो विचार प्राधान्ये-करून तुम्ही आपले मनांत वागवाल, तत्सदृश बाह्य विचार, तुमचें तिकडे लक्ष असो वा नसो, तुम्ही एकसारखे आकर्षींत असाल. आम्हांस पाहिजेत तसलेच विचार आमचे मनांत उद्भवतील व तस-लेच विचार बाहेरून आकर्षिले जातील, असा आमचा भरंवसा असून, त्यांप्रमाणे आम्ही अभ्यास ठेविला, कीं आमचे विचार पूर्ण-पणें आमचे कह्यांत येतात, व त्यांवर आमची पूर्ण सत्ता चालते.

मनाच्या आकर्षणाविषयी वर लिहिलेच आहे. " भावबळे फळ इच्छेचें तें. " असे महात्मा तुकाराम म्हणतो. हा भाव म्हणजे काय ? तर अगदी मनापासूनचा व खरा असा इच्छारूपी विचार व ती इच्छा सफल झालीच पाहिजे असा दृढ भरंवसा. अशा खऱ्या, मनापासूनच्या इच्छेला अशा दृढ भरंवशाची जितकी जितकी पुष्टि मिळेल, त्याप्रमाणेंच तिची आकर्षणशक्ति बळावेल, व दृश्य आणि अदृश्य विश्वांतील जबरदस्त महच्छक्ति तिजकडे आकर्षिल्या जाऊन इच्छेची सिद्धि होईल. म्हणजे ज्या गोष्टी-करितां तो इच्छारूपी विचार प्रथम उद्भवला, ती गोष्ट मूर्त व दृश्य रूपानें प्रकट होऊन आम्हांस मिळेल.

तात्पर्य काय कीं, दृढ भाव ही एक प्रचंड शक्ति आहे. पण रज कां या भावांत संशय शिरला, कीं सर्व आटोपलेंच. मग

सिद्धीची गोष्टच बोलावयास नको. बरें, तुमचे भावांत संशयाचा लेशही नसेल, तो जराही डळमळत नसेल, तर त्याची शक्ति म्हणजे इंद्राच्या वज्रासारखीच अकुंठ, अमोघ, सर्वतोगामी आणि सर्वसाधक अशी असते; व म्हणून तसल्या दृढ भावाची सिद्धि ही अगदी आपली ठेविलेलीच.

" भावेन देवः । " ' भाव ' हा एक परीस आहे. तो एक कल्पतरु आहे, ती एक कामधेनु आहे. आमच्या प्रत्येक इच्छेचें फळ आम्हांस भावबळाने प्राप्त करून घेतां येते. फार तर काय सर्वश्रेष्ठ असा जो ईश्वर तोही आपणांस भावाने प्राप्त करून घेतां येतो. अशी जी भावाची महती अनेक महात्म्यांनीं गाइली आहे, ती पोकळ कल्पना नसून, या विश्वांतील अचल, सर्व नियामक व सार्वत्रिक असे जे नियम आहेत, त्या नियमांचे आधारें ती अगदीं सशास्त्र, सोपपत्तिक व खरी आहे, हें पूर्णपणें सिद्ध करून देतां येण्यासारखें आहे.

**न. वा. जोशी.** अनंताशी साधर्म्य-ग्रंथमाला.

---

## पाठ ३३ वा.



## प्रत्यक्षज्ञान पाहिजे!

इतिहास हा एक मोठा बोधप्रद विषय आहे. याचें महत्त्व थोडक्यांत सांगणें झालें, तर तो अनुभवाचा सांठा आहे, किंवा सतत वाहणारा ज्ञानाचा एक जिवंत झरा आहे, असें म्हटलें तरी

चालेल. अथवा, पुढील पिढ्यांनीं आपण केलेले प्रमाद करून अज्ञानानें आपल्या नाशास आपणच कारणीभूत होऊं नये, म्हणून मागील पिढ्यांनीं सतत पाजळत ठेवलेला हा एक ज्ञानदीपच होय. तो जितका बोधप्रद आहे, तितकाच व्यापकही आहे. जितक्या भिन्न भिन्न चळवळी, तितके त्याचे प्रकार.

कोणत्याही विषयाचें यथार्थ ज्ञान होण्यास पुस्तकी विद्येचें साहाय्य पुरे होत नाहीं. त्याचें आल्हादजनक असे पूर्ण ज्ञान मिळविण्यास तत्संबंधीं औपपात्तिक तसेंच प्रयोगात्मक पद्धतींचे अवलंबन केलें पाहिजे. या दोहोंचा परस्पर निकट संबंध असून एकाची दुसऱ्याशिवाय पूर्तता नाहीं, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. यथार्थ ज्ञानाचें पर्यवसान आल्हाद. त्याचें प्रमाण या दोहोंच्या मिलाफावर अवलंबून राहणार. इतर विषयांच्या ज्ञानास लागू पडणारा वरील नियम इतिहासाच्या ज्ञानासही पूर्णपणे लागू आहे; व इतिहासाच्यासंबंधी प्रत्यक्ष ज्ञान किंवा प्रयोगात्मक ज्ञान म्हटलें म्हणजे देशपर्यटन, लोकव्यवहारनिरीक्षण व मुख्य मुख्य स्थलांचें दर्शन हे होय.

कोणत्याही देशाचा किंवा धर्माचा इतिहास घ्या, त्याचें यथातथ्य ज्ञान होण्यास केवळ पुस्तकांचें अध्ययन करून जुळावयाचें नाहीं; तर आपण ज्या देशाचा इतिहास वाचतों, त्यांतील लोकांच्या चालीरीती, धर्मव्यवस्था, उद्योगधंदे, व्यापार, शिक्षण वगैरे गोष्टींचें त्यांच्यामध्यें जाऊन होईल तितकें परिशीलन केलें, तरच योग्य तीं अनुमानें काढितां येतील व आपणांस त्यांपासून

लाभ करून घेतां येईल. अशीच स्थिति धर्माच्या ऐतिहासिक ज्ञानासंबंधीं आहे. एक प्रकारे धर्माचा इतिहास राजकीय इतिहासापेक्षां विशेष बिकट असल्यामुळें त्याचे ज्ञान नुसत्या वरवर वाचलेल्या भाराभर पुस्तकांच्या द्वारें होणे संभवनीय नाहीं. म्हणून त्यास दुसऱ्या प्रयत्नांची भर घातली पाहिजे. ती अशी, ज्या धर्मवीरांनीं धर्मतीर्थी आपले देह पाडण्यामध्येच जीवितसाफल्य मानिलें, ज्या धर्मप्रवर्तकांनीं धर्माकरितां व त्याच्या प्रसाराकरितां आपलें सर्व आयुष्य झिजविलें, व ज्या साधुसंतांनीं आपल्या सतत उपदेशवाणीने व पूर्ण विरक्त अशा वर्तनानें लोकांत धर्मजागृति करून ती जिवंत रहावी या हेतूने अनेक उपाय योजिले, त्यांचें सर्व तऱ्हेचें ज्ञान करून घेऊन, त्यांच्यायोगे महत्त्वास आलेलीं क्षेत्रें व तीर्थें, त्यांनी निरनिराळ्या ठिकाणीं चालू केलेले उत्सव व त्यांच्या नांवानें दर वर्षास भरणाऱ्या यात्रा, यांस गेलें पाहिजे. व त्या ठिकाणी शेकडों कोसांवरून येणाऱ्या भाविक आबालवृद्धांस व त्यांच्या त्या शुद्ध व प्रेमळ भजनास पाहून आपल्या मनास असा प्रश्न विचारिला पाहिजे कीं, हा कशाचा प्रभाव? सूक्ष्म विचाराअंतीं त्याचें रहस्य कळून येईल. व हें रहस्य कळणे म्हणजे संतांच्या कामगिरीचे महत्त्व जाणणे होय. पण हें वर सांगितलेल्या प्रयत्नांशिवाय कसे संभवणार नाहीं, हें खालील त्रोटक विवेचनावरून स्पष्टपणें कळून येईल.

आपण एक लहानसें उदाहरण घेऊं. ज्यांना म्हणून मराठ्यांच्या इतिहासाचे खरेखुरें ज्ञान करून घ्यावयाची इच्छा झाली

असेल, व त्यांच्या गुणदोषांचें योग्य परीक्षण करून त्यापासून बोध घेण्याची ज्यांस आस्था असेल, त्यांनीं, निरनिराळ्या लोकांनीं अर्ध्यामुर्ध्या सामुग्रीनें व किंचित् विकारवशतेने लिहिलेल्या ग्रंथांवरच केवळ भिस्त न ठेवितां, त्यांच्या कृतींचीं, पराक्रमाची व औदार्याची साक्ष पटविणारीं जी कांहीं मोडकीतोडकीं स्थळें आज अस्तित्वांत आहेत त्यांचें प्रत्यक्षदर्शन घेतलें पाहिजे. त्याशिवाय त्यांच्या स्वाभिमानाची, त्यांच्या मर्दुमकीची, व आपणांस ज्यांची ओळखही नाहीं अशा शेंकडों अडचणींशीं झगडून दाखविलेल्या त्यांच्या कर्तबगारीची नुसती कल्पना करणेंही फार कठिण पडणार आहे. तानाजीच्या अलौकिक शौर्याची व त्याच्या अचाट धाडसाची कल्पना नुसत्या पुस्तकांतल्या शब्दचित्रानीं होणें नाहीं. असें सांगतात कीं, मुंबईच्या एका बड्या कॉलेजांतील इतिहास या विषयाचे अध्यापक एकदां सिंहगड पाहण्यास गेले होते. त्यांना तानाजीच्या कृतीची आठवण होतीच. त्यांनीं जेव्हां ते एकसारखे तुटलेले कडे व एकसारखी लांबवर गेलेली झाडी पाहिली, तेव्हां त्यांस असें वाटलें कीं, इतिहासांत नमूद केलेलें कृत्य असंभाव्य आहे. पण सुधारलेल्या एकोणिसाव्या शतकांत जें असंभाव्य वाटतें, तें सतराव्या शतकांत, ज्यांच्या मस्तकांवर सुधारणा देवीनें वरदस्त ठेविला नव्हता अशा गरीब, लंगोट्या पण स्वामिभक्तिपरायण मावळ्यांनीं करून दाखविलें. तेव्हां ह्या लोकांसंबंधानें योग्य पूज्यभाव उत्पन्न करण्याचे कामीं अशा तऱ्हेच्या स्थळांच्या प्रत्यक्ष दर्शनानें जी मदत होईल, ती दुसऱ्या कशाच्यानेंही

होणार नाहीं. सारांश, अशा कामीं ऐतिहासिक ज्ञानाच्या दृष्टीनें राजक्षेत्रांची जितकी महती, तितकीच धर्माच्या इतिहासासंबंधीं धर्मक्षेत्रांची आहे, असेच म्हणणें योग्य दिसतें.

आज ज्या भक्तीचा प्रसार सार्वत्रिक झाला आहे, जिचे झेंडे संत-महंतांनीं उभारून ठेविले आहेत, व जी धर्माची केवळ आधार-स्तंभ होऊन बसली आहे, त्या भक्तीचा एवढा उत्कर्ष कसा झाला, व तिला सध्यांचें व्यापक व उदार स्वरूप येण्यास काय काय कारणें झालीं हे समजणें आवश्यक आहे. कारण त्याशिवाय तिचें रहस्य व तिच्या प्रसाराचें इंगित हीं चांगलीं कळणार नाहींत. ह्याकरितां आपल्या धर्माच्या इतिहासाकडे थोडीशी नजर फेंकून त्याचीं दिसून येणारीं निरनिराळीं स्थित्यंतरें नीटपणें लक्षांत आणणें विशेष महत्त्वाचें आहे.

**गो. कृ. देवधर.** देहूची यात्रा.

---

## पाठ ३४ वा.



## भक्तिमार्ग पंगुपणाचा आहे काय ?

**ह्वेचि थोर भक्ति आवडती देवा ।**
**संकल्पावी माया संसाराची ॥ १ ॥**
**ठेविलें अनंतें तैसेचि रहावें ।**
**चित्तीं असों द्यावें समाधान ॥ २ ॥**
**वाहिल्या उद्वेग दुःखचि केवळ ।**
**भोगणें तें फळ संचिताचें ॥ ३ ॥**

**तुका म्हणे घालूं तयावरी भार ।**
**वाहूं हा संसार देवापायीं ॥ ४ ॥**

भक्तिमार्ग हा पंगुपणाचा, अशक्ततेचा मार्ग आहे; व हजार-पांचशें वर्षें ज्या साधूंनीं ह्या मार्गाचा उपयोग केला, ते स्वतः पंगु होते; त्यांनीं सर्व लोकांस व आपल्या अनुयायांस पंगुपणा शिकविला, व त्या योगानें देशाला अत्यंत शोचनीय स्थिति प्राप्त झाली, असा एक आक्षेप अलीकडे निघाला आहे.

ही पंगुता खरी आहे कीं काय? व भक्तिमार्गाची सरणी हानि-कारक आहे किंवा कसें? हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. ज्यांचे हातपाय किंवा इतर इंद्रियें गेलीं आहेत, किंवा व्यापार करण्यास असमर्थ झालीं आहेत, त्यांना आपण पंगु म्हणतों. भक्तिमार्गाच्या योगानें अशा प्रकारची शिथिलता मनास येते, व्यक्ति व समाज निरुत्साह होतो, हा समज खरा आहे किंवा अन्यथा आहे, हें आज पाहणें आहे.

ज्यांनीं आक्षेप घेतला आहे, ते रामदासांची गणना पंगुकोटींत करीत नाहींत व त्यांच्या मार्गालामात्र सामर्थ्याचा मार्ग असें म्हणतात. हे म्हणणें अशुद्ध व वस्तुस्थितीला विरुद्ध आहे. गुरुशिष्यसंवादरूप दासबोध ग्रंथ लिहिण्यास स्वामी कां प्रवृत्त झाले? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, इतर साधूंनी जो मार्ग बंद्य केला, तोच भक्तिमार्ग संवादाच्या रूपानें गुरूकडून शिष्यास प्राप्त व्हावा एतदर्थ तो ग्रंथ रचिला असें ग्रंथारंभीं विशेष रीतीनें स्वामींनी कथन केलें आहे. आतां दासबोधांत

राजकारणावर कांहीं प्रकरणें आहेत, व प्रजेची योजना कशी असावी, खलांचा उच्छेद खलांच्याच द्वारें करावा, जो ज्या रीतीनें उपयोगीं पडेल तसा त्याचा उपयोग करून घ्यावा, इत्यादि लौकिक शहाणपणाचा संग्रह अत्यत मार्मिकतेनें त्यांत केला आहे, हें जरी खरें आहे, तरी ग्रंथांत मुख्य प्रमेय काय आहे? त्या ग्रंथाचीं एकंदर प्रकरणे व विषय मनांत धरून विचार केला, म्हणजे भक्तिमार्गाचा उपदेश हाच प्रधान हेतु आहे, असे उघड दिसतें. प्रसंगोपात आलेल्या चातुर्याच्या थोडचाशा भागाकडे-मात्र आपण लक्ष द्यावे, व बाकीचा प्रमुख भाग सोडावा, हें अन्यथा आहे. यावरून असें दिसून येईल कीं, रामदासांची सांगड इतर साधूंबरोबर घातली पाहिजे. त्यांची एकटयाची वेगळी नौका समुद्रांत एकटीच ढकलून चालावयाचें नाही. त्यांच्या-साठीं इतर साधूच्या नौकेतच जागा राखून ठेविली पाहिजे.

एक रामदास कोणच्या कोटींतले हा विशिष्टव्यक्तिविषयक विचार बाजूस ठेविला, तरी भक्तिमार्ग पंगुपणाचा कां सामर्थ्याचा? हा प्रश्न राहतोच. "सर्व माया संकल्पावी, देवापायीं संसार वाहावा, व त्यावर भार घालावा," असे ज्या थोर भक्तीचें तुकाराम-बोवांनीं वर्णन केलें आहे, अथवा मुख्य लक्षण मानिलें आहे, ती भक्ति पंगुपणा अथवा जडता उत्पन्न करील, कीं सामर्थ्य व तेज देईल, याचा स्वतंत्रच विचार केला पाहिजे. ज्या भाग्यवान पुरुषाला साधूंच्या उपदेशानें, किंवा परमेश्वराच्या अनुग्रहानें ही श्रेयस्कर भक्ति प्राप्त झाली आहे, परमेश्वराचे ठायीं निर्धार-

बुद्धि उत्पन्न झाली आहे, तो पंगु, असमर्थ होईल काय? हल्लींच्या किंवा जुन्या काळच्या थोर व्यक्तींचें उदाहरण घेऊन पहा; त्यांचे ठायीं मानसिक व्यवहारांत निश्चयाचा किंवा दाढर्याचा भाग किती विशेष रीतीनें दिसतो! ज्यांना भक्तीच्या द्वारें सिद्धि बऱ्याच अंशानें प्राप्त झाली आहे, जे केवळ निर्धाराचे पुतळे बनले आहेत, त्यांना पंगु म्हणणें, म्हणजे कसरतीने किंवा तालीम करण्यानें शरीरास शिथिलता येते, अथवा ज्ञानार्जनाच्या साधनांनीं व अभ्यासानें मनास दौर्बल्य येतें, असें म्हणण्यासारखेंच आहे. संसारांत व परमार्थांत जर कांहीं कठिण भाग असेल, तर तो परमेश्वरावर भार ठेवून व माया संकल्पून वागतां येणें, हा होय. ही थोर भक्ति ज्यांना प्राप्त झाली, ज्यांनीं वैराग्याची परमावधि दाखविली, त्यांस पंगु म्हणणें म्हणजे अर्थाचा विपर्यास करणेंच नव्हे, तर ह्या विषयाचें पूर्ण अज्ञान दाखविणें होय.

थोरपण कशांत आहे? अंगांत बल आहे म्हणून लोकांस त्रास द्यावा, बलाचा प्रभाव अशक्तांवर दाखवावा, ह्यांत थोरपणा नाहीं. व्यवहारांत आपण अशांस शासन करितों. एकट्यामध्यें ही असली शक्ति दिसत असतां आपण तिचा प्रतिकार करितों, परंतु दहापांच चोर मिळून दरोडा घालूं लागले म्हणजे आपणांस मोह पडूं लागतो आणि हें सामर्थ्य असें वाटूं लागतें! एका व्यक्तीचे ठिकाणीं जर तें सामर्थ्य होत नाही, तर हजार नव्हे लाख असे लोक जमले, तरी त्यांत तें ‘सामर्थ्य’ कोठून होणार? ह्यास फार झालें तर ‘पशुसामर्थ्य’ म्हणतां येईल! सामर्थ्याच्या

ह्याहून वरच्या पायऱ्या पुष्कळ आहेत, व खरें सामर्थ्य वाढविण्यास भक्तिमार्गच अनुकूल आहे. जोंपर्यंत आपण यथान्याय वागत आहों, व श्रेष्ठ मनोवृत्तींनीं प्रेरित, किंवा साधूंनीं उपदिष्ट असे खऱ्या हिताचे मार्ग आक्रमीत आहों, तोंपर्यंत भक्तिमार्ग आपणांस अक्षय्य सामर्थ्य देत असतो. पंगुपणा जो आहे, तो साधूंच्या उपदेशापासून नसून, त्याच्या उलट जाण्यांतच आहे.

देवावर भार घालणें म्हणजे आपण मुळींच भार वहावयाचा नाहीं, तटस्थ रहावयाचें, असें नाहीं; तर हें परमेश्वराचे कार्य आहे, अशा बुद्धीनें ओझें वहावयाचें व उद्योग करावयाचे. ‘ चित्तीं असो द्यावें समाधान ’ असें जें सांगितलें आहे, तेंही एवढयाचकरितां. आपला मोठेपणा व्हावा, आपल्या क्षुद्रबुद्धीची फलसिद्धि व्हावी, असे जे व्यासंग ते अन्यथा होत. व्यक्तिलाभाचे हेतु एकीकडे ठेवून परमेश्वराच्या इष्ट हेतूंची सिद्धि आपले हातून एकसमयावच्छेदेंकरून किंवा जमावानें व्हावी, ही बुद्धि धरणें म्हणजेच माया संकल्पिणें, किंवा देवापायीं संसार वाहणें होय. जगाच्या प्रगतीविषयीं परमेश्वराचे उद्देश निश्चित आहेत; व आपल्याला कसरत व्हावी, आपल्याला शाळा व्हावी, आपलें सामर्थ्य वाढावें, आपल्या गुणांचा विकास सर्व प्रकारें, सर्व दिशांनी होत असावा, एवढ्याकरितां त्यानें आपल्याला संसार लावून दिला आहे. देवाचा डांगोरा पिटण्याकरितां आम्ही येथें आलों आहोंत, असें तुकारामबावांनी म्हटलें आहे. ईश्वरप्रेरित म्हणून केलेल्या कार्याची महती अशी आहे कीं, इतर गोष्टी त्याच्या

पासंगालाही पुरावयाच्या नाहींत. ह्या दृष्टीनें पाहिलें असतां भक्तिमार्गाचा उपदेश अत्यंत सामर्थ्यदायी नाहीं काय?

**म. गो. रानडे.** धर्मपर व्याख्याने.

---

## पाठ ३५ वा.



## संशय-पिशाच.

आम्ही सुखांत कालक्रमणा करूं लागलों, चारपांच महिने आनंदांत घालविले. पण त्या सुखाचाही मग कंटाळा येऊं लागला, असें म्हटलें म्हणजे लोकांस खरे वाटावयाचें नाहीं. मृत मनुष्याचे दुःख करीत बसणें यांत एक प्रकारचें सुख असतें, त्याचप्रमाणे पूर्वीच्या दारिद्र्याचें आणि संसारांतील क्लेशांच्या अनुभवाचे फिरून स्मरण करण्यांतही एका तऱ्हेचें समाधान आहे. नुसते सुख कधींही आनंददायक नसतें, असा माझा अनुभव आहे. भूक लागल्याशिवाय अन्नाची गोडी नाहीं, किंवा उन्हांत गेल्याशिवाय सावलीचें सुख कळत नसते. त्याचप्रमाणें गरिबी चांगली भोगिल्याशिवाय श्रीमंतीचे सुख कळणे शक्य नव्हे, हा अनुभव आमच्या कुटुंबास येऊन चुकला. परंतु सर्व दिवस सुखाचा आला, तरी तो कंठण्यास, जड जातोच. असे कां, हे मला कळेना. प्रपंचांत मला काळज्या ज्यास्त असत. आजचा दिवस गेला, उद्यांचा कसा जाईल, ही मला पंचाईत पडे. मीठ आणलें, मिरचीला पैसे कोठून? ही माझी विवंचना मागें कधीं चुकली नव्हती. एकाददुसरे कोणी

सुखी आहेत हें पाहून, ते कां असे सुखी आणि मी कां तसा नाहीं, ह्या विचार सदा मला छळीत असे. गरिबीमुळें माझ्या सद्गुणी स्वभावाचें आणि सच्छील वर्तनाचे कांही एक चीज कोणीच करीत नाहीं, व कोठे त्यासंबंधानें चाललेली वाखाणणी मला ऐकूं येत नाहीं, म्हणून मला वैताग येई, व जगांतील तोंडपुजेपणाविषयी तिटकारा वाटे; हृदयस्थ अंतरात्मा व वरील जगच्चालक परमेश्वर यांच्या संतुष्टतेपलीकडे व त्यांच्या शाबासकीपुढें दुसऱ्या कोणाची मातब्बरी नव्हे, मनुष्याकडून होणारी स्तुति किंवा जगांतली वाहवा कुचकामाची, हा माझा निर्धार अनेक वेळा डळमळे, आणि त्यायोगानें दुःखाचेही पण थोडेबहुत चरके बसत. अशाश्वत, मिथ्या आणि पोकळ अशा सुखाच्या आशेच्या पायीं मी विनाकारण दुःखी होत आहें, हें मला समजत असे. आणि हल्लीं पहातों तो प्रपंचाची काळजी नाहीं, बाजार करण्याला अडचण पडेना, लोकांइतका किंबहुना त्यांच्यापेक्षां मी ज्यास्त सुखी असें मला वाटूं लागलें, लोकांत मानमान्यता वाढली, माझें व माझ्या मुलांचें स्तुतिस्तोत्र गाइलेलें कानी पडूं लागलें, हें पाहून आनंद वाटे. अशा परिस्थितींत मी सहकुटुंब जाऊन पडलों; पण तेथें मागील गरिबींत जे एक प्रकारचें सुख होतें, तें कांहीं अनुभवण्यास मिळेना. मला ज्यास्त ज्यास्तच कंटाळा येत चालला. तो कां, हें कांहीं सांगवत नाहीं. सोमलांतल्या किड्यास सोमलांत आनंद वाटतो, तो साखरेंत व्हावयाचा नाहीं, अशी माझी स्थिति आहे कीं काय, तें मला समजेना. ईश्वरी मायेचाच हा सारा चमत्कार असें

म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. पाण्यांत माशाला झोप घेतां येते, अशी योजना करणाऱ्या परमेष्ठीनेंच मनुष्यामागें लावून दिलेल्या दुःखांत खऱ्या सुखाचे झरे झुळझुळ वाहत ठेवण्याची तजवीज केली आहे, असेंच म्हटलें पाहिजे; आणि म्हणूनच ' दिली स्थिती देवानें तींतच सुख मान रे ' असा प्राणिमात्राला साधुसंत उपदेश करीत असतात. पण तिकडे लक्ष जातें आहे कोणाचें ? आपल्या स्थितीपेक्षां अन्यत्र सुखाची ठेव आहे, या मिथ्या भ्रमानें बिचारा मनुष्यप्राणी, आहे त्या सुखास मुकून आशेंत दिसणाऱ्या सुखाला आंचवलेला असतो तो असतोच. आशा, दारिद्र्य किंवा प्रापंचिक जखमा यांवर रामबाण मलम आहे, व आशेंतच काय ते सुख आहे असें वाटतें, या गोष्टी खऱ्या आहेत. तथापि माझा इतक्या दिवसांचा अनुभव इतकाच की, वाटेल ती स्थिति ईश्वर देवो, तींत सुख असतेच; पण ते शोधून पाहावयास हवें आणि मानून घेतलें पाहिजे. परंतु मनुष्याला जी पक्की कळत नाहीं, ती गोष्ट हीच. हें तत्त्व एकीकडे सारून मन सैरावैरा धांवत सुटतें, त्याला पुनः आवरून त्याच तत्त्वाशीं बांधून घालावयास हवें. मलासुद्धां ही गोष्ट फार उशिरां कळली. म्हणजे ती इतकी उशिरां कीं, त्या कळण्याचा मला उपयोगसुद्धां नाहीं अशा वेळीं. परंतु मी पुढचा, मला ठेच लागली, ती पाहून माझ्यामागचे तरी शहाणे होवोत, म्हणून मी ही माझी शुष्क व कंटाळवाणी कर्मकथा सांगत आहें. अद्भुत व असंभवनीय गोष्टी लोकांस ऐकावयाला फार आवडतात; पति-पत्नींच्या प्रेमकहाण्या मनोरंजक वाटतात, राजाराणीच्या गोष्टी

ऐकण्याची लहानपणापासून संवय असते, व्यवहारांत घडलेल्या फारशा आढळत नाहींत असल्या हकीगती ऐकण्यांत मन फार रमतें, हें मला ठाऊक आहे. माझी ही कर्मकथा तशांतली नाहीं. बोध स्पष्ट व्हावा आणि तात्पर्य काय तें चटकन ध्यानांत यावें, इतकाच काय तो माझा मुख्य कटाक्ष, हें कृपा करून कोणीं विसरूं नये.

सुख, सुख म्हणून मनुष्यप्राणी ज्याकरितां धडपडतो तो पदार्थ सापेक्ष तर आहेच. पण सुख हे मानण्यावर असतें, सुख असा एखादा स्वतंत्र पदार्थ नाही. फार दिवसांपासून आपणांस असावी अशी वाटणारी स्थिति मला एकदांची प्राप्त झाली; तींतसुद्धां मला लौकरच सुख वाटेनासें झालें. एकदां माणसानें संशयित मनानें पाहण्याला प्रारंभ केला, म्हणजे चोहोंकडे त्याला नको तेंच आढळूं लागतें. कावीळ नांवाचा रोग आहे; त्यामुळें जगांत पहावें तिकडे पिंवळेंच दिसूं लागते म्हणतात, तीच गोष्ट संशयाची आहे. संशय-पिशाच कोणाच्या एकदां बोकांडीं बसलें, म्हणजे त्या बिचा-ऱ्याची तें पुरी त्रेधा उडवून देतें, यांत शंका नाहीं. यास्तव शहाण्या माणसाने होतां होईल तों या संशयापासून दूर रहावे. बायको, मुलगा व लेक हीं तिघेंही माझी आतां फारशी परवा बाळगीत नाहींत, असें एकदां माझ्या मनानें घेतलें. झालें; मग त्यांच्या एकंदर कृतींत मला तेंच जिकडे तिकडे दिसे. पण मोहपाशाच्या-योगानें मी पुनः पुनः आपल्या मनाला आवरण्याचा प्रयत्न करीं. बाळ्याच्या कौतुकांत आणि शुश्रूषेंत ती सदा दंग असे. तिला

बाळ्याचें काम आधीं करावें असें वाटे. त्यामुळें साहजिकच माझ्या कामाकडे दुर्लक्ष आणि उशीर होऊं लागला. आजवर घरांत एकटा मीच काय तो कर्ता, त्यामुळे माझ्याइतके वर्चस्व घरांत कोणाचें नसे. आतां बाळ्या कर्ता झाला, आणि तो माझ्या-पेक्षां किती तरी पटीनें ज्यास्त पैसे मिळविणारा. तेव्हां माझ्याकडे गौण पक्ष सहज आलाच. पुत्र आणि शिष्य यांचा उत्कर्ष आनंद-दायक असतो इतकेंच नव्हे, तर त्यांनीं आपला केलेला परा-भवही दुःखद वाटत नाहीं, ही गोष्ट खरी आहे. पण आजवर मी एकटा कर्ता म्हणून वागलेला, त्यामुळें साहजिकपणें मला ही तेजहानि सुखावह वाटत नसे. पण ती गोष्ट मीं फारशी मनावर घेतली नाहीं. मुलगा मिळविता झाला, तरी तो पगार आणून माझ्या हातीं देई; प्रपचांतली एक काडीसुद्धां माझ्याशिवाय हालत नव्हती; आणि माझ्या परी मी आपली सत्ता चालवींतच होतों. परंतु माझ्या एकछत्री साम्राज्यांत जी तिची राहणी किंवा वाग-णूक होती ती बदलत चालली. ती बदलत चालली म्हणून कधीं त्याचा मला राग आला नाहीं. सहज विनोदाचा ओघ आणून थट्टेचा आव घालीत तिला मी उपदेश करीं. एकदां सहज कशा-वरूनशी गोष्ट निघाली, तेव्हां मीं म्हटलें, ‘ काय ग तूं आई-साहेब बनलीस, बगडी ताईसाहेब झाली, बाळ्या बाळासाहेब बनला, आणि मी एकटाच काय तो त्रिंबकभट तो त्रिंबकभट ! ’

धनुर्धारी. वाईकर भटजी.

---

## पाठ ३६ वा.



## वादे वादे जायते तत्त्वबोधः।

मनुष्य प्राणी हा जन्मतांच केवळ पशूप्रमाणे अज्ञान असतो, हें सर्वप्रसिद्धच आहे. पशूत व त्याच्यांत अतर एवढेच की, त्याचे ठायीं न्यूनाधिक प्रमाणानें ज्ञानग्रहणाची योग्यता असते; पशूत ती मुळींच नसते. पशूंत उपजतबुद्धि म्हणून एक प्रकारचें ज्ञान एकदम प्राप्त होतें, तेवढेच काय ते; त्याच्यापलीकडे त्याचे ज्ञान म्हणण्यासारखे जात नाहीं व तें सर्वांस अनायासें प्राप्त होऊन सर्वांस सारखेंच असते. मनुष्याची गोष्ट याहून अगदींच वेगळी. त्याच्या ज्ञानग्रहणास सीमाच नाहीं, असे म्हटले तरी चालेल. हल्लींची मनुष्याच्या आयुष्याची शतवर्षांची सीमा दशगुणित व शतगुणित जरी वाढली, तरी जगांतील अपार ज्ञानभांडार कधीं खलास होईल, अशी धास्ती करणे नलगे. न्यूटनसारख्यांनीं ज्ञानाच्या अपरंपार सागराविषयीं काय उक्ति प्रगट केल्या आहेत, त्या सर्वप्रसिद्धच आहेत. याप्रमाणे मनुष्याची बुद्धि एवढी थोर असतां, व तींत सांठविण्याचा ज्ञानसमुच्चय एवढा अक्षय असतां, वरील स्वल्पमात्र आयुर्दायांत त्या ज्ञानाचा संग्रह मनुष्यें कोणत्या रीतीनें करितात हे आतां पाहू.

ज्ञान प्राप्त होण्याचें एक मुख्य साधन म्हटलें म्हणजे श्रवण हें होय. मनुष्यास वाणी ही एक मोठी अमोलिक वस्तु परमेश्वरानें दिलेली आहे. तिच्यायोगानें आपलें हृद्गत त्यास दुसऱ्यास सुलभ-

तनें कळवितां येते. मनुष्याच्या ठायीं ज्ञानाचा जो सांठा नित्य होत जातो, त्यास आद्यद्वार म्हटलें म्हणजे श्रवणव्यापार हें होय. विद्येत जो प्रथम प्रवेश व्हावयाचा, तो तरी गुरुमुखांतून निघालेली वाणी ऐकूनच होत असतो, हे सुप्रसिद्धच आहे; व लेखनकला निघण्याच्या पूर्वी ज्ञानाचें साधन श्रोत्रेंद्रियच काय ते एक होतें. पुढे लिहिण्याची युक्ति निघाल्यावर, ज्ञानाचा प्रसार होण्यास व तें चिरकाल रहाण्यास कोणचें नवें साधन झालें, हे आज कोणासही सांगावयास नकोच. हजारो वर्षांपूर्वी होऊन गेलेले विचार जसेचे तसे कळविण्यास वरील साधन अत्यंत उपयोगी झालें. सिसरोनें एके ठिकाणीं म्हटलें आहे की, लेखनकला जर नसती, तर मनुष्य सदोदित अज्ञानावस्थेंत राहिली असतीं. पुढे लेखनकलेवरही ताण होऊन मुद्रणकला निघाली; हिने तर ज्ञानाच्या प्रसारास किती वेग दिला, आजवर मनुष्यजातीचें किती कल्याण केलें, व ती पुढेंही किती करील, हे सांगण्याची सोयच नाहीं! चारपांच शतकांपूर्वी मोठमोठ्या राजांस जो ग्रंथसंग्रह दुर्लभ होता, तो आतां एखाद्या लंगोट्यासही सहज पैदा करतां येणार आहे. भगीरथानें महाप्रयत्न करून कैलासराजाच्या जटाजूटांतून विहार करणाऱ्या स्वर्णदीस ओढून खालीं आणिलें, आणि भूलोकास शोभा व पावित्र्य हीं प्राप्त करून दिलीं; त्याप्रमाणेच वरील महाकलेच्या तावडीत सांपडल्यानें सरस्वती ही केवळ सर्वजनगम्य होऊन राहिली आहे, व तिच्या प्रसादाच्या योगेंकरून लोकांस अगणित लाभ झाले आहेत.

आतां ही गोष्ट सर्वांस सहज कळण्यासारखी आहे कीं, बोल-

ण्यानें किंवा छापण्यानें जें ज्ञान मनुष्यास प्राप्त व्हावयाचें, तें खरें असलें तर उपयोगी; अवास्तव ज्ञान कांहीं उपयोगाचें नाहीं. हें तर काय? पण असत्य ज्ञान अज्ञानापेक्षां वाईट. जसा खोटा रस्ता, हा रस्ता माहीत नसण्यापेक्षां हजार हिश्शांनीं वाईट, किंवा खोटें औषध घेणें हें औषध न घेण्यापेक्षां शतपट भयंकर, त्याप्रमाणेंच केवळ अज्ञान पुरवेल, पण मिथ्याज्ञान हे अत्यंत हानिप्रदमात्र होय! हे जर खरें आहे, तर वरील सत्य निष्पन्न होण्यास एकच मार्ग आहे; तो हाच कीं, भाषण व मुद्रण ( लेखन हें मुद्रणांतच आलें, यास्तव त्याचा निराळा उल्लेख नलगे. ) यांस कोणत्याही तऱ्हेचा अटकाव उपयोगी नाहीं. ज्याच्या जे ध्यानास येईल व जें ज्यास सयुक्तिक वाटेल, ते त्याने वाग्द्वारा व मुद्रणद्वारा प्रगट केले पाहिजे. कोणत्याही गोष्टीची शहानिशा व्हावयाची म्हटली, म्हणजे तिजवर दहा जणांचे जेव्हां दहा अभिप्राय पडतील तेव्हांच ती होत असते. निवळ एकानेच आग्रह धरून अमुक गोष्ट अमुक प्रकारची आहे, असे प्रदिपादन करणे, हा केवळ अप्रयोजकपणा आहे. अशाने सत्याची निष्पत्ति कालत्रयींही व्हावयाची नाहीं, हें उघड आहे.

आपल्यांत आंधळ्यांची आणि हत्तीची एक गोष्ट आहे, ती प्रस्तुत प्रकरणीं अत्यंत समर्पक होय. चारपाच आंधळ्यांस हत्तीच्या आंगावर सोडून देऊन, नंतर त्यांस हत्तीचें वर्णन करावयास सांगितलें असतां, एकेकाने आपापल्या परीनें जसें त्या प्रचंड पशूच्या सोंडेचें, पायाचें, कानाचें वगैरे पृथक् पृथक् वर्णन

केलें, आणि एकेकाचे निरूपण दुसऱ्याच्याशी न जमल्याने तें जरी एकाशिवाय बाकीच्यांस अयथार्थ वाटले, तरी ते एकंदरीनें पाहतां खरेंच होतें. तशीच गोष्ट सत्याची आहे. प्रत्येक मनुष्यास जरी आपल्या मताचा आग्रह असतो, बाकीची सारीं त्यास खोटीं वाटतात, तरी इसापनीतींतल्या सरड्याच्या गोष्टी-प्रमाणे, विचाराअंती इतरांचाही स्वीकार करणे त्यास पुष्कळ वेळा जरूर पडतें; निदान इतकें तरी खरें कीं, कूपमंडूकन्यायानें जो मनाचा आकुंचित प्रदेश मनुष्यास सारी पृथ्वी म्हणून भासत असतो, तो इसापनीतींतील आकाशसंचारी मृगाप्रमाणें त्याची दृष्टि दूरवर फांकली असतां त्यास तसा भासेनासा होतो. मनुष्याची बुद्धि स्वभावतःच अल्पविषयगामी असते. तिचा एक-टीचा टप्पा कितीसा दूर जाणार? तेव्हां अर्थातच इतरांच्या विचारांशी आपले विचार ताडून पाहून, जें स्वरूप अधिकाधिक लक्षांत येऊं लागते, तेच खरे म्हटलें पाहिजे हे महातत्त्व जाणून सुज्ञ जे आहेत, ते कोणत्याही विषयावर घाईनें आपलें मत प्रद-र्शित करीत नाहीत; कोणत्याही गोष्टीचा सिद्धान्त करावयाचा, तर पूर्वपक्ष व उत्तरपक्ष या दोहोंचा यथास्थितरीत्या शांतपणे विचार करून, नंतर त्याचे निबंधन करितात. सारांश, संस्कृतांत म्हण आहे कीं. "बुद्धेः फलमनाग्रहः" म्हणजे बुद्धिमत्तेचे फल काय? —तर आग्रहाचा अभाव! हा म्हण सर्वथा खरी आहे, यांत शंका नाहीं.

आतां वर सांगितलेल्या गोष्टी म्हणजे कोणास माहीत नाहींत व त्या आम्ही येथे नव्यानें सांगत आहों, असें नाहीं. ज्यानें थोडा-

बहुत विचार केला आहे, व ज्यास सत्य म्हणजे काय व असत्य म्हणजे काय हे कळत आहे, त्याच्या सहज लक्षांत येण्यासारख्या त्या खचित आहेत. असे असूनही जगांतल्या व्यवहाराकडे दृष्टि दिली, तर इतर जसे ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगतांना सांगतात व आयते वेळीं पुराणांतलीं वांगीं पुराणांत गुंडाळून ठेवून, लौकिक न्यायासच प्रसंग पडला असतां अनुसरतात, त्याप्रमाणेच वरील तत्त्वज्ञानाची हेळसांड झालेली आढळते.

**वि. कृ. चिपळूणकर.** कि. लेखाचा संग्रह

---

## पाठ ३७ वा.



## सृष्टिप्रेम.

**नादत्ते प्रियमण्डनापि भवतां स्नेहेन या पल्लवम् ।**

**अर्थः**—नटण्याची तिला हौस खरी; पण हे वृक्ष हो, तुमच्यावर तिचे प्रेम असल्यामुळे ती तुमचे पल्लवांला हात लावीत नाहीं.

—शाकुंतलम् ।

वसंतऋतु जर आयुष्यांत एकवारच येता, दिनमण्याचा उदय व अस्त हे नित्य न होतां वर्षाकांठीं एक वेळच होते, बहुरंगी इंद्रधनुष्य शतवर्षांनी एकदांच दिसतें, सुंदर पुष्पें जर माणकांइतकीं दुर्मिळ असतीं, आणि हिमबिंदु हिरकण्यांइतके दुष्प्राप्य असते, तर या गोष्टी किती तरी आश्चर्यकारक वाटल्या असत्या, आणि त्यांच्या दर्शनानें आपणांस आनंदही किती तरी अनिर्वाच्य झाला असता !

पण दयाळू परमेश्वराने या गोष्टी विपुल ठेवल्यामुळे आपल्या हातून त्यांची अवगणना होते. कारण, म्हणूच आहे, ' अतिपरिचयादवज्ञा. ' गेटी म्हणतो, " इंद्रधनुष्य हे इतकें चित्रविचित्र व चित्ताकर्षक आहेना ? तथापि तें सारखें घटकाभर राहू द्या, म्हणजे त्याजकडे कोणीही पाहणार नाहीं. " जनांची चालच ही. कवि म्हणतो, " नवनवगुणरागी प्रायशः सर्वलोकः "—' वस्तू वाटे नवी जो, अवड बहु तिची, लोकरीती अशी हे । ' मनुष्य म्हणतें, ' अंः ! त्यांत काय पहावयाचे आहे ? तें नित्याचेच आहे. ' पण खरें पाहतां या ज्या नित्याच्या गोष्टी, त्या अत्यत मनोहर व अत्यंत आवश्यकही आहेत; आणि ज्याची दृष्टि शास्त्रपूत झाली असेल, त्याला या गोष्टी प्रतिदिनी नवीन करमणूक दिल्यावांचून रहात नाहींत. आकाशांतील ताऱ्यांकडे रुचिहीन लोक वर मान करून पुरेसें पहातदेखील नाहीत; पण ग्रहज्योतिषी दुर्बीण लावून रात्रीच्या रात्री डोळेफोड करीत असतो, आणि त्याला आनंदही नित्य नवा होत असतो. सर वॉल्टर स्कॉट म्हणे, " या जगांत अत्यंतावश्यक आणि जिवाशीं बाळगण्याइतक्या योग्य अशा ज्या वस्तु आहेत, त्याच नित्याच्या आहेत. " ग्रे कवि म्हणतो,—

( श्लोक ) **जें क्षुद्रपुष्प फुलतें गिरिकंदरांत ।**
**जें मंजु गीत पडतें श्रवणीं वनांत ॥**
**हा सूर्य, हें गगन, हे स्थिर ते सर्व वाटे ।**
**कीं स्वर्गिचीं उघडिती मजला कपाटें ॥ १ ॥**

स्वतः विधात्याच्या कुशल हातानें निर्मिलेल्या पुष्पांचे अनंत

नेत्रानंदकर वर्ण व आकृति आणि अनेक मार्गांनीं त्यांचे हातून होणारी लोकसेवा यांकडे लक्ष जाऊन ज्याचें मन द्रवणार नाहीं, तो मनुष्यच नव्हे. मधुमालती, वनज्योत्स्ना, स्वर्णचंपक, मदनबाण, अशोक, पुन्नाग, इत्यादि अनेक पुष्पवृक्षलतांची नुसतीं नांवेंच इतकी श्रुतिमनोहर आहेत की, त्यांच्या श्रवणाबरोबर मनुष्य मिटक्या मारूं लागतो. जाई–जुई–मोगरीचा बहर राहिला बागांतच; पण आमचा हरिशी चडोल " या जाइ–जुई–मोगरिला बहर तो आला, " ही नुसती नामावळी गाऊनच प्रत्यक्ष बहर भोगीत असल्याप्रमाणे स्वप्नांत दिसतो. नामस्मरणांत ही जादू; मग त्यांचेसंन्निध जाऊन एकीकडे त्याचा तो सकलेंद्रियमोहन, मृदु, मधुर सौरभ घेत व एकीकडे त्यांच्या त्या सतेज व टवटवीत वर्णवैचित्र्यावर दृष्टि स्थिरावीत, मनुष्य उभा राहिला असतां खरोखरच त्याला या मृत्युलोकाची क्षणैक विस्मृति पडून आपण गंधर्व, किन्नर, अप्सरा इत्यादिकांच्या समागमांतच आहों. असे वाटते, व पुष्पोद्यानांतील वृक्षस्कंधांवरून बसलेल्या पक्ष्यांचे सहजरमणीय कलमधुर ध्वनि ऐकतांना सांसारिक दुःखांची आठवणही करण्यास चित्तास सवड होत नाही, यांत नवल ते कोणतें ?

डोंगर, पर्वत, अरण्ये, यांसबंधें रिसरोचे असें म्हणणें असे कीं, " आपणांस त्यांपासून जो आनंद होतो, त्याचें कारण आपली त्यांत वसति आहे. " परंतु हे म्हणणे खरे नाहीं. विशाल व उत्तुंग पर्वतांचें गंभीरोदात्त स्वरूप दृष्टीस पडतांच कोणाही मनुष्यास करमणूक झाल्यावांचून राहणार नाहीं. युगानुयुगें मस्तकावर

शुंडाधारेनें मेघ वर्षत असतांही जे जेरीस आले नाहीत, असले प्रोत्तुंग गिरिप्रपात, आणि अखंड झंझावातालाही दाद न देणारीं अद्रिशृंगें पाहून ज्याला म्हणून कांहीं हृदय आहे, तो सहजच कौतुकाविष्ट होतो. लबक म्हणतो, " 'तुम्ही गिरिशृंगांकडे पहात जा, तेथून तुम्हांस साहाय्य मिळेल,' असा जो बैबलांत उपदेश आहे, तो मोठ्या शहाणपणाचा आहे." सृष्टिसौंदर्याची रुचि उत्पन्न करण्यास जसे सृष्टिशास्त्रवेत्ते कारण आहेत, तसेच प्रकृत्युपासक कविगणही आहेत. रस्किन म्हणतो, " नद्यानिर्झरांना जलपूरण करणें एवढीच कामगिरी हे गिरिराज करितात, असे समजूं नये. ही कामगिरी सामान्य आहे. त्यांची उच्च कामगिरी म्हणजे आपल्या विशालपणानें मानवी हृदयाला थक्क करून सोडून त्याचे दृष्टीवरील मोहपटल उडविणें, व विधात्याच्या अजब करणीची मनुष्याला साक्ष पटवून ईश्वरी वैभवाविषयीं सतृष्ण असलेलीं मानवी हृदयें तृप्त करणें, ही होय. त्यांच्या घटनेंत विधात्याची मोठीच शिल्पचातुरी दिसून येते. त्यांपासून मनुष्याला तत्काळ आश्रयस्थान, सुख व विश्रांति मिळते, आणि तो शोधक दृष्टीचा असल्यास, ते सृष्ट्युत्पत्तीपासूनच्या कथा त्याला सांगतात, व अनंत रमणीय देखावे दाखवितात."

अंतरिक्षाचाही हाच प्रकार. जे प्रेक्षावान् असतील, अशांना अंतरिक्ष म्हणजे विस्मय, कौतुक व आनंद यांचे एक अक्षय निधानच आहे. दिवसास चंडरश्मीचे ते सर्वातिशायी भास्वर शुक्लतेज आणि वैभव पाहून डोळे थक्कच होऊन जातात. पुढें

संध्यासमय येऊन दिनमणि अस्ताचलावलंबी झाला, म्हणजे तर तो दृष्टिक्षम होऊन त्यास अधिकच रमणीयता येते. बरें, अल्पावकाशानें तो साफ दृष्टीआड होत आहे, तो शीतरश्मि निशानाथ आपल्या असंख्य चमकदार सहचारिणींसह गगनांगणांत आविर्भूत होऊन आपल्या शरीरनिर्वापक ज्योत्स्नेनें सर्व जग भरून काढितो, तेव्हां तर असें वाटतें की, दिनमणीच्या कारकीर्दींतील मौज हिजपुढें कांहींच नाहीं. निखिलनेत्रानंदन, विश्वतापहरण अमृतांशु नभोमंडलांत उदित झालेला पाहून कविगण आणि प्रेमीजन यांना तर काय होते ते होतें! आईला जसे नवानवसांच्या आपल्या लाडक्याला पाहून यावर काय शृंगार चढवूं आणि कोणते अलंकार घालूं असें वाटतें, तसें कविगणाला या आनंदकंदाला कोणती उपमा द्यावी आणि कोणती न द्यावी, असे होऊन जातें. आणि मग त्या उल्हासभरांत कोणी हा दिग्वधूंचा क्रीडाकंदुक, कोणी स्वर्गंगेंतील राजहंस, कोणी ताराहारांतील मध्यमणि. कोणी शृंगाररक्षामणि इत्यादि रूपकें त्याजवर करितात. प्रेमी जनांना वाटतें कीं, या सुधाकराचें राज्य आहे तों असेल नसेल ती चैन करून घेऊं. असा हा चंद्रोदय निरुपम सुखदायी आहे.

रात्र ही तर, शांति आणि विश्रांति मिळावी म्हणूनच ईश्वरानें निर्मिलीसें दिसतें. एक प्रेमी म्हणतो:—

( श्लोक ) **ज्योत्स्ना किती मधुर हे विहरे तटान्तीं।**
**येथें प्रिये बसुनि आपण एकचित्तीं ॥**
**ऐकूं मनोहर मृदुस्वन गायकांचे ।**
**जे होति रम्यतर शांतिभरें निशेचे** ॥१॥-शेक्सपिअर

सेंट बसिल म्हणतो की, "तुम्ही जर एखाद्या निरभ्र रात्रीं आकाशांतील तारागणाचे सौंदर्याकडे कांहीं वेळ सारखी टक लावून, मग असल्या या कधी न कोमेजणाऱ्या तारकारूपी पुष्पांनीं या भव्य विश्वमंदिराचे विस्तीर्ण छत ज्यानें चितारिलें असेल, त्या चतुर कारागिराविषयीं विचार करूं लागाल, तर तुम्हांला या कुशल जगत्कर्त्याविषयी प्रेमाने गहिंवर आल्याशिवाय कधींही राहणार नाही. त्याहूनही पुढें तुमच्या जेव्हां असे लक्षांत येईल की, हे इतके चित्रविचित्र नकसकाम नुसते मनोहरच नसून नियमबद्ध आहे, तेव्हां तर तुम्हांला प्रेम केवळ अनावर होईल, आणि तुम्हांला असे खचित वाटेल की, ज्याची कृति इतकी मोहक आहे, त्याचे स्वतःचे रूप व सामर्थ्य किती तरी मनोवेधक असलेच पाहिजे." कांहींचें असे म्हणणें आहे कीं, अंतरिक्षांतील चमत्कारांवरून कर्त्याच्या अजब बुद्धिवैभवाची तेवढी साक्ष पटते; पण त्यापासून त्याचे चांगुलपणाचा निश्चय होत नाही. पण परमात्मा केवळ कौशल्यनिधिच नाहीं, तर दयासागरही आहे. तुकोबा म्हणतातः——

**अभंग.**

**कां रे नाठवीसी कृपाळू देवासी । पोषितो जगासी एकलाचि ॥**
**फुटे तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयासी कोण घाली ॥**
**कोणें केली बाळा दुग्धाची उत्पत्ति । वाढवी श्रीपति सवें दोन्ही**
**तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहें त्या अनंता आठवोनी ॥**
**तुका म्हणे त्याचें नांव विश्वंभर । करा निरंतर ध्यान त्याचें ॥१॥**

शास्त्रीय प्रगतीनें तर सृष्टीचे अगाधपण प्रतिक्षणीं प्रतीयमान

होत आहे. साध्या डोळ्यांना तळहाताएवढे दिसणारें सूर्यबिंब आपल्या चतुःखंड पृथ्वीच्या लक्षावधि पटीनें मोठें आहे, आणि त्याचेभोवतीं सप्तग्रह फिरत आहेत; तथापि असल्या या अवाढव्य ग्रहमालेचा मध्यमणि जो सूर्य, तो अनंत अंतरिक्षांत असणाऱ्या अमर्याद तेजोगोलांचे मानाने केवळ राईएवढा ठिपका आहे; हे सत्य ज्योतिःशास्त्रानें प्रतीत होते. भूगर्भशास्त्रही आपल्या परीनें काळाचें अनंतत्व दाखवितें. शिवाय, शास्त्राचे साहाय्याने एवढेही अफाट विश्व आज असंख्य युगें सुतांत ओंवल्यासारखें नियमबद्ध सुयंत्र चाललें आहे, असें आढळून येते. असें झालें, म्हणजे या अखिल नाटकाचा चतुर सूत्रधार कोण असेल तो शोधावा, म्हणून मनास सहजच वेड भरतें व चित्तांत भक्त्यादि सद्भावांचा उद्गम होऊन, डोळे त्या आदिकारणाकडे लागून, वाणीला त्याचे महिम्न-स्तोत्र करण्यास सहजच स्फूर्ति होते; आणि—

**आर्याः—ही अद्भुत सृष्टि तुवां देवा केव्हां कधीं कशी केली ।**
**याविषयींची आम्हां जीवांची कल्पना चिरुनि गेली ॥ १ ॥**
**रविशशिनक्षत्रांहीं कैसें आकाशसदन शोभविलें ।**
**सौंदर्य हें पहाया जीवांचें नयनवृंद लोभविलें ॥ २ ॥**

—परशुरामपंततात्या गोडबोले.

इत्याकारक प्रेमोद्गार तिच्या वाटे स्वयंभूच बाहेर पडतात; व जीव आश्चर्य व आनंद यांत गढून जाऊन, त्याला आधीव्याधींची विस्मृति पडते; आणि दृढभ्यासानें या विश्वरूपी मंदिरांत परमात्म्याची मूर्ति सर्वत्र विराजमान आहे, असा भाव हृदयांत ठसून

जन्माचें सार्थक होतें. हे सर्व उपकार शास्त्राभ्यासाचे व सृष्टिप्रेमाचेच आहेत. असें असतां वर्डस्वर्थसारख्या कवीनें,

**( श्लोकार्ध ) कशाला कला आणि तीं शुष्कशास्त्रें ।**
**पुरे एक प्रमाद्र सौहार्दमात्र ॥**

असे म्हणावे हे अमळ तऱ्हेवाईक आहे. शोधक बुद्धीनें सृष्टीचे सप्रेम अवलोकन केल्याने केवळ नेत्रानंद किंवा करमणूकच होत नसून मनुष्याला अनेक उपयुक्त गोष्टींचे ज्ञान होतें. कौंट मॅटि नामक इटालियन गृहस्थानें जी "इलेक्ट्रोहोमिओ–पथी" किंवा "वैद्युत् अनुचिकित्सा–." पद्धति शोधून काढिली, तिचें गुरुत्व एका कुत्र्याकडे आहे. तें असें:–एक अंगास लूत भरलेला कुत्रा रानांत जाऊन एका वनस्पतींत लोळून येई. या गोष्टीकडे मॅटाचें लक्ष असे. पुढे तो कुत्रा निर्मळ झाला तेव्हां मॅटीनें ती वनस्पति कुत्र्याच्या मार्गाने हुडकून, तिचे प्रयोग करून पाहिले, तों त्या वनस्पतीने लुतीसारखे अन्यही लशीचे रोग बरे होतातसें दिसलें. मग शोधावरून शोध वाढत वाढत त्याने ही अद्भुत चिकित्सापद्धति निर्माण केली. याचप्रमाणे वानरापासून, मुंगुसापासून व अन्य अनेक प्राण्यांपासून रोगहारक उपायांचें मनुष्यास ज्ञान झालेलें आहे. डुकराचें तेल, सशाचें रक्त, गोरोचन, पलिस्तराची लस, कॉडलिव्हर ऑईल, कस्तुरी इत्यादि किती तरी औषधी जलस्थलचर प्राण्यांपासून प्राप्त झाल्या आहेत.

एवंच, सृष्टयवलोकनापासून आनंद व करमणूक होऊन शिवाय पुष्कळ अनेक उपयुक्त गोष्टींचें ज्ञान होतें हें सिद्ध आहे. असें

असतां मनुष्यें सांसारिक व शारीरिक दुःखांचा विसर पडावा, म्हणून पत्ते, सोंगट्या, बिलिअर्ड किंवा जुगार खेळत बसतात, अथवा गुत्त्यांत जाऊन मादक पेयांचे चषक झोंकीत राहतात, याला काय म्हणावें? सृष्टिनिरीक्षणांत किती आनंद, ज्ञान व दुःखमोक्ष आहे, प्रत्येक वनराजि, प्रत्येक क्षेत्र, प्रत्येक उपवन, प्रत्येक जलप्रवाह किंवा जलाशय, किती सुख व कौतुक देतो, ते सांगता येत नाहीं, डोळेमात्र पाहिजेत. बरें, शास्त्रीय ज्ञानानें वरील व्यसनांप्रमाणें कोणाचा घात केल्याचें ऐकिवांत नाहीं; उलट कल्पवृक्षाप्रमाणें त्यानें आपल्या भक्तांना अमर करून सोडल्याचीं उदाहरणे विपुल आहेत. सृष्टि ही केवळ सौंदर्याचेच प्रदर्शन नसून ते शिक्षणगृहही आहे. खरें ज्ञानगुरुत्व सृष्टीसारखें कोणाचेही अंगीं नाहीं. म्हणूनच गौतमबुद्ध तत्त्वोपदेशार्थ मनुष्यांना सोडून वनांत सृष्टिदेवीचे निकट गेला, ही गोष्ट प्रत्येकाने लक्षांत ठेवण्याजोगी आहे.

**म. ह. मोडक.** सुख आणि शांति.

---

## पाठ ३८ वा.



## कर्मयोग.

वेदान्तांत मोक्षप्राप्तीचे तीन योग सांगितले आहेत. कर्मयोग, भक्तियोग आणि ज्ञानयोग. यांतला कर्मयोग जो आहे, तो जन्मतःच माणसाच्या आंगीं खिळलेला आहे. म्हणजे मनुष्य आपल्या मनानें किंवा देहानें जें जें कांहीं करितो, अथवा ह्या दोन साधनांनी

प्रयत्नतः अथवा अप्रयत्नतः जें जें कांहीं होतें, त्या सगळ्यांचा समावेश कर्म या शब्दांत होतो. आणि गीतेंत म्हटलें आहे:—

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥**

म्हणजे, कांहीं ना कांहीं केल्यावांचून कोणी क्षणभरही राहूं शकत नाहीं. प्रकृतीचे गुण प्रत्येकाकडून बळेंच कर्म करवितात. म्हणून बोलणे, ऐकणे, श्वासोच्छ्वास घेणें, चालणें, हंसणें, रडणें, रागावणें, क्षमा करणें, आनंद होणे, दुःख होणें, आशा लागणे, निराश होणें, प्रीति करणे, द्वेष करणे, स्तुति करणें, निंदा करणे, परोपकार करणें, परपीडा करणे इत्यादि सगळ्या क्रिया कर्मांत मोडतात. ह्यांतली कोणतीही क्रिया पाहिली, तरी अनेक बारीक बारीक क्रियांच्या संमेलनानें झालेली असते, असे आढळून येईल. म्हणजे, समुद्राची लाट आपल्या दृष्टीस पडते, ती एक असते, परतु ती तिच्यातल्या जलकणांवर अनेक प्रकारच्या लहान मोठ्या क्रिया घडून झालेली असते. तसें कांहीसे ह्या वर सांगितलेल्या मनुष्यकर्मांचे आहे.

मनुष्याच्या अनैच्छिक कर्मांची गोष्ट वेगळी. त्यांवर त्याची सत्ता नसते, आणि तीं त्याच्या स्वाधीन नसतात. त्यामुळें त्यांत त्यास आपला हेतु ठेवितां येत नाही. श्वासोच्छ्वास होणें, काळीज उडणें. रक्त वाहणें ह्या ज्या क्रिया आहेत, त्या ह्या प्रकारच्या आहेत. परंतु, ऐच्छिक कर्मांत तसें नाही. मनुष्य आपल्या इच्छेनें ज्या क्रिया करतो त्या मनांत कांहीं तरी हेतु धरून करितो; उगाच करीत नाहीं. त्यांत भ्रम पुष्कळ असतो. पण त्यांच्या-

वरून त्यांत हेतु नसतो, असें म्हणतां येत नाहीं. आपणास सुख व्हावें ह्या हेतूने लहान मूल दिव्याची ज्योत धरावयास धांवते, त्याप्रमाणेच कांहीं देवतांस संतुष्ट करण्याचा हेतु मनांत धरून कांही लोक त्यांस बळी देतात. ह्यांत भ्रम पुष्कळ आहे. पण हेतु नाही असें नाहीं. पण हा हेतु साधणें हें साध्याच्या योग्यतेवर केवळ अवलंबून नसतें; तर ते साध्य चांगलें असून, त्याचा उपयोग घेण्याची योग्यता साधकाच्या ठायीं असली पाहिजे. नाही तर ते सगळें व्यर्थ होते. एखाद्या रोगी भिकाऱ्यानें मोठ्या प्रयत्नांनी पंचपक्कान्नांचें पात्र मिळविलें, तर त्याला त्याचा उपयोग काय होणार? अथवा एखाद्या निरक्षर माणसानें पुष्कळ पैसे खर्चून मोठमोठ्या गहन शास्त्रांचे शेकडों मोठमोठे ग्रंथ आपल्या संग्रहीं ठेविले, तर त्याला त्यांचा उपयोग काय होणार? तोच प्रकार कर्मास लागू आहे. मनुष्यास, नुसते कर्म करण्याचा प्रयत्न केल्यानें, त्या कर्माचे फल मिळावयाचें नाहीं. तर, जें कर्म करण्याची योग्यता त्यास असते, ते कार्य त्यानें यथासांग केल्यानें त्याला ते प्राप्त होतें. म्हणजे पर्यायेकरून असें म्हणावयाचे की, मनुष्याची योग्यता कर्मावरून सिद्ध होते.

जन्मास आल्यापासून माणूस कर्म करीत असतो. त्याने तृप्ति होत नाहीं. एक इष्ट फल प्राप्त झालें कीं, त्याच्या वरच्याची आशा लागते. अशा प्रकारे कर्मपीठिका मरणकाळपर्यंत सरत नाहीं. आणि ती न सरल्याच्यायोगानें, वारंवार निराशेची पीडा होऊन, कर्माचा व्याप मागे लागलेला असतो. त्यामुळें मन

निरंतर अस्थिर आणि अतृप्त राहतें. आणि ही स्थिति अत्यंत क्लेशप्रद असते. कां कीं, तींत शांति नसते. आणि शांति हेंच काय त सगळें सुख असतें. अनेक इंद्रियांचे व्यापार चालत असतात, त्यांचा सगळा रोंख तृप्तीकडे असतो. परंतु ती तृप्ति कधीं मिळत नाहीं. आणि कधीं मिळाली, तर ती क्षणभर राहते आणि पुढें नाहींशी होते. म्हणून तृप्ति संपादण्याचा उद्योग आणि तृप्तीची प्राप्ति हींच अतृप्तीस कारणीभूत होतात. पुढें पृथ्वी जिंकावयास उरली नाहीं, म्हणून शिकंदर बादशाहा रडला! ह्या सगळ्याचें तात्पर्य हेंच कीं, तृप्तीची चिरस्थायी प्राप्ति ही माणसास, ह्या मार्गानें असाध्य आहे. परंतु ह्या प्रकरणीं निराश होण्याचें कारण नाहीं. थोडा विचार केला म्हणजे, असें कळून येतें कीं, हें जें अस्थैर्य मनाला प्राप्त होतें, त्यास कारण कर्मफलाशा होय; आणि कर्मफलाशा म्हणजे कर्माचे ठायींचें स्वत्व होय. तें स्वत्व नष्ट झालें, म्हणजे त्याबरोबरच कर्माच्या ठायींचें दुःख नाहीसें होतें. पहा, आपण एका मित्राच्या घरीं एखादी तसबीर पाहिली, ती चांगली वाटली म्हणून आपण तशी एक तसबीर बाजारांतून आणून घरी ठेविली; पुढें कांहीं अपघातानें मित्राच्या घरच्या तसबिरीचा नाश झाल्याचें कळलें; त्याचें आपणांस कांहीं वाटलें नाहीं. पण तशाच कांहीं कारणानें आपल्या येथल्या तसबिरीचा नाश झाला, तेव्हां आपणांस फार वाईट वाटलें. तें कां बरें? जशी ती तसबीर, तशी ही तसबीर. तिला किंमत पडली, तितकीच हिला पडली. ती नाश पावली,

सशी ही नाश पावली. मग तिजविषयीं दुःख वाटलें नाहीं, आणि हिजविषयी वाटलें, तें कां? याचें कारण असें कीं, त्या तसबिरीचे ठायीं आपले स्वत्व नव्हते आणि हिच्या ठायीं ते होते. तर मग, दुःखाचें कारण तसबिरीचा नाश नव्हे; तर त्यास कारण तिच्या संबंधाचे स्वत्व होय.

आतां, कर्म तर माणसास चुकवितां येत नाहीं, आणि त्यापासून दुःख व्हावयास तर नको आहे. अशा स्थितीत करावें काय? ह्याचें उत्तर श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें आहे:— ' असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ' म्हणजे कर्माच्या ठायीं आसक्ति न धरितां जो कर्म करितो, तो उत्तम पद पावतो. ह्याचा आशय असा कीं, विहित कर्म तर निरंतर करीत असावें. परंतु त्यात स्वत्व म्हणजे फलाशा ठेवूं नये. ह्याचाच पर्यायार्थ असा कीं, सत्कर्म जे आहे, ते सत्कर्म म्हणून करावयाचें, लाभाच्या आशेनें करावयाचें नाहीं. ह्याच कृत्याला आमची कांहीं जुनीं चांगली माणसें ' कृष्णार्पण ' समजून आपलीं कर्तव्यें करीत आलीं आहेत. आणि हें निरपेक्षत्व ज्या ज्या मानानें त्या कृत्यांत अधिक असतें, त्या त्या मानानें तीं कामे एकंदर जनांच्या कल्याणास अधिक साह्यकारी होतात. ह्याचें सर्वव्यापी उदाहरण आमच्या कवींचें आहे. आमच्या कवींनीं जे मोठमोठे ग्रंथ प्राचीन कालीं लिहिले, ते स्वत्वरहित होते, त्यांत त्यांस फलाशा नव्हती, त्या ग्रंथांपासून अमका एक लाभ आपणांस व्हावा, असें त्यांनीं मनांत आणिलें नव्हते, आणि ग्रंथ लिहिणे हें सत्कर्म आहे, एवढें मनांत

आणून त्यांनीं ते लिहिले, म्हणूनच ते चिरायु होऊन जनांच्या आदरास पात्र झाले आहेत.

कर्मयोगामध्यें असा एक सिद्धान्त सांगितलेला आहे कीं, माणसाच्या हातून एकदां कर्म झालें, म्हणजे त्या कर्माचें फल आल्याशिवाय त्याचा नाश व्हावयाचा नाहीं; मग ते कर्म चांगले असो कीं वाईट असो. असत्कर्मापासून दुःख झालेच पाहिजे, आणि सत्कर्मापासून सुख झालेंच पाहिजे. तें कधीं कोणास टळावयाचें नाहीं. कारण उत्पन्न झाले, कीं त्याचे कार्य झालेंच पाहिजे. ही सांगड चालली आहे, ती अखंड आहे. तथापि, त्यांत विशेष गोष्ट ही आहे कीं, जी सांगड जवळजवळ असते, ती माणसास दिसते, आणि दूरदूर असते, ती दिसत नाहीं. ह्यावरून ती सांगड नसते, असें होत नाही. सुखास कारण सत्कर्म असलेच पाहिजे, आणि दुःखास कारण असत्कर्म असलेंच पाहिजे. मग तें त्याच्या अगदीं संनिध असो किंवा त्याच्यापासून फार दूर असो. पण त्यांत आणखी एक अशी मौज आहे कीं, अगदीं पूर्णपणे सत्कर्म, म्हणजे ज्यांत असत्कर्माचा लेशही नाहीं, असें आपणांस करतां यावयाचें नाहीं; त्याप्रमाणें अगदीं पूर्णपणे असत्कर्म म्हणजे ज्यांत सत्कर्माचा लेशही नाहीं, असें आपणांस करतां यावयाचें नाहीं. ईश्वरभक्ति हें पूर्णपणें सत्कर्म आहे असे मानितात; परंतु जो कोणी माणूस आपल्या कुटुंबपोषणाची उपेक्षा करून ईश्वरभक्तींत मग्न होतो, तो एके प्रकारे आपल्या कुटुंबाच्या माणसांचा विश्वासघात करितो, असे होतें. हें त्यांत वाईट आहे.

त्याच्या उलट, प्राण्यांचा जीव घेणें हें पूर्णपणें असत्कर्म आहे, त्यांत सत्कर्माचा लेशही नाहीं, हें जरी खरें आहे, तरी जो माणूस मासे मारीत असतो, तो कांही माणसांस पौष्टिक अन्न सिद्ध करून देतो, हें त्यांत सत्कर्म असतें. अथवा जो कोणी विषारी सर्प ठार मारितो तो पुष्कळ माणसांचें अकालिक मृत्यूपासून रक्षण करितो, हे त्यांत सत्कर्म असतें. म्हणजे तात्पर्य असें की, सत्कर्में आणि असत्कर्में ही वेगळीं काढतां येत नाहींत. त्यांची निवड करितां येत नाहीं. तीं एकमेकांपासून सोडवितां येत नाहींत. अशी त्यांची सांगड जमलेली आहे. असे जरी आहे, तरी ज्यामध्ये असत्कर्मापेक्षां सत्कर्म अधिक असतें, त्यास सत्कर्म मानावें; आणि ज्यांत सत्कर्मापेक्षां असत्कर्म अधिक असते, त्यास असत्कर्म मानावें, असा परिपाठ पडला आहे; व तोच व्यवहारांत ग्राह्य आहे.

कर्मापासून अलिप्त राहणें म्हणजे कर्मांचा परिणाम मनास न शिवूं देणें, हा काय तो कर्मयोग आहे. तो साधण्यास इंद्रियनिग्रह अथवा चित्ताची एकाग्रता हे साधन होय. हे फार कठिण आहे. हें फार थोडक्यांस साधतें. हें शुकास उत्तम साधलें होतें. हा जनकाच्या मंदिरांत गेल्यावर त्यास जनकानें, एक दुधाचा पेला कांठोकांठ भरून देऊन तो हातांत घेऊन एक थेंबही न सांडूं देतां, दिवाणखान्यासभोंवतीं सात प्रदक्षिणा करावयास सांगितलें. तेव्हां त्या दिवाणखान्यांत नृत्यगायनादि सगळ्या प्रकारच्या उत्तम मौजा चालल्या होत्या. परंतु त्यांकडे शुकाचे लक्ष मुळींच गेलें नाहीं. त्याचे लक्ष त्या पेल्याकडे होते. त्याच्यायोगानें, राजाज्ञेप्रमाणें शुकास तशा सात प्रदक्षिणा करितां आल्या. ह्या गोष्टीचें तात्पर्य असें आहे कीं, भोंवतालीं कितीही कर्में चाललेलीं असोत, त्यांची सत्ता जर आपल्या मनावर चालूं दिली नाहीं,

तर त्यांपासून माणसास कांहीं एक बाधा होत नाहीं. म्हणजे माणसाच्या मनावर जे परिणाम होतात, ते कर्मांचे होत नाहीत तर त्या कर्मांचे जे परिणाम मागून आपल्या अंतःकरणांत येउ देतो, त्यांचे होतात. म्हणून इंद्रियनिग्रह म्हणजे चित्ताची एकाग्रता हे साधन कर्मयोगास आवश्यक आहे.

चित्ताची एकाग्रता झाल्यावर, कर्तव्य काय तें पाहून करावयास लागावें. तें कर्तव्य एवढें मोठें दिसतें कीं, तें आपल्या हातून व्हावयाचें नाहीं, असें मनांत येऊन वाईट वाटतें. तें कां तर त्यांत आपण स्वत्व मानितों. म्हणून त्यांत स्वत्व मानूं नये आणखी, आपल्या बुद्धीला जें काय चांगलें वाटतें, तें करावें. तितकें, करवेल तेथें, आणि करवेल तेव्हां करावें, आणि स्वस्थ बसावें. करावयाचें होतें किती आणि करावयाचें राहिलें आहे किती, ह्याचा हिशेब पाहण्याचें मुळींच प्रयोजन ठेवूं नये. कां कीं करावयाचें किती ह्याला मुळींच मर्यादा नाहीं. अमक्या एका पायरीपर्यंत आपण पोंचलों, म्हणजे त्यासंबंधाची इतिकर्तव्यता झाली, त्याच्यापुढें कांहीं राहिलें नाहीं, असें कधींच व्हावयाचें नाहीं, अशी खरी स्थिति आहे. म्हणून करावयाचें तें करावें, हेंच कर्मयोगाच्या अभ्यासाचें उत्तम फळ आहे. कां कीं, यांत शांति आहे, आणि शांतींत सुख आहे.

**वि. कों. ओक.** बालबोध.

